गुरुकृपेसि अधिकार ॥ २६ ॥ तो सद्गुरु श्रीसिद्धेश । युगायुगीं मी तयाचा दास । जयाचें सामर्थ्य पाहतां विशेष । उपमा नसे भुवनत्रै ॥२७॥ कृपादृष्टि होता चि जाण । करूनि ठेले निजकल्याण । आत्मस्थिती बाणली खूण । दिधली आठवण पुर्विल ते ॥ २८ ॥ आणि भक्तमंजरीमालिकेला । आज्ञापिलें गुफावयाला । तये काळी प्रार्थनेला । गुरुपदाला विनवितसे ॥ २९ ॥ कोणाचा अवतार कोण जाहला । कोण संत कोठें जन्मला । हें तों कळावें सविस्तर मजला । आचरणलीळासहित ॥ ३० ॥ पाळिसी लाड गुरुमाउली । म्हणुनि येथें सलगी केली । कारुण्यता ठाईंची भली । पुर्विली आली जन्मांतरीं ॥ ३१ ॥ प्रार्थना ऐकुनी सिद्ध परेश । बोलते जाहले करूनि हास्य । म्हणती हृदईं प्रघट असे । विनवणी विशेष कासया ॥ ३२ ॥ स्वकरें देऊनि हातीं लेखणी । मस्तकीं ठेविता वरदपाणी । अनन्यभावें प्रीती करूनि । चरणीं विनटलों स्वामीचे ॥ ३३ ॥ साष्टांगेसीं करूनि नमन । ग्रंथासी आरंभ केला जाण । संतमंजरी गुंफोन । रघुनंदन आर्चितसे ॥ ३४ ॥ आराध्य आमुचे श्रीरघुनाथ । माता जानकी लक्ष्मणसहित । भरत शत्रुघ्न हनुमंत । नमिले समस्त वानर पै ॥ ३५ ॥ पंढरीसी तो भक्तकाजा । अयोध्याधीश श्रीराम माझा । कटावरी ठेऊनि कर सरोजा । उभा सहजा समचरणी ॥ ३६ ॥ ग्रंथासी साह्य तो श्रीविठ्ठल । आवडती भक्त ज्या तुळशीदळें । संतमजरी घ्यावया माळ । जाहले सिद्धस्वामिते ॥ ३७ ॥ तये तुळसीचें वृंदावन । पंचभूतांचा कर्दम करून । रचिलें प्रेमयुक्त पूर्ण । बोळंबा लाऊन धारणेचा ॥३८॥ नउ खिडक्या कमानाकार । रंग चित्रविचित्र मनोहर । माचे नाना ध्वनीचा गजर । उलट वर आरसे त्या ॥ ३९ ॥ चंद्र सूर्य कळा ठेविल्या । नवरंगे तारके शोभल्या । तया पाहा भांबावल्या । बाह्य सकळा वृत्ती पै ॥ ४० ॥ सर्व देवाची स्थापना । करोनि रचिलें वृंदावना । औटहस्त प्रमाण जाणा । परयत गगना उचितें ॥ ४१ ॥ तयासी तीन कगोरे सुरेख । माजि दाविले तिन्हि लोक । तान ब्रद

देऊनि नेटके । निर्मिले सुरेख अतिप्रिती ॥ ४२ ॥ मूळबंधामाझारि। सप्त पाताळें साजिरीं । शोभत असती मनोहरी । स्थानें बरीं अनुक्रमें ॥४३॥ षोड्यानबंध दुसरा देख । तयामाजी सप्त लोक ॥ भूर्भुवादि आशेख। श्रीगुरुमुखें वोळखी तया ॥ ४४ ॥ जालंदर येकवीस स्वर्गावर । जेथें चंद्र सूर्य क्रिया सादर । जो कां आनंद परिकर । कळस वर चमकतसे ॥ ४५ ॥ तयांत साहा चक्रें रक्षियलीं । शुषुम्ना नाडीनें बांधिलीं । आधारापासून विराजिलीं । द्वीदळी भूपर्यंत ॥ ४६ ॥ ईडा पिंगळा नेमस्त । मुकळवोनि विकाशित । तये स्थळीं दैवत । अति विलसत ठाईं ठाईं ॥ ४७ ॥ गणपती ब्रह्मा विष्णु रुद्र । चित्रें रेखिलीं सुंदर । ॐकार जो जीवेश्वर । शिव निर्धार अग्नीचक्री ॥ ४८ ॥ यंत्राकार वृंदावन । तयावरि शोभा पूर्ण । तेथें आजि स्थापिली जाण । निजस्फुरण तुळसीतें ॥ ४९ ॥ ते चैतन्य पराशक्ती । सोहं जीवनें टवटवती । कर्मकाळ जेथें माती । तये खाली विखुरली ॥ ५० ॥ तेथें कामक्रोध जंतु जाण । मुळीं राहिले कृमी होऊन । तया निवारिती सज्ञान । विवेकानें निरंतर ॥ ५१ ॥ तेणें वैराग्यवृक्ष वाढला । भक्तिपत्रें विस्तारला । ज्ञानखांदिया तयाला । अनुभवाला विस्तारिती ॥ ५२ ॥ तयासी मंजुऱ्या अनेक । भक्तचरित्रें पृथका पृथक । तिची माळा गुंफितो निके । श्रीरघुनायक पूजावया ॥ ५३ ॥ ते मालिका धाणिकरें । करविता स्वामि सिद्धेश्वर । जो कां तिष्टे विटेवर । रुक्मिणीवर जगदात्मा ॥ ५४ ॥ आतां वंदूं संत श्रोते । अर्थामृताचे जे कां भोक्ते । प्रघट होऊनि निजहृदयातें । स्फूर्ति द्यावी कवनासी ॥ ५५ ॥ मी तर ठाईंचा मूढमती । परि सद्गुरुकृपा मुख्य आशोक्ती । म्हणोनि करितसे तुम्हा विनंती । वदवा स्थिती आपुली ॥ ५६ ॥ युगायुगीं देवासवें । अवतरला जे तुम्ही सर्वे । त्यांतील कांहीं वर्णीन भाव । कृपा सर्व करा तुम्हीं ॥ ५७ ॥ मग प्रसाद करितासनी । प्रेम दाटलें अंतःकर्णी । श्रोता वक्ता कोदंडपाणि । आत्मज्ञानि श्रीरघुवीर ॥ ५८ ॥ कराव्याते धर्मस्थापना । अवतार घेतले नारायणें । तयांत

मुख्य रामकृष्ण । ब्रह्म पूर्ण भूमंडळीं ॥ ५९ ॥ सदाशिव आदिकरूनि । साह्य जाहले विष्णुलागुनि । तेन्हां कार्यसिध्दिसी पावुनि । मारिले रणीं दानव ते ॥ ६० ॥ ते ऐका कोण कोण । वानर जाहले देवगण । रुद्र अवतार श्रीहनुमान । ज्यावुवंत जाण विरंची ॥ ६१ ॥ यज्ञपुरुष नळ जाहला । समीर तो चि नीळ वोळा । सूर्यअंश सुग्रीव जन्मला । सुखेण भला धन्वंतरी ॥ ६२ ॥ अंगद तो चि बृहस्पति । ऐसे सांगतां विस्तार ग्रंथीं । फार होईल म्हणुनि मति । येथें युक्ति आटोपिली ॥ ६३ ॥ अठरा पद्मे वानर । कथितां तयाचें जन्मांतर । कथाभाग राहिल दूर । संक्षेप साध्यां यासाठीं ॥ ६४ ॥ असो सकळ देवगण । अवतरले अयोध्येंत जाण । ते चि पुढें गोपाळ होऊन । श्रीकृष्ण तेणें आराधिला ॥ ६५ ॥ कल्युग होतां चि प्राप्त । गोपाळ जाहले सर्व संत । तयांच्या कथा अनुक्रमें सत्य । स्फुरत तितुक्या सांगेन ॥ ६६ ॥ देवांमध्यें महादेव । आग्रगण्य जो सदाशिव । जाणती ते माहानुभाव । गुरु सर्वां देवांचा ॥ ६७ ॥ तयाचा अवतार श्रीहनुमंत । जाहला प्रसिध्द त्रेतायुगांत । वानरगणीं माहा समर्थ । श्रेष्ठ सर्वांत चिरंजीव जो ॥ ६८ ॥ कलीमध्यें तो चि स्वामी । अवतरलासे ई भूमी । प्रथमारंभीं श्रोते तुम्ही । कथन नेहमीं हे चि ऐका ॥ ६९ ॥ नंतर पुढें अनुक्रमें । संतस्तवन घडेल प्रेमें । आदौ कथा ही चि नेमें । येकाग्र प्रेमें आवधारा ॥ ७० ॥ श्रीहनुमंत ब्रह्मच्यारी । चिरंजीव पदवी ज्या निर्धारीं । मरण चि नसतां पृथ्वीवरी । जन्म धरी काय कारण ॥ ७१ ॥ एसी आशंका घ्याल मनें । तरि हनुमतन टकीं कथा पूर्ण । त्यातिल सारांश कांहीं कथन । कार्यकारण अनुवादूं ॥ ७२ ॥ अहिरावण महिरावण निशाचर । परम दुष्ट जे अनिवार । घेऊनि गेले श्रीरघुवीर । लक्ष्मण सहोदर पै सहित ॥ ७३ ॥ तये वेळीं निज अंबरीं । उड्डाण साधुनि तो साहाकारी । सोडवावयाते निर्धारी । समुद्रतीरीं तो पातला ॥ ७४ ॥ तंव तेथें जातां भले । मकरध्वज होतां द्वारपाळ । तेणें हनुमंतासी निवारिले । प्रवेशतां बळे नगरांत. ॥ ७५ ॥

मग वातात्मजासी राग आला । मल्लयुध्दासी प्रवर्तला। मगरध्वज भूमीसी पाडिला । कासाविस जाला बहुत ॥ ७६ ॥ प्राणांतसमय पाहून । बोलते जाहले हनुमान । ह्मणती त्राता तुझा कोण । सांग वदनें या समई ॥ ७७ ॥ ऐकुनि ऐश्या वाक्यासी । आठवण जाहली निजमानसीं । ह्मणे वानर काय तुजसी । या वेळेसी बोलते ॥ ७८ ॥ पिता माझा मारुति असतां । सूड घेता तुझा तत्वता । तया येवढें सामर्थ्य पाहातां । नसे सर्वथा भुवनत्रे ॥ ७९ ॥ नळ नीळ जांबुवंत । हे हि सन्निध तेथें होते । हसोनि बोलति हनुमंताते । काय मात ऐकिली हे ॥ ८० ॥ मारुति म्हणती मी ब्रह्मचारी । काय वदला न कळे वैखरी । मगरध्वजासी प्रश्न करी । वानर चतुरि मंडळी ती ॥ ८१ ॥ मग तो म्हणे माझे मातेन । सांगितले आहे मजलागून । उत्पत्तिसी रेत कारण । हनुमंता जाण असे पै ॥ ८२ ॥ परिसोनि ऐसि वचनोक्ती । आणविली तयाचे जननीप्रति । मगरि येऊनि सत्वरगति । पाहिले निगुति सर्वांसी ॥ ८३ ॥ म्हणे मजला पुत्र दिधला । जयाचे वीर्यापासुनि जाहला । वानर विशाळ जो का भला । लंकेसी जाविला अग्नि तो ॥ ८४ ॥ गोष्टि बोलतां मगरी ऐसी । हनुमंतें विचार केला मानसीं । प्रगट न करितां त्या स्वरूपासी । ठेविती शब्दासी वानर ॥ ८५ ॥ येतद्विषईं मारुतीनीं । भीमरूप धरिलें तत्क्षणीं । आवलोकितां निजनयनीं । मगरी मनीं सुखावली ॥ ८६ ॥ म्हणे माझा हा चि भर्ता । चरणावरी ठेविला माथा । मगरध्वजासी उत्पन्नता । जाहाली तत्वता यापासुनि ॥ ८७ ॥ सुरस वाक्य बोलतां ऐसें । हनुमंत करिते जाहले हास्य । तये वेळीं वृत्तांतास । निवेदि पायास मगरी ते ॥ ८८ ॥ म्हणे लंका दहन करूनि आपण । समुद्रा तीरीं आला जाण । तये समई जाहले कारण । मुखप्रक्षाळण आरंभिलें ॥ ८९ ॥ खाकरया सरिसें रेत उसळोनि । समुद्रीं पडिलें मुखातुनि । ते म्यां सेविलें तत्क्षणीं । तयापासुनि पुत्र हा ॥ ९० ॥ आतां काम पुर्वविया । वेटावरी चला मारुतीराया । ऐसें वदुन लागली

पाया । अनन्यहृदया मगरी ते ॥ ९१ ॥ विस्मय करुनि वायुतनय । म्हणती येक जाहला निःसंशय । दुसरें भाषण सर्वथा हे । न घडे त्रयकाळीं ते ॥ ९२ ॥ परि स्वामिकार्जी उपयोगासि । कांहिं पडेल हें मानसि । जाणुनि तये मगरीसि । समजुतीसि पै केले ॥ ९३ ॥ म्हणती जानकी आणि श्रीरघुनाथ । उभयता योग होईल तयातें । तये काळीं मनोरथ । पूर्ण सत्य होईल तुझा पै ॥ ९४ ॥ ऐसि काढुनि समजुत । संतोष केला सुतरिते । आणि स्वामिकार्जी अनृत । बोलतां दुरित न घडे चि ॥ ९५ ॥ आणोनि मनिं हे शास्त्रोक्ति । वचन दिधलें मगरीप्रति । आपण निघोनि मारुती । शेष रघुपती घेऊनि गेले ॥ ९६ ॥ कार्य भाग सकळ संकेत । होऊनि रामायण जाहले समाप्त । पुढें वर्तलें कैसें श्रोते । देऊनि तें ऐका चित्त ॥ ९७ ॥ मारुती वचनिं विश्वास ठेऊनि । निजध्यास लागला मगरि लागुनि । बैसली करित अनुष्ठानिं । बेटासन समुद्र जिला ॥ ९८ ॥ अपसरा ती जन्मांतरीची । शिव उपासना तये संतिचि । शापवळें तनु मगरीची । प्राप्त साची परी ज्ञानी ॥ ९९ ॥ वर मागावया मारुतिसि । इच्छा धरली बहु मानसीं । आरंभिले तपश्चर्येसि । योगरितिसि करूनि ॥ १०० ॥ त्रेतायुग द्वापार जाहले । पुढें कलियुग तें हि निघालें । परि तप नाहिं संपलें । पुण्य जालें अचाट ॥ १ ॥ तेणें करूनि इंद्रपदासि । कंप सुटला निश्चयेंसि । अमरपति म्हणे मानसिं । गोष्टि कैसि घडली हे ॥ २ ॥ नारदमुनिसि पाचारून । प्रार्थना करि सहस्त्रनयन । त्रैलोक्यांत तुम्हासि गमन । पाहा शोधुनि भुमंडळिं ॥ ३ ॥ कोण्ही तप आरंभिलें । न कळे पुण्य काय काय जाहलें । असन समुळि हालवलें । डळमळिलें इंद्रपद ॥ ४ ॥ नारदस्वामि ऐकुनि ऐसें । येते जाहले समुद्रतीरास । अवलोकिता मगरीस । बैसलीसे ध्यानस्त ते ॥ ५ ॥ आत्मा नेहुनि ब्रह्मांडि । होमिल्या वृत्ति ज्ञानकुंडि । निर्विकल्पदशा गाढि । स्मृति थोडि नसे जिला ॥ ६ ॥ हे पाहुनि नारदऋषिनीं । धन्य म्हणति मगरिलागुनि । समाधीते विसर्जन करूनि

ऐकिजे कानिं द्रुत ॥ ७ ॥ तयेकाळिं ब्रह्मकुमरें । बहु प्रकारे बोधिली जळचर । परि न ऐके ते काळि शचिकांत । गेला सत्यलोकासि ॥८॥ ब्रह्मयाते करूनि नमन । निवेदिलें सविस्तर जाण । मग समागमें इंद्रासि घेऊन । विधाता गेला निघोन वैकुंठि ॥ ९ ॥ श्री माहाविष्णु मारुतिसहित । उभयता नमिले साष्टांग तयाते । बध्दांजुळि जोडुनि हात । भावें विनवित अनन्य ॥ ११० ॥ श्रीरामासि शचि-रमण । आणि बोलता जाहला चतुर्वदन । म्हणती माहाराज दिधलें वचन । श्रीहनुमंतें मगरीसि ॥ ११ ॥ न करितां तो पारिहार । येथें आहेत आपणा समोर । जोडोनिया दोन्हि कर । सेवेसि तत्पर तिष्ठतां ॥ १२ ॥ परि तयेचा पुण्यपर्वत । तप जाहले अचाट बहुत । दोन युगें जाहलीं समाप्त । चळाचळि कांपत इंद्रपद ॥ १३ ॥ याचा विचार येगिं करणें । सुचविता ऐसें सहस्रनयनें । मारुतीसी रघुनंदन । बोलती वचन काय हे ॥ १४ ॥ तये वेळि श्रीहनुमंतें । निवेदिला समूळ वृत्तांत । म्हणे बोलीलो खरें मगरीते । कार्जि अनृत स्वामीचे ॥१५॥ आतां कळेल तैसे करा । कृपानिधि श्रीरघुवीरा । मी तर ब्रह्मच्यारी खरा । ठाउके विच्यारा सर्वांतें ॥ १६ ॥ मग वैकुंठवासी श्रीराम । भक्तजनाचा विश्राम । जाणुनि कारण पुढिल वर्म । सुचविले प्रेमें मारु-तीसी ॥ १७ ॥ म्हणती कार्ये आहेत फार । हनुमंता ध्यावा तुवा अवतार । अघोर कळी माजला अविचार । ग्लानि थोर धर्माची ॥१८॥ आणिक दुसरा हेतु ऐक । ऋषि येक पुण्यश्लोक । शिवासारिखे बाळक । असावे निके या जगिं ॥ १९ ॥ येताद्विषईं अनुष्ठान । करिता जाहला सूर्यउपासना । सातवा जन्म तयासि जाणा । तपोधनालागि पै ॥ १२० ॥ ऐसे अनेक आहेत कारणें । यालागिं व्हावे जगिं अवतरणें । तयाते मगरी उध्दरणे । घडेल जाण अनयासें ॥ २१ ॥ ब्रह्मदेव हि तेथें वदति । पुत्र आहे चि जाहला निश्चिति । आतां लग्न मात्र व्हावें, जगति । अक्षता निश्चिति पडाव्या वारे ॥ २२ ॥ ऐसें सांगतां हनुमंता । संकट वाटलें बहुत चिंता । परि आज्ञा हे सर्वथा । करणें

अध्यायांत श्रीसमर्थ, जयरामस्वामी, रंगनाथस्वामी, आनंदमूर्ति व केशवस्वामी या श्रीरामदासपंचायतनांतील पांच सत्पुरुषांचीं चरित्रें आहेत, म्हणून तो एक भाग पाडावा, शेवटचे अध्याय ९८ ते १०८ यांत मालाकारांचे गुरु सिद्धस्वामी यांचें चरित्र आहे व १०९ या मेरु अध्याय म्हणून कल्पिला असून त्यांत रामहरिदासांचें चरित्र आहे, तेव्हां ९८ ते १०९ या अध्यायांचा तिसरा भाग करावा व २८ ते ९७ अध्यायांचा मधला जरा मोठा भाग होईल, पण तो मधला दुसरा भाग करावा, असें योजिलें आहे. २८ ते ९७ या मधल्या भागांत जीं चरित्रें आलीं आहेत, तीं कोणकोणाचीं आहेत, हें वाचकांस आगाऊ कळावें व तीं वाचण्याविषयीं त्यांची उत्सुकता वाढावी म्हणून अध्यायवार त्यांचीं नावें येथें नमूद करून ठेवितों.

अध्याय २८ते३० शिवराम
" ३१ते३४ नवनाथ
" ३५ते३८ निरंजन
" ३९ते४१ वामन
" ४२–४३ काळोबा ऊर्फ कविकाळचैतन्य
" ४४ अंबरनाथ
" ४५ते४७ गोपाळनाथ
" ४८–४९ भार्गव
" ५०–५१ दीनानाथस्वामी ऊर्फ दिनकर ऊर्फ भाईजी
" ५२ आनंदबावा
" ५३ प्रल्हाद
" ५४–५५ शंभु आप्पा बावा
" ५६–५७ सिद्धेश्वरस्वामी
" ५८ बाबा पाध्ये
" ५९ मध्वनाथ
" ६० बावजीपंत
" ६१ मैनाबाई
" ६२–६३ ज्योतिपंत
" ६४ मुच[illegible]
" ६५–६६ तुक[illegible]

रंगनाथस्वामींचा मठ निगडी येथें आहे. सुमारें अठ्ठावीस वर्षांमागें स्वामींच्या पदपदांतरांचें पुस्तक मठामार्फत छापलें गेलें होतें. तथापि त्यांची संपूर्ण कविता छापली गेली होती असें मला वाटत नाहीं. तें हि पुस्तक आतां दुर्मिळ झालें आहे. इतर मठाप्रमाणें या हि मठांतील संग्रहाची वाताहत झाली. एकदा चाळीस पंचेचाळीस वर्षांमागें व पुन्हां पंचवीस तीस वर्षांमागें आग लागून बरा च संग्रह नष्ट झाला, असें समजतें. विश्रांतिवही व समुद्रवही अशा दोन वह्या स्वामींच्या कवितेच्या होत्या, असें वृद्ध सांगतात, पण त्या कोठें आहेत, कोणी सांगूं शकत नाहीं. तरी अजून कांहीं कांहीं ग्रन्थ गांवांत कोणाकोणापाशीं आहेत. संशोधनास जागा आहे.

आनंदमूर्तींचा मठ ब्रह्मनाळ येथें आहे. स्वतः आनंदमूर्तींनीं कांहीं काव्यरचना केलेली नव्हती. निरुपम गुरुभक्त म्हणून त्यांची प्रसिद्धी होती. त्यांचें एक बापानंदविरचित ‘ आनंदचरितामृत ’ नांवाचें चरित्र व मठांतील शें दोनशें अस्सल सनदापत्रांच्या नकला सभेच्या संग्रहीं वीस पंचवीस वर्षांपासून आहेत. तें चरित्र आणि तीं सनदापत्रें एकदां छापणें इष्ट आहे.

केशवस्वामी यांचा हल्लीं मठ असा कोठें च नाहीं. हैद्राबादेस नदीच्या कांठीं एका शेतांत त्यांची फक्त लहानशी समाधि आहे. यांची कविता विपुल होती. तिच्या पैकीं बरीचशी महाराष्ट्राच्या उपेक्षेमुळें नाहींशी झाली व अजून कांहीं हैद्राबादेस रंग्रेजगल्ल्यांत रंगारी लोकांकडे मिळण्याचा संभव आहे. सभेच्या संग्रहीं त्यांच्या पदपदांतरांचें एकाद दुसरें बाड आहे.

इतर चौघांचीं चरित्रें लिहिण्याला मालाकारांना कोणते ग्रन्थ आधारभूत होते, तें त्यांनीं कोठें सांगितलेलें नाहीं व मला हि उमगलें नाहीं; पण श्रीसमर्थांचें चरित्र मात्र त्यांनीं श्रीहनुमंतस्वामींच्या बखरीच्या आधारानें वर्णिलेलें आहे, असें स्पष्ट दिसतें आणि ताडून पाहतां प्रत्ययास येतें. अशा रीतीनें हनुमंतस्वामीकृत बखर आणि मालाकारांनीं वर्णिलेले पहिले अकरा अध्याय, ताडून पाहत असतां एक गोष्ट माझ्या नजरेस आली, ती वाचकांस कळवितों. श्रीसमर्थ आणि श्री शिवछत्रपति यांची प्रथम भेट शके १५९४ त झाली, असा आक्षेपकांचा पूर्वपक्ष आहे, तो वाचकांस ठाऊक च आहे. श्रीसमर्थसंप्रदायांत कण्हेरी मठाचे वासुदेव गोसावी यांचें महत्त्व किती होतें तें श्रीसांप्रदायिक विविध विषय लेखांक १० मध्यें विशद करून सांगण्यांत आलेलें च आहे. वासुदेवांना ‘ श्रीसमर्थप्रतिमा

म्हणती जनीं । ' अशी श्रीसमर्थप्रतापकारांची साक्ष आहे. त्या वासुदेवांना श्रीशिवरायांनीं अधिक वैशाख व. १२ शके १५९२ मध्यें मौजे कण्हेरी येथें इनाम देऊन सनद करून दिली होती, या एका गोष्टीमुळें पूर्वपक्षाला चांगलाच धक्का बसतो. तो पूर्वपक्ष संपूर्णपणें खोटा पाडण्यास आज मालाकारांचा पुरावा उपयोगी पडत आहे. मालाकारांनीं वासुदेव आणि दिवाकर यांच्या नांवांचा केलेला घोटाळा गौण आहे. तो सोडून दिला म्हणजे त्यांनीं वासुदेव गोसावी यांची दिलेली हकिकत बखरींतील हकिकतीशीं जुळत असून मालाकारांनीं आणखी एक गोष्ट जास्त सांगितली आहे. तिला त्यांचेपाशीं बखरीशिवाय निराळा कोणता आधार होता, तो समजण्यास आज आपणांस मार्ग नाहीं पण संप्रदायांत असलेली वासुदेवांची *योग्यता व त्यांच्याविषयीं श्रीशिवछत्रपतींची असलेली निष्ठा विचारांत घेतां* मालाकारांचें विधान विश्वसनीय वाटतें. मालाकार म्हणतात, " श्रीसमर्थांनीं दिवाकर ( वासुदेव ) पंडितांचा उद्धार करून त्यांना कण्हेरीस श्रीशिवछत्रपतींच्या हस्तें मठ करून देवविला. " श्रीछत्रपतींनीं १५९४ पूर्वी १५९२ त वासुदेवांना नुसतें इनाम करून दिलें नाहीं, तर तत्पूर्वी हि त्यांच्या हस्तें कण्हेरीमठाची स्थापना श्रीसमर्थांनीं करविली होती; असो.

राजारामप्रासादी यांची भक्तमंजरीमालेची मूळ प्रत चरेगांवीं होती. ती मी चरेगांवीं च दोनदां पाहिली होती. हल्लीं ही जी प्रत छापली जात आहे ती मला सांगलीस मिळाली होती. ती छापण्यास घेण्यापूर्वी एकदां मूळ प्रतीवरून ताडून पहावी, असें मनांत येऊन ती बरोबर घेऊन गेल्या चैत्रांत चरेगांवीं मुद्दाम गेलों होतों, पण एक दोन गावीं प्रयत्न करून हि मूळ प्रत आणि तिचे मालक यांचें दर्शन घडलें नाहीं. अर्थात् या प्रतींत बरीं च अशुद्धें आहेत, तीं तशीं च राहिलीं आहेत. छापतांना हि तेग चुका झालेल्या दिसत आहेत. पण कांहीं झालें तरी हा घी वेधा आहे, तो कांहीं श्रीमत् दासबोध किंवा श्री ज्ञानेश्वरी सारखा तत्व ग्रन्थ नव्हे. म्हणून राहिलेल्या किंवा झालेल्या चुकांबद्दल तितकेंसें वाईट असतां नाहीं. झालेल्या चुका वाचकांस सहज उमगतील. वाचकांनीं क्षमा करावी ! संपूर्ण ग्रन्थ छापून पुरा होईतों मूळ प्रत पाहण्याचा आणखी एक प्रयत्न करीन. ॥ ३९ ॥

भक्तमंजरीमालेशिवाय राजारामप्रासादी यांचे आणखी

राणुबाई म्हणे आतां । सर्वज्ञपणें असतां । काय करणें वाच्यांशतां । लक्ष सर्वथा तव पाईं ॥ १४० ॥ ऐसे ऐकोनि सूर्याजीपंत । राहा उगि च म्हणति स्त्रियेते । श्रीराम आमुचे कुळदैवत । सर्व हेत पुरवील तो ॥ ४१ ॥ तव ब्राह्मण स्वरूपें दुसरे दिवसिं । प्रगट जाहला तेजोरासि । दर्शन देऊनि तया द्विजासि । होणारा सुचविलें ॥ ४२ ॥ म्हणे मद अंशें प्रथम पुत्र । होईल तुजला सुपात्र । दुसरा होणें जो कां पवित्र । प्रत्यक्ष अवतार तो मारुतीचा ॥ ४३ ॥ सूर्याजिपंतासि ऐसें वदोन । प्रसादें दिधलीं फळें दोन । अदृश्य जाहाला मग ब्राह्मण । वरप्रदान देऊनि ॥ ४४ ॥ नमन करुनि श्रीरघुपतिसी । फळें दिधलीं स्त्रियेसी । गर्भ राहिला ते चि दिवसिं । राणुबाईसि तात्काळ ॥ ४५ ॥ नउ मास होतां चि पूर्ण । पुत्र जाहला सुलक्षण । पंधराशे शके शालिवाहन सताविस जाण वरुते पै ॥ ४६ ॥ गंगाधर नाम ठेविलें । याचें कारण पाहिजे परिसिलें । सूर्यरश्मीपासोनि जळ । मेघ प्रांजळ गंगा त्या ॥ ४७ ॥ सूर्यप्रसादापासुनि जाहला । गंगाधर नाम या चि बोला । श्रीरामउपासक पूर्ण भला । श्रेष्ठ तो जाला भूमंडळीं ॥ ४८ ॥ असो पुढें दोन वर्षांनिं । राणुबाई जाहली गर्भिणी । तये काळीची लीळा श्रवणिं । सर्वत्र जनिं अवधारा ॥ ४९ ॥ वानरगणाचा जो कां सखा । गर्भि संभव तयाचा देखा । मग त्या वर्णिल कोण सुखा । मारुति निका जिच्या उदरीं ॥ १५० ॥ राणुबाईस देहभान । किमपि उरलें नसे कांहिं च जाण । कैंचि निद्रा अन्न पान्न । वेधलें मन श्रीरामपदिं ॥ ५१ ॥ अखंडाकार समाधिरत । फळें भक्षावीं कांहिं नेमस्त । दीर्घस्वरें शब्द करित । श्रीरघुनाथ म्हणोनि ॥ ५२ ॥ देवगृहिं देवाठाईं । सदा बैसणें येकांत ठाईं । ऐशा प्रकारें नउ मास पाहि । पूर्णता देहिं गर्भासि ॥ ५३ ॥ सूर्याजिपंत श्रीरामभक्त । जयंति उछाह कुळार्चित । नवरात्र घरीं मिळाले संत । अन्नदान बहुत पै ॥ ५४ ॥ हळदि कुंकुमे वसंतपूजा । पुराण कीर्तन उभविल्या ध्वजा । वेदघोष करितां द्विजा । ध्वनि सहसा भनो-

पम्य ॥ ५५ ॥ ऐशापरि उछाह सोहळा । तो रामजयंति दिवस पातला । माध्यान्हिसि सूर्य आला । जन्मवेळा पातली ते ॥ ५६ ॥ हनुमंत अवतार ते समई । प्रसवली पुत्र राणुबाई । मग तो आनंद सांगणें काई । लोकत्रै न समाये ॥ ५७ ॥ श्रीराम मारुति अभेद । हे दाविले जगा प्रसिध्द । म्हणुनि वेळा ती च शुध्द । साधिली सिध्द या अवतारीं ॥ ५८ ॥ असो मंगळ वाद्यें वाजति द्वारिं । उल्हाट यंत्रें उडविती भारि । साखर वाटिति नरनारि । मिळाली सारि साधुवृंदें ॥ ५९ ॥ येकात्मता उछाहा दोन्हि । सूर्याजिपंतासि प्राप्त होउनि । उल्हास जाहला अंतःकर्णि । न ये वाणि-ते बोलतां ॥१६०॥ मग प्राप्त होतां त्रयोदश दिन । नाम ठेविलें नारायण । सारा वेळ सूर्यस्तवन । अभ्यास तो चि म्हणुनि ॥६१॥ शालिवाहन शके पंधराशे । वरुति जाहली आणिक तीस । कीलकनाम संवत्सरास । मारुति अंश जन्मले ते ॥६२॥ दिवसोदिवस वाढता जाण । वानरचेष्टा कराव्या पूर्ण । रामनाम उच्चारण । सदा दृष्टि पाहणें नाशिकाग्रिं ॥६३॥ स्थिरता नसे येक क्षण । वृक्षावरि बैसावे येऊन । कुंचि घ्यावि मुखावरून । काहिं होणें ध्यानस्त ॥६४॥ ऐशाप्रकारें बाळलीळा । नारायण श्री करितां जाहला । अति चपळ नाटोपे कवणाला । धावता मायेला श्रमवि जनिं ॥ ६५ ॥ भूतादिकाची जाली झडपण । राणुबाईसी वाटलें जाण । म्हणुनि दृष्टि काढितां पूर्ण । श्रीनारायण हास्य करि ॥ ६६ ॥ प्रार्थना करुनी श्रीरामासी । अंगारा लाविता कपाळासी । मग यावे काहिं गुणासि । विद्याभ्यासि सकलिक ॥ ६७ ॥ पंचम वर्षि मौंजिबंधन । करितां जाला पिता जाण । धन्य तयाचें भाग्य पूर्ण । सहस्त्रवदनें न . वर्णवे ॥ ६८ ॥ जगत्रयाचा सद्गुरुनाथ । मारुति अवतार जो समर्थ । कर्ण बोढवि अनुग्रहार्थ । सुर्याजिपंत धन्य ते ॥ ६९ ॥ साजिरे ध्यान सुहास्य वदन । कौपिन मेखळा गौरवर्ण । आजानबाहु आकर्णनैन । शोभति चिन्हें ज्या देहिं ॥ १७० ॥ शुकासारिखी मूर्ति पाहतां । जो विसावा ब्रह्मचर्य व्रता । वैराग्यनिधि केवळ तत्वता । मूस सर्वथा ज्ञानाची ॥ ७१ ॥ वेदपठण सहजि कर्म । अनयासें लाधले नेम ।

यथाशास्त्र आश्रमधर्म । भक्तिप्रेम सहजी ते ॥ ७२ ॥ ऐशा प्रकारें सात वर्षें । होति जाली नारायणास । मग प्रयाण वैकुंठास । सूर्याजि-पंता सायोज्यता ॥ ७३ ॥ सातवि भक्ति जे दास्यत्व । मारुति अंगि ज्या विलसत । तो अवतार सूर्याजिपंतें । जाणिला संत स्वपुत्र पै ॥ ७४ ॥ तेणें हर्षें सप्तम वर्षि । मिळतां जाला स्वस्वरूपासि । जगिं धन्य तपोराशि । ज्याचे कुशि जगद्गुरु ॥ ७५ ॥ पुढें काहि दिवसा नंतर । नारायणानि केला विचार । परब्रह्म निर्वि-कार । श्रीरघुविर भेटावया ॥ ७६ ॥ येतद्विपईं स्वग्रामांत । उग्रप्रतस्थान श्रीहनुमंत । जाउनि तेथें देवालयांत । अनुष्ठानातें आरंभिलें ॥ ७७ ॥ करुणापर अभंग करुनि । पठण करितां मधुरध्वनि । तयेवेळिं कोदंड-पाणि । प्रगटले जनिं श्रीराम ॥ ७८ ॥ वामांगिं ते सीतासति । लक्ष्मण जवळि च्यामर ढाळिति । भरथ शत्रुघ्न मारुति । सहित मूर्ति पाहिली ती ॥ ७९ ॥ कोणि घेतिल आशंका श्रोते । हनुमंत प्रत्यक्ष आपण निश्चित । रामाजवळि कैचा तेथें । दुसरा निश्चित देखिला पै ॥ १८० ॥ तरि ऐका येकाग्रवृत्ति । क्षीरसमुद्रिं लक्ष्मीपति । तेणें चि धरिले अवतार क्षितिं । स्थापाया निगुती धर्मातें ॥ ८१ ॥ म्हणुनि काय तें स्थान । उद्वस पडलें असे जाण । तयापरि श्रीहनुमान । सहित ध्यान अवलोकिलें ॥ ८२ ॥ मग जगद्गुरु श्रीरामराया । उचंबळलें प्रेम हृदया । नारायणाची कवळोनि काया । सुचविती कराया प्रश्नातें ॥ ८३ ॥ सावध म्हणता सावध जाहला । श्रीचरणिं मस्तक ठेविला । बोलवेना कंठ दाटला । बळावला पश्चाताप ॥ ८४ ॥ नंतर सावरोनि निजप्रेमा । प्रश्न केला श्रीरामा । मेळवावें स्वसुखधामा । करपद्मा ठेउनि शीरिं ॥ ८५ ॥ ऐकुनि ऐसे कैवल्यदानी । हासिनले चापपाणि । मग सांप्रदाय क्रमें करूनि । मंत्र कर्णि उपदेशिला ॥ ८६ ॥ दासा म्हणति सावध होईं ।आपआपणा तूं चि पाहि । अनुपासुन महाद्र गेहीं । दुजा ठाईं नसे पै ॥ ८७ ॥ येकात्मता सर्व भूतिं । गर्जता हे वेदश्रुति । वशिष्ठ कृपें जे आत्मप्रचिति । ते चि युक्ति निरोपिली ॥ ८८ ॥ आत्म।

स्तुति ऐसा प्रकारें । सांगतां चि श्रीरघुवीरें । जाहलि श्रुचि सदाकार । अखंडाकार ब्रह्मरूप ॥ ८९ ॥ उदकिं उदक जेवि मिळतां । नये कदापि ते निवडितां । तयापरी येकात्मता । बाणलि साम्यता सहजी ते ॥ १९० ॥ तयेवेळिं नारायणास । नाम ठेविलें रामदास । संबोखोनि परम उल्हासें । अयोध्यानिवासें श्रीरघुवीरें ॥ ९१ ॥ पुढें चमत्कारकथा गहन । सविस्तर कीजा होईल वर्णन । श्रोतिं करुनि येकाग्र मन । सावधान परियेसा ॥ ९२ ॥ सद्गुरुनाथ तो चि स्वामि । सित्व होउनि हृदयपद्मीं । वदवी ग्रंथ राजारामीं । मंगळ नेहमीं सहजी ते ॥ ९३ ॥ भक्तमंजिरीमाळा ग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । रामदासस्वामिचरित्रातें । अध्याय समाप्त प्रथम हा ॥ १९४ ॥

## अध्याय २

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरु सित्धगणेशा । आत्मयारामा स्वयंप्रकाशा । सच्चिदानंदविलासा । अविनाशा तुंज नमो ॥ १ ॥ निश्चळामाजि जें कां स्फुरण । अर्धमात्रा ते चि जाण । जेथून उद्भव ओंकार पूर्ण । परा स्फुरण ते सरस्वती ॥ २ ॥ तये मेघळे पाहातां कांहिं । बोलावया ठाव चि नाहीं । निशब्द जाहलें ठाईंचे ठाईं । थिणले साही वेवादितां ॥ ३ ॥ असो तये शारदेप्रति । नमन माझें पुढती पुढति । सद्गुरुपदिं जे कां प्रीति । अनिर्वाच्य श्रुति म्हणति तया ॥ ४ ॥ मातापिता कुळदेवता । नमन माझें अनुक्रमें संता । अखंडाकार चरणीं माथा । सित्धनाथा समर्थांचे ॥ ५ ॥ जयाचीये कृपा दृष्टि । आपआपणा जाहलि भेटि । होउनियां स्वानंद-तुष्टि । बदविति गोष्टि संतकथा ॥ ६ ॥ ऐसा महाराज भक्त वत्सळ । चरित्र तयाचें जे पुर्वील । तें चि आतां वर्णिजेल । अवधान पघळ घावें तुम्हीं ॥ ७ ॥ उपासना श्रीरघुवीर । जो कां उभा विटेवर । पुंडलिकासि देउनि वर । जगदोत्धार करवीतसे ॥ ८ ॥ भक्तरूपें तुळसीदळ । मंथिता मंथिता होतसे माळ । प्रेमरज्जु तो प्रांजळ ।

गुंफिते निर्मळवाणि होति ॥ ९ ॥ ध्यावया ते ऐशि पूजा । आवडि बहु अधोक्षजा । तनुमन भाव वेधिला माझा । छंद दुजा नसे पै ॥ १० ॥ जागृति स्वप्नी तेचि पाहि । स्वयें येऊनि विठाबाई । म्हणे उठ लेखणी घेई । वर्णि कांहि संतकथा ॥ ११ ॥ म्हणुनि लिहितो हा चि ग्रंथ । आधार नाहिं कोणता यातें । स्वमुखें येऊनि पंढरीनाथ । चारित्रें सांगत भक्तांचीं ॥ १२ ॥ तरि भगवत्‌भक्तामाजी मुगुटमणी । महारुद्र जो का वैष्णवजनीं । तयाचा अवतार जाहला मेदिनि । कथन श्रवणीं ऐका तें ॥ १३ ॥ पूर्वाध्याई इतिहास । नाम तयाचे श्रीरामदास । प्रत्यक्ष स्वमुखें जानकीनिवास । उपदेश देउनी ठेवियले ॥१४॥ जंबुक्षेत्र गंगातीरीं । पंचवट असती ज्यामाझारी । पंचवटि ते जांबनगरी । महात्म गंगेचें थोर ॥ १५ ॥ पंचवटी ते दुसरी प्रांजळ । क्षेत्र आहे नाशिकाजवळ । तेथें उपदेश जाहला केवळ । बोलति सकळ नरनारी ॥ १६ ॥ परि तें नव्हे सांगणि ऐकणी । ठाउक आहे ते लिहितो लेखणी । प्रसिध्द वर्णिलें स्वामिनि । अभंगवचनि तें खरें ॥ १७ ॥ यालागि जांब तेचि पंचवटि । श्रीरामाची तेथें चि भेटी । प्रत्यक्षता प्रघटोनि सृष्टि । घडलि गोष्टि अनुग्रहाची ॥ १८ ॥ रामदासनाम स्वामितें । ठेविले श्रीरामें सद्गुरुनार्थे । याचा परिसा कांहीं अर्थ । चतुर श्रोते पंडित हो ॥ १९ ॥ दास्यत्वभक्ति श्रीमारुतीची । हे चि येक युक्ति साची । दुजी स्थिति नेमाची । सदा मनाची उन्मनता ॥ २० ॥ दास ऐसें अक्षरातें । विलोम करितां सदा होते । आपणाकडे जो मुर्डुन पाहत । कळेल अर्थ तयासि ॥ २१ ॥ तिजा अन्वय अणीक पाहातां । राम चि अवघा कीं तत्वता । दास्य करावया पुर्ता । आपण सर्वथा वेचळेपणें ॥ २२ ॥ असो ऐसे अनेक अर्थ । रामदासपदि ज्या शोभत । प्रत्यक्ष अवतार श्रीहनुमंत । मानव संत कलिमाजि ॥ २३ ॥ अनुग्रह देऊनि श्रीरामें । पाचारिले रामदास नामें । सुचविला पुर्विल नेम । जगदोध्दार करावया ॥ २४ ॥ रामदास स्वामिनि ते कालिं । जोडिलिसे बध्दांजुळि । म्हणति मजला सर्वकाळि । भूमंडाळे रक्षावें ॥ २५ ॥ हास्य करुनि श्रीरघुवीरें । बोलते जाले

जानकीवर। सोडुनिया तुजला बा रे। नसें च बा रें क्षणभरीं॥२६॥ जैसें मछ न सांडि उदकाला। भक्तहृदय तैसें आह्माला। त्यागितां मुख्य प्राणाला। काय तनुला ठेवणें ते॥ २७॥ ऐसी खूण सांगतां स्वामी। संतोष जाहला अंतर्यामीं। मस्तक ठेउनि श्रीपादपद्मीं। निरंतर नामीं रंगले॥ २८॥ अभय देउनि रामदासाते। अदृश्य जाहले श्रीरघुनाथ। घरासि येउनि मग मातेतें। नमन निरुते पै केलें॥ २९॥ ज्येष्ठ बंधुसि नमिता पाहिं। उचलोनि धरिले तात्काळ हृदयिं। समजलि जननी राणुबाई। ज्ञान देहीं जाहलें तें॥ ३०॥ म्हणे याची उदास वृत्ती। मूळिं च आहे अंगिं विरक्ति। तशात भेटला श्रीरघुपति। प्रत्यक्ष मूर्ति ज्यालागिं॥ ३१॥ आतां ह्यातीचा जाईल कुमर। बंधन करावें यासि निर्धार। यालागिं केला असे विचार। लग्न साचार करावया॥ ३२॥ सूर्याजिपंत कीर्तिवंत। वृत्ति जयाची बहुत। तयाचिये निजपुत्रातें। न देई वधु ते कोण जगिं॥ ३३॥ सांगावयासि नोवरि येतां। त्रास येतसे स्वामिचे चित्ता। पळोनि जावें सर्वथा। हुडकितां सापडूं नये कवणासि॥ ३४॥ कोणि येके दिवसिं समर्थानिं। विवाहासि निश्चय केला म्हणोनि। विचित्र केलि असे करणी। ऐका श्रवणी श्रोते ते॥३५॥ ग्रामासंनिध्य उदक वाहतसे। तया तीरीं वृक्ष अश्वत्थ असे। बैसल्या कोणि तेथें न दिसे। दाटि असे पर्णाची॥ ३६॥ झाडावरि न कळतां कोणा। बैसले जाउनि घातले आसना। येकाग्र वृत्ति लाउनि ध्याना। धरिले मौनालागिं पै॥ ३७॥ इकडे ज्येष्ठ बंधु माता। शोध करिति बहुत पंथा। परि ठिकाण नाहीं सर्वथा। करिति नवस देवता बहुत॥३८॥ म्हणति कैचे धरिले लग्न। मुळिं च जाहलें असे विघ्न। राणुबाईसि अन्नपान। कैचे नयन शिणलेती॥ ३९॥ ऐशा प्रकारें दोनि दिवस। गुप्त जाहले रामदास। तो अकस्मात येत्या मुलास। पडले दृष्टिस महाराज॥ ४०॥ अर्भकें तेणें घरासि येऊन। सांगितलें स्वामि आहेत म्हणून। धाविनले सकळ जन। पाहावया जाण तया वृक्षा-धरि॥ ४१॥ तव महाराज समाधिस्त। येकाग्रचित्ते बैसले होते।

ध्वनि पडतां चि श्रवणातें । जाहले टाकिते उडि खाली ॥ ४२ ॥ त्या पिंपळाखालें उदक । तयांत पाण मोठे खडक । कपाळासिं लागतां थडक । टेंगुळ निघें आलें तयाचें ॥ ४३ ॥

× × × × । × × × × ।

आवाळु होउन ते राहिले । लेकुरा नेले घरास ॥ ४४ ॥ बहुतप्रकारें समजाऊन । संवत्सरिं त्या राहाविलें लग्न । पुढें जाहलें जें कारण । तें हि कथन श्रवण करा ॥ ४५ ॥ पूर्व संकेत ब्राह्मणउदरिं । जन्मलि असे जे कां मगरि । स्वामिलागि ती नोवरि । आलि निर्धारिं तत्समईं ॥४६॥ रामदास महाराज समजोनि मनिं । स्वस्त राहिले अंतःकर्णि । म्हणति ब्रह्मदेवें गोविलें वचनिं । करावि वाणि सत्य तया ॥ ४७ ॥ ऐशा विचारें स्वामि समर्थ । जो कां अवतार श्रीहनुमंत । उगे चि राहिले असति निवांत । संतोषचित्तें निजसदनिं ॥ ४८ ॥ माता म्हणे रघुपतिनें । गुण दिधले पुत्रालागुन । नवस अर्पिति प्रीति करुन । आनंदलें मन सर्वांचें ॥ ४९ ॥ मुहूर्त पाहून उतम तिथी । निश्चय केला विवाहाप्रति । मंडप घातला परम युक्ति । धाडिलि लग्नपत्रें सर्वांसि ॥ ५० ॥ व्याहि जामात आदि करुन । आप्तवर्ग मिळाले पूर्ण । याज्ञिक सकळ होऊन । अंत्रपाट जाण धरियेला ॥ ५१ ॥ मंगळाष्टकें ब्राह्मण म्हणति । सावधान वदोनि अक्षता टाकिति । तये काळिं स्वामिनिं चित्तिं । समजोनि निश्चिति पळाले ॥ ५२ ॥ निरंचि आज्ञा केलि प्रमाण । आतां कासया येथें राहणें । ऐशा विचारें गेले निघोन । रामदास जाण ते काळिं ॥ ५३ ॥ मंदमति कोण्ही प्राणि । विपरीत बोलति स्वामिगुणि । सावधान म्हणतां सर्वांनिं । सावध मनिं मग जाहले ॥ ५४ ॥ प्रत्यक्ष अवतार हनुमंताचा । मुळिं असावधपणा तयासि कैचा । जयाचे स्मरणें लेश भ्रांतीचा । उरे कैचा इतर जीवा ॥ ५५ ॥ असो तया अज्ञानानें । काय कळे तया मुळिचा अर्थ । जन्मांतरिं मी तयाचा अंकित । वास्तवीक तें वाणियेलें ॥ ५६ ॥ पुढें कारण कैसें जाहलें । तें हि पाहिजे श्रोतिं ऐकिलें । लग्न जाउनि टाकियेले । अंगीकारिले नसे जोंपे ॥ ५७ ॥ जन्मांतरिंचें

ज्ञान तिजला । नाहिं वर दुजा धरिला । अनुष्ठानिं देह योजिला । नाहिं पुरला संकर म्हणुनि ॥ ५८ ॥ तयां कारणास्तव मागुति । रामदास जन्मले पुन्हां क्षिति । श्रीवछ लांछन देउनि प्रीति । अवतार धरविति श्रीरघुवीर ॥ ५९ ॥ ग्रंथसमाप्तिसि तें आख्यान । परिसोत सकळ भावीकजन । प्रस्तुत लीला हे चि श्रवण । येकाग्र मनें करावे पै ॥ ६० ॥ हनुमंत अवतार पूर्ण ज्ञानि । वैराग्याची जो खाणी । लग्नकाळिं तेणें निघोनि । प्रवेश वनिं केला असो ॥ ६१ ॥ अश्वत्थाचीं जांबक्षेत्रांत । पूर्वीं झाडें होतिं बहुत । विस्तीर्ण शाखा गगनचुंबीत । थोर निश्चितीं अतिशयें ॥ ६२ ॥ तया वृक्षावरि पाहे । वस्ति केलि दिनत्रय । इकडे खिन्न जाहलि आहे । रेणुकामाय जननी ते ॥ ६३ ॥ मग ज्येष्ठ पुत्र अध्यात्मयुक्ति । बोध केला जननीप्रति । वऱ्हाडि गेले देशाप्रति । खिन्न चित्तिं होउनि ॥ ६४ ॥ पुढे रामदास गुरु माउली । जांबेतुनि निघाली । पंचवटिस जाति जाली । नाशिकाजवळि जे क्षेत्र ॥ ६५ ॥ श्रीरघुपतीचें जेथें स्थान । पुराणप्रसिद्ध असे जाण । तेथें जाउनि केलें नमन । कर जोडून साष्टांगें ॥ ६६ ॥ प्रत्यक्ष प्रघटोनि श्रीरघुनाथ । आलिंगन दिधले स्वामिते । मस्तकिं ठेउन वरदहस्त । केले सनाथ श्रीरामें ॥ ६७ ॥ म्हणाति बापा मगरीला । सेखीं झोला देउनि तयेला । टाकुनि अवघा लग्नसोहळा । इकडे आलासि पळोनि ॥ ६८ ॥ आतां हे चि तरि करणें । जनास सन्मार्गे लावणें । म्लेंछें गांजिली धरा जाण । धर्म ग्लान जाहलासे ॥ ६९ ॥ शिव नामें अंश आपुला । सांप्रत राजा निर्माण जाला । साह्य होउनि तयाला । अनुग्रह तयाला करावा ॥ ७० ॥ नळादिक वान्नर । भेटतिल ते हि सारे । तरी करुनि जगदोध्दार । भक्ति साचार वाढवावी ॥ ७१ ॥ अवश्य-म्हणुनि रामदासें । नमन केलें रघुपतिस । पुरश्चरण करावयास । योजिलें स्थानास तें ऐका ॥ ७२ ॥ पंचवटीसनिध ग्राम । टाकळि ऐसे जयासि नाम । गुम्हा सुंदर तेथें रम्य । जागा परम शुभ्र केलि स्वामिनिं ॥ ७३ ॥ तये स्थानिं मंत्राचें । पुरश्चरण करितां साचें । घय द्वादश वर्षांचें । सेम-

र्थाचें ते काळीं ॥ ७४ ॥ पुढें टाकळीपासून कोश येक । ग्राम जें कां दशपंचक । तेथें गेले स्वामी देख । कोणि येकें दिवशीं पै ॥ ७५ ॥ गंगातीरीं माध्यानिकासि । बैसले होते स्नानसंध्येसी । विचित्र जाहलि गोष्टि कैशी । सविस्तरेंसी श्रवण करा ॥ ७६ ॥ उध्धव शिष्याचे जन्मकथन । येथें आले अनुसंधान । तें चि आता अनुक्रमपूर्ण । समूळ सांगणें यथामति ॥ ७७ ॥ नाम जें कां दशकपंचक । तेथील होता ब्राह्मण येक । अत्यंत भाविक पुण्यश्लोक । भार्या देख पतिव्रता ॥७८॥ द्रव्यवान तो कुळकर्णी । निष्ठा जयाचि श्रीरामचरणीं । पारि संतान नाहिं जनिं । क्षयरोग आणि वेळोवेळां ॥ ७९ ॥ दैवी अवषधि उपाय केले । अनुष्ठानासि ब्राह्मण घातले । शेवटीं मरण प्राप्त जाहले । स्त्रीनें आरंभिले सहगमन ॥ ८० ॥ मग स्मशानभूमीसि तयें सतीनें । विधि केला समग्र जाण । तो अकस्मात देखिले दुरोन । भव्य पूर्ण श्रीस्वामि ॥ ८१ ॥ दर्शनिं प्रशस्त पुण्यपुरुष । पाहुनि अंतरिं वाटले मनास । नमस्कार करुनि तयास । अग्निप्रवेश मग करावा ॥ ८२ ॥ त्यालागीं तिकडे जाऊं पाहातां । लोक म्हणति त्याळी तत्वता । तेव्हां सति ते सांगे सर्वथा । ठेविले माथा संतपाईं ॥ ८३॥ लगबगेंसि जाऊन तियेनें । वंदन करितां स्वामीं चरण। बैसले होते नेत्र झाकून । येकाग्रचित्तें करुनि ॥८४॥ मस्तक ठेवितां पदकमळा । कुंकुम पाहिले भव्य माळा । म्हणुनि आसिंर्वाद पूर्ण दिधला । समर्थानिं भला बाईसि तया ॥ ८५ ॥ अष्ट-पुत्रा सौभाग्यवती म्हणतां । बोलति जाहलि ती माता । माहाराज माझी कोण अवस्था । मागें पाहतां कळेल पै ॥ ८६ ॥ या जन्मीं तो संतान नाहिं । सौभाग्याची गति हे पाहि । आतां माहेर त्वचाहिं । करणें पाईं ठेविये शिर ॥ ८७ ॥ ऐसें ऐकुनि रामदास । म्हणति अभिमान याचा रघुपतीस । आणविलें तया प्रेतास । अंगावरून हस्त फिरविले ॥ ८८ ॥ मग तेथें यावया प्राण । काय उशिर असे जाण । प्रत्यक्ष मारुति मुख्य प्राण । अवतार जाण तयाचा हा ॥ ८९ ॥ उत्पति करणें ब्रह्मीयासि । पाळन अधिकार श्रीविष्णुसि । फंटाळा

आक्रिया मानसिं । संव्हार जगासि करति शिव ॥ ९० ॥ असो महा-रुद्राचा तो अवतार । रामदास जाहाला पृथ्वीवर । तयानि स्पर्शितां कृपाकर । कांपें शरीर प्राण यावया ॥९१॥ जेवीं यमापासुन मार्कंडेयासि। सोडविलें शिवें नेमेसिं । तैसि गति या ब्राह्मणासि । जाहलि निश्चयेसि कालमाजि ॥ ९२ ॥ निद्रिस्तापरि उठोन । करितां जाहला नामस्मरण । येथें आणिले कां हो म्हणे । गंगातीरीं जाण आपणासि ॥ ९३ ॥ मग तो आनंद सांगणें किति । धन्य कृपालु श्रीगुरुमूर्ति । अद्भुत लीळा मांडिलि जगतिं । येश गाति जन सर्व ॥ ९४ ॥ या चि जन्मीं सौभाग्य भोगणें । आणि अष्ट पुत्रांतें प्रसवणें । ऐसें बोलीत सच्चिद्घन । करुणा वचनें बाईसि त्या ॥ ९५ ॥ मग दृढ मिठि घालोनि चरणिं । पदर पसरला उभयतानिं । करुणा भाकिति दीनवचनिं । अभयदानि रामदासातें ॥ ९६ ॥ म्हणति महाराज दर्शन । पुन्हा होईल कोठें जाण । विचारितां ऐसि खूण । तया स्थान सांगितलें ॥ ९७ ॥ पंधराशें पंच्येताळि-सांत । लीळा केलि ही समर्थ । पुढें वर्तलें कैसें हें श्रोते । अनुक्रमें श्रवण करा ॥ ९८ ॥ स्त्रीपुरुष गेलि घरासी । आनंदयुक्त समारंभेसि । आप्तवर्ग आले भेटिसि । आश्चिर्य मानसि करिति ते ॥ ९९ ॥ उभयतासि रात्र दिवस । ध्यानिं मनिं श्रीरामदास । प्रत्यहिं येति दर्शनास । तये विवरास स्वामीच्या ॥ १०० ॥ ऐसे लोटतां कांहिं दिन । जाहलि माता ती गर्भिण । नउ मास होतां चि पूर्ण । प्रसवलि जाण सुपुत्रा ॥ १ ॥ संतोष पावोनि उभयतानि । संकल्प केला अंतःकरणिं । अर्पावया स्वामि चरणिं । लेंकुरा लागोनि सांगो पै ॥ २ ॥ तात्काळिक द्विजें तेणें । निवेदन केला वृत्तांत जाउन । श्रीगुरुराय हास्य करुन । म्हणति जन आमुचे चि ॥ ३ ॥ परि आग्रह तयाचा बहुत । अर्पण करावा आपुला सुत । मनोभंग न करावा ऐसें वृत्त । साधुसंत आचरति ॥ ४ ॥ निग्रह पाहुनि स्वामिनिं । उत्तम म्हणति विप्रालागुनि । मग तो ब्राह्मण घरासि जाउनि । सांगे वदनिं स्त्रियेसि ॥ ५ ॥ त्रयोदश दिनिं उत्सव ऐसें । नाम ठेविलें त्या बाळास । पूर्ण होतां

तीन मास । गेलि स्वामिस अर्पावया ॥ ६ ॥ स्वापुरुष उमयतां तेणें । षेडशोपचारें करून अर्चन । शेवटि केलें समर्पण । उदक सोडुनि पुत्रफळ ॥ ७ ॥ सद्गुरुरायें श्रीरामदासें । बोसंगा घेतलें उत्थवास । सांगितलें तया मातेस । थोर मुळास होऊं या ॥ ८ ॥ कांहीं प्रौढ होतां चि जाण । आम्हि आपुला येऊं घेउन । आज्ञा दिधलि ऐसे सांगून । जावया पूर्ण स्वगृहासी ॥ ९ ॥ पुढें कांहिं वर्षांनंतर । प्रौढ जाला कुमर । स्वामिनिं आणउनी मग साचार । केला संस्कार व्रतबंध ॥ ११० ॥ प्रथम शिष्य तो उध्धव पाहि । निष्ठा जयाची श्रीगुरुपाईं । अखंड विनटला सेवे ठाईं । भक्ति नाहिं दुजी ते ॥ ११ ॥ असो समर्थांनिं अनुष्ठान । समास केलें पुरश्चरण । पंचवटिकेस येऊन । केलें आराधन श्रीरघुवीरा ॥ १२ ॥ तों रामजयंतिउछाह आला । चैत्रमास प्राप्त जाहला । ठेउनि घेतले श्रीस्वामीला । शिष्टजनाला आनंद बहु ॥ १३ ॥ पंचवटिकेसि देवालईं । पुराण होतसे प्रत्यहिं । रामायणकथा वाचिति पाहि । अर्थ कारिति साई श्रीरामदास ॥ १४ ॥ संकेत श्लेषार्थ ऐकुनि । शिष्टजनासि हर्ष मनिं । अष्टौ भाव उत्पन्न होऊनि । अंतःकर्णि सद्गद ते ॥ १५ ॥ अधिकार पाहुनि स्वामिचा । आग्रह पडला समस्ताचा । व्यासपीठीं बैसोन साचा । ग्रंथ वाचा ह्मणति पैं ॥ १६ ॥ तये काळीं श्रीगुरुसमर्थ । वंदन करुनि उपास्यातें । आरंभ केला रामायणातें । मग जाहलें तें ऐका ॥ १७ ॥ रामदासस्वामि प्रत्यक्ष जेव्हां । पुराण सांगत बैसले तेव्हां । आश्चर्य वाटलें सकळ देशा । उल्हास सर्वां जाहला मनिं ॥ १८ ॥ वेश पालटूनि सकळ दैवतें । बैसति जाहलि देवालयातें । रामायणाची प्रीति महुत । ऐकावयातें हरिहरा ॥ १९ ॥ बटुवेश धरुनि हनुमान । तो हि बैसला तयांत जाण । ह्मणे माझा अवतार पूर्ण । कराया श्रवण सांगतो तें ॥ १२० ॥ रामदासस्वामि महासमर्थ । चुकेल कोठें तयाचा अर्थ । रामायण ज्या सकळ विदित । शेवटपर्यंत ज्यालागीं ॥ २१ ॥ अनुक्रमें सांगत प्रकर्णे । केलें सहजी लंकावर्णन । कथिलें रावणाचें

स्थान । आदिकरून वृक्ष तेथिल ॥ २२ ॥ मंदिराजवळ दशवदनाचें । झाड होतें कन्हेरीचें । पांढरें किंवा आरक्त तयाचें । विचारिलें साचे पुष्प द्विजे ॥ २३ ॥ बटुवेशें जो ब्रह्मचारि । प्रश्न करितां च हा वैखरी । झिडकाविति नरनारि । जन सारि सभेतील ॥२४॥ ह्मणति मुला यय तुझें कहान । विचारिसि काय ह्मणून । स्वामी समर्थ सर्वज्ञ । समजलि खूण मनीं ते ॥ २५ ॥ पांढरीं कन्हेरि ह्मणून । उतर केलें तयालागुन । नव्हे म्हणून तो ब्राह्मण । वाद पूर्ण घालितसे ॥ २६ ॥ सेवटिं म्हणति स्वामि तया । पाहावें जाऊन अक्षोणीया । तात्काळ दैवत तया ठाया । पाहुनि आले लंकेसि ॥ २७ ॥ पांढरि पुष्पें देखून डोळा । विस्मय अंतरीं फार जाहला । पुन्हा मागुति प्रश्न केला । रामदासाला मुख्य हनुमंत ॥ २८ ॥ सीताशुध्दिसि जातां आपण । आरक्त दिसलिं कां सुमनें । तये काळिं स्वामिनिं खूण । केलि निवेदन मारुतिसि ॥ २९ ॥ म्हणति नेत्रासि आरक्तता । आलि होति क्रोधें करूनि तलता । जें जें पाहिलें त्या त्या पदार्था । दिसला सर्वथा तांबडेपणा ॥ १३० ॥ नातरि शिवपुजेसि रावणातें । पुष्पें सदा पाहिजे श्वेत । यालागिं आम्हि केला अर्थ । पांढरा सत्य कन्हेर ह्मणुनि ॥ ३१ ॥ येकवाक्यता होतां ऐसि । नवल वाटलें सर्व देवासि । धन्य म्हणाति रामदासासि । निश्चयेंसि अवतारी ॥ ३२ ॥ साधुस्वरूप ते सर्वज्ञ । आम्हि दैवतें किंचिज्ञ । दिधलें गाढ आलिंगन । हरिहरानें स्वामीतें ॥ ३३ ॥ जगद्गुरु श्रीभगवान । दाशरथी जो रघुनंदन । हुर्मुजी वस्त्रें हातिं घेउन । केलिं अर्पण रामदासा ॥३४॥ म्हणति माझा मुख्य प्राण । अवतार घेतलासि पृथ्वीं जाण । आतां करि जग पावन । देऊन दर्शन तयासि ॥ ३५ ॥ सिंदुरवर्ण आरक्त भूषण । आवडति तुजला प्रीतिकरुन । म्हणुन अर्पिलिं हुर्मुजी वसनें । करि ग्रहण हीं सर्वदा ॥ ३६ ॥ जगीं हिंडुन तीर्थमिसें । मेळवी प्राणि स्वस्वरूपास । ऐसि आज्ञा अयोध्याधीशें । राम करिति पै दासासि ॥ ३७ ॥ पुढील अध्याईं स्वामि समर्थ । करावयासि निघती तीर्थे । श्रोति असावे सादर कथे । येकाग्रचित्तें करुनि ॥ ३८ ॥

पंढरीनिवास श्रीराम माझा ॥ ग्रंथरूपणी घ्यावया पूजा ॥ उभारूनि सदा भुजा । भक्तकाजा तिष्ठतसे ॥ १३९ ॥ स्वतसिध्द महाराज रामदास । वितविता स्वामि तो स्फुर्तिस । राजारामिं निमित्यास । धरिलि लेखणी उगी च करिं ॥ १४० ॥ भक्तमंजिरी माळा ग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । रामदासस्वामिचरित्रार्ते । अध्याय होत द्वितीय हा ॥ १४१ ॥ श्री राम जय राम जय जय राम अक्षरें । क्षराक्षरातीत तेरा जाणावीं चतुरें । हा मंत्र सुलभ केला स्वामि शंकरें । जळतां हळाहळ शांत केला रघुवीरें ॥ १ ॥

## अध्याय ३

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरु निजआत्मया । परात्परा श्रीगुरुवर्या । सिध्दस्वरूपा अद्वया । करुणालया निजमूर्ति ॥१॥ आठवितां जयाचें ध्यान । जाणीव नेणीव गेली विरोन । आपेआप तेंचि पूर्ण । श्रीरघुनंदन समर्थजी ॥ २ स्तुति स्तवन कैचें काई । आवघी च नटली रामाबाई । परि भक्तीची हि नवाई । बोलं कांहीं अबोल ते ॥ ३ ॥ निर्गुणपण देवें आपुला । गुंडाळुनि समूळ ठेविला । भक्ति सुखा लाचावला । द्विविध जाहला तोचि तो ॥ ४ ॥ आपुलें सुख पाहावया आपण । हस्तिं घेतलें जेवि दर्पण । स्वसुखानंद तेवि भोगणें । देवभक्त होणें पै ॥ ५ ॥ असो ऐसा सद्गुरुनाथ । मूळपुरुष श्रीरघुनाथ । प्रकृति माया जानकीसहित । अनन्युत नमन तया ॥ ६ ॥ गणाधीश सरस्वती । जनक जननी तो चि निगुति । सिध्द स्वामि सर्वांभूर्ति । भरला जगतिं परिपूर्ण ॥ ७ ॥ वंदन करुनि समपदासि । आरंभ केला श्रीकथेसि । तरि बैसा श्रवणासि । स्वस्त मानसिं होउनि ॥ ८ ॥ मागिल अध्याईं जाहलें कथन । रामदासस्वामिसि श्रीरघुनंदन । प्रसादवस्त्रें देउन । रघुराया जन सुचाविले ॥ ९ ॥ नमन करुनि श्रीरामातें । तीर्थमिसें सकळ जगातें । पावन करावया जीवातें । निघाले समर्थ स्वामि मग ॥१०॥ तीर्थें कोण कोण । उत्तम क्षेत्रें दैवतें जाण । नामें करितां तयांचीं श्रवण ।

दोष जाति निवोन ॥ ११ ॥ माहा पातकी दुराचारि । तीर्थावळि जो श्रवण करि । तयालागिं श्रीहरि । मुक्त करि तात्काळ ॥ १२ ॥ यालागिं आवडि कथा सर्वि । श्रोतेजनिं हे परिसावि । रामदासस्वामि महानुभावि । फिरत्या उर्वि ते निघाले ॥ १३ ॥ तये वेळिं उध्दव शिष्य । वय अल्प तयाचे असे । समागमें न्याहावयास । योग्यता नसे किमपि त्या ॥ १४ ॥ तेव्हां स्वामिनिं त्या शिष्यार्ते । वियोगदुःख नसावे यदर्थ । प्रतिमा करूनि गुन्हेंत । स्थापिला हनुमंत गोमयाचा ॥ १५ ॥ तये मारुतिचें सेवेशि । उत्धव राहिले नेमेसि । रामदासस्वामी काशीसी । भागीरथीसी प्रथम गेले ॥ १६ ॥ क्षेत्रविधि सफळ जाहला । शिष्टजनिं सत्कार केला । ठेउनि घेतलें स्वामिला । आनंद जाहला दर्शनें ॥ १७ ॥ हनुमंतघटा प्राचिन । काशिक्षेत्रि होता जाण । परि तेथें हनुमान । दैवत जाणें नव्हतें पै ॥ १८ ॥ हें पाहुनि स्वहस्तें । स्थापिला तेथें श्रीहनुमंत । जन लाउनि उपासनेतें । अयोध्येतें मग आले ॥ १९ ॥ श्रीरघुपतीचें घेतां दर्शन । प्रेमभरतें दाटलें पूर्ण । देवें दिधलें आलिंगन । रामदास मन सुखावलें ॥ २० ॥ म्हणति सखया कांहिं दिवस । वास करावया भूमिस । जग योजुनि शुध्ध मार्गास । सांप्रदायास रुढवावें ॥ २१ ॥ आज्ञा वंदुनि श्रीगुरुसमर्थे । वाढविला निजपथ । वास्तव्य करुनि अयोध्येंत । अनुग्रहित केले जीव ॥ २२ ॥ तेथुनि पुढें गोकुळास । प्रयाण केलें रामदासें । नंतर मथुरा वृंदावनास । पाहतां दृष्टिस आनंदले ॥ २३ ॥ ठाईं ठाईं मठ करुनि । शिष्य स्थापित चालिले अवनिं । द्वारकेमाजि जाउनि । चक्रपाणि देखियेला ॥ २४ ॥ हिमालयाचे अलिकडेस । श्रीनगर पडलें दृष्टिस । तेथें राहिले वस्तीस । स्वामि रामदास सहज लीलें ॥ २५ ॥ तव तेथें नानकपथि । शिखाचा गुरु जो निश्चिति । शरण येऊनि स्वामिप्रति । प्रश्नोक्तीतें आरंभिलें ॥ २६ ॥ पाहुनि शुध्द अंतःकर्ण । सांगितली निजात्मखूण । संशय टाकिला छेदून । समाधान केलें पै ॥ २७ ॥ शिखाचा जो गुरु जाण । दिधला तयासि हुर्मुजिबाणा । आपण निघोनी हिमालयस्थाना । योगिजना अवलोकिलें ॥ २८ ॥ बद्रिकेदार पाहून ।

नारायणासि वंदन करून । श्रीश्वेत जो हनुमान । देखिला जाण ध्यान पर्वतिं ॥ २९ ॥ तेथें जातां रामदास । रम्य वाटलें मनास । कांहि दिवस केला वास । अनुष्ठानासि आरंभिले ॥ ३० ॥ संचार नसे तये ठाईं । मानवाचा काळत्रईं । शंकराचार्य मात्र पाहि । गेले ठाईं त्या स्थाना ॥ ३१ ॥ अत्यंत हवा कठिण । शैत्य वृष्टि रात्रंदिन । न राहाति कदा प्राण । शैत्य संपूर्ण ते स्थळिं ॥ ३२ ॥ असो रामदासस्वामिसि । थंडि लागतां शरिरासि । अपुर्व जाहली गोष्टी कैसी । ते मानसीं श्रवण करा ॥ ३३ ॥ आपुला अवतार जाणून । जागृत जाहले श्रीहनुमान । मस्तकिंचा टोप काढून । स्वामिस जाण दिधला तो ॥ ३४ ॥ मेखळा अर्पोनि आंगिचि । दवडिली पीडा शैत्याची । येकात्मता आहे मुळींची । गोष्टि कैचि दुजी ते ॥ ३५ ॥ जेवि समुद्र आणि भिन्न गारा । उगा चि भास दिसे दुसरा । नांतरि काय भिन्नत्व नीरा । आलो आकारा म्हणुनि ॥ ३६ ॥ अग्निपासुनि दीप जाला । तरि काय द्वैत तयाला । तैसे मारुति आणि रामदासाला । भेद तयाला न दिसे पै ॥ ३७ ॥ असो उत्तरमानस करूनि पूर्ण । वडियाजगन्नाथि येऊन । उपदेशिला येक ब्राह्मण । पद्मनाभ नाम तयाचें ॥ ३८ ॥ मठपति करूनि तयाते । पुढें चालिले तीर्थें करीत । ठाईं ठाईं उध्दारीत । शरण येत तयासि ॥ ३९ ॥ ऐशा प्रकारें भ्रमण करित । समुद्रतीरा आले निश्चित । श्वेतबंधरामेश्वरातें । देखिले समर्थ स्वामिंनि ॥ ४० ॥ प्रत्यक्षता प्रवटून । अलिंगन दिधलें श्रीरामानें । समर्थांनि पुजन करून । राहिले दिनत्रय तेथें ॥ ४१ ॥ पुढें चमत्कार जाहला देखा । पाहावया निघाले स्वामि लंका । बिभीषण अत्यंत जीवीचा सखा । भेटिस देखा निघाले पै ॥ ४२ ॥ मनोवेगें संचरिं । मार्ग क्रमोनि लंकानगरि । प्रघट जाहले क्षणाभीतरीं । मंदिरिं रावणानुजाचे ॥ ४३ ॥ भागवतोत्तम तो प्रेमळ । श्रीरामभक्त प्रांजळ । रामदासस्वामिसि पाहतां केवळ । भाव दाटले अष्टौ अंगीं ॥ ४४ ॥ धेनुसि पाहुनि वत्साते । त्वरा होतसे अत्यंत । तैसि गति बिभीषणाते । जाहलि निश्चित ते काळिं ॥ ४५ ॥ सिंव्हासनाखालिं उडि । घातलिसे

परम आवडि । चरण धरिले लवडसवडि । उभविलि गुडि आनंदाची ॥ ४६ ॥ ह्मणे आजिचा धन्य दिवस । दृष्टि पडिले रामदास । बोवाळिजे सर्व सुखास । पाहातां पायास स्वामिच्या ॥ ४७ ॥ भेटले आम्हा निज वैष्णव । तेणें घडलि सकळ पर्वे । कृतकृत्यता मानुनि भावें । अर्चिले देव श्रीस्वामि ॥ ४८ ॥ मग हात जोडुनि बिभीषणानें । रामदासा विनविले जाण । म्हणे महाराज भुकेले श्रवण । कीर्तन भोजन इछिति ॥ ४९ ॥ कल्युग प्राप्त जाहल्यावर । नामदेव आणि ज्ञानेश्वर । येथें येऊन कीर्तन गजर । केला साचार कांहि दिन ॥ ५० ॥ तया अलिकडे कांहीं । श्रवणासि कथा मिळालि नाहिं । ह्मणोनि विनंति केलि पाईं । इछितो ह्रदईं वृत्तीनें ॥ ५१ ॥ बिभीषण भावें वदतां ऐसें । रामदासस्वामि परम उल्हासें । उभे ठाकले कीर्तनास । पाहणें तयास काय मग ॥ ५२ ॥ तये काळि प्रेमांत येउन । समर्थे अभंग केला जाण । धन्य लंका ह्मणून । अद्यापि जन ते सकळ गाति ॥ ५३ ॥

धन्य हें नगर धन्य बिभीषण । धन्य वरदान समर्थाचें ॥ १ ॥
समर्थाचे कृपें वर हा पावला । चिरंजीव जाला कल्प येक ॥ २ ॥
कल्प येक वस्ति लंकेमाजि जाण । मारुति रक्षण जयालागीं ॥ ३ ॥
जयालागि कृपा समर्थ हनुमंत । उपासना व्रत राघवाचें ॥ ४ ॥
राघवाचे कृपें भेटि याची जालि । लंका देवी आलि भेटिलागिं ॥ ५ ॥
भेटिचेनि योगें धन्य आपणा ह्मणवि । दास ह्मणे पदवी तुह्माकरितां ॥ ६ ॥

ऐशा प्रकारें सप्त दिवस । उत्कृष्ट जाहला कीर्तनरस । नंतर निरोप रामदास । बिभीषणास मागितला ॥ ५४ ॥ येउनि पुन्हां श्वेतबंधासि । नमन केलें रामेश्वरासि । पुढें हंसक्षेत्रासि । येत तीर्थासि देखियेले ॥५५॥ तया नंतर आद्यरंग । मध्यरंग अंतिरंग । दर्शन जनार्दन अभंग । दर्शनें सांग घेतलिं तयाचीं ॥ ५६ ॥ मग येउन गोकर्णासि । अर्चियेले महाबळेसि । सांप्रदाय वाढउनी शिष्यासि । स्थापिले मठ तेथें ॥५७॥ शेषाचळ पर्वत पाहिला । श्रीशैल्य मल्कार्जुन केला । अहोबळ नरसिंह

पूजिला । नमस्कारिला पानक नरसिंव्ह ॥ ५८ ॥ राचोटिस वीरभद्र । पंचमहालिंग किष्किंदा नगर । देखिले पंपा सरोवर । ऋषिमुख थोर पर्वतादि ॥ ५९ ॥ हंपिविरूपाक्ष करून । स्वामि कार्तिकासि आले जाण । भ्रमण करित काशी दक्षिण । केलें अवलोकन करवीर तें ॥६०॥ दिनत्रय करूनि वास । येणें केलें रामक्षेत्रास । तेथुन पुढें रामदास । शयाद्रि पर्वतास अवलोकिलें ॥ ६१ ॥ श्रीकृष्णेचा उगम जेथें । महाबळेश्वर अर्चिला तेथें । भीमाशंकर महातीर्थ । तें हि निरतें केलें पै ॥६२॥ गंगा 'उद्भव' जयास्थानि । त्रिंबकेश्वरातें तया पूजोनि । पंचवटिकेसि जाउनि । च्यापपाणि पुन्हा वंदिला ॥ ६३ ॥ मानुषि अमानुषि । स्थानें पाहतां रामदासासि । द्वादश वर्षे तीर्थासि । भ्रमण स्वामिसि जाहले ते ॥ ६४ ॥ सिंव्हस्त पुढें प्राप्त होतां । इछा जाहलि सहजीं समर्था । गंगातीर पाहावया चित्ता । अनुक्रमें तत्वता निघाले ॥ ६५ ॥ आदौ भेटून उध्दव शिष्यासि । फिरत फिरत गेले पैठणासि । देखून येकनाथ समाधिसि । परम मनासि आनंद ॥ ६६ ॥ प्रत्यहिं करावे तेथें कीर्तन । कथेसि मिळति बहुत जन । प्रतिष्ठान क्षेत्रिंचे विद्वजन । असंख्य श्रवण करिति ते ॥ ६७ ॥ श्लेषार्थ संकेत प्रश्नोत्तर । परस्परें होतसे रंग बहर । कांहीं दिवस ऐशा विच्यारें । राहिले थोर प्रतिष्ठानिं ॥ ६८ ॥ कोणीयेक दिवसिं गळेल हातिं । घेतलि उगि च सहज स्थिति । गंगातीरीं आले निगुति । मुलांत खेळति निश्चयें ॥ ६९ ॥ शिष्ट जनानि हे पाहतां । बोलति काय तेंव्हां समर्था । अयोग्य दिसे हें सर्वथा । तुम्हा संताळागिं पै ॥ ७० ॥ तेसियांत कोण्हियेक ब्राह्मणें । श्रीगुरुरायासि केला प्रश्न । ह्मणे स्वामिया संधान । जाणतसा पूर्ण काय गळोलिचे ॥ ७१ ॥ राम अवतारीं ज्या हनुमंतें । असंख्य मारिले राक्षसातें । शरसंधान अखंडित । श्रीरघुनाथ समागमिं ॥ ७२ ॥ तो चि हा महाराज रामदास । कोणति विद्या नसेल तयास । हास्य करूनि त्या द्विजास । ठाउक आहे ह्मणति आम्हांप सर्व ॥ ७३ ॥ तव इतर्कीयांत धार आकाशिं । दृष्टि पडली समस्तासि । आज्ञा करिति क्षेत्रवासि ।

मारावयासि स्वामितें ॥ ७४ ॥ ह्मणोनि तयेसि येक खडा । ह्मणति भूमिसि उवकर पाडा । नाहिं तरि गळोल सोडा । खेळ मोडा यावा तुह्मि ॥ ७५ ॥ तेव्हां स्वामिनिं सकल् खड्यांत । घार मारुनि पाडिलि भूमीते । नवल करिति क्षेत्रस्थ । द्विज समस्त पैठणीचे ॥७६॥ मग ह्मणति रामदासातें । घेणें लागे प्रायश्चितातें । हिंसा घडलि निश्चित । असतां मत मेह्मच्यारि ॥ ७७ ॥ आज्ञा वंदुनि तये संधिं । स्वामिनिं केला सफळ विधि । ब्राह्मणासि बोलति दयानिधि । आतां आवधि कासया ॥७८॥ प्रायश्चित करविलें परि । सजीव केलि नाहीं घारि । येकनाथासि निर्धारिं । असे विध्यारिं छळियेलें ॥ ७९ ॥ आतां पक्षी सजीव करणें । तरीचं तुह्मि घरासि जाणें । असे बोलुनि घातलि आण । ब्राह्मणासि पूर्ण स्वामिनिं ॥ ८० ॥ द्विज ह्मणति कलियुगातें । सजीव केयि मेले होते । शास्त्ररीत्या प्रायश्चित । करणें सत्य ठाउक आह्मा ॥ ८१ ॥ ऐशापरि मांकित करुणा । द्रव आला स्वामिचे अंतःकर्णा । घारि जवळि जाउनि जाणा । अमृतनयना अवलोकिले ॥ ८२ ॥ पक्षिणिसि घेउन हातावरी । ह्मणति जा बाई उठोन अंबरिं । पिलि जाहलि तुह्मि घाबरि । वाट सारि पाहाताती ॥ ८३ ॥ सांगतां ऐसें त्या घारिसि । सजीव होऊन गेलि आकासिं । ब्राह्मण लागले पायासि । प्रतिष्ठानवासि तया कालिं ॥८४॥ धन्य ह्मणति स्वामीते । मारुति अवतार हा निश्चित । आर्चन करिते जाहले समस्त । गंगातीरस्त जन सारे ॥ ८५ ॥ कितियेक लागले परमार्था । वैराग्य उत्पन्न जाहलें बहुता । शरण जाउनि श्रीसमर्था । लागले पंथा अनेक ॥ ८६ ॥ आदर करुनि रामदासाते । ठेउनि घेतले पैठणांत । लोक येति दर्शनातें । कल्याणार्थ नरनारि ॥ ८७ ॥ समाधिपासि कीर्तन । तृतीय प्रहरिं होतसे जाण । गांवोगांवींचे मिळति जन । आदिकरुनि क्षेत्रांतिल ॥ ८८ ॥ तव तेथें येक ब्राह्मण । आंबड प्रांतांतिल जाण । बैसला होता करावया श्रवण । येकाग्रमनें किर्तनासि ॥८९॥ तयानि योळखिले स्वामिते । सांगितला घरिचा वृत्तांत । माता बहुत क्लेश करित । दर्शनार्थ तुमचे पै ॥ ९० ॥ मग स्मृति होतां जननीची ।

येधली वृत्ति समर्थाची । समाप्ति करुनि श्रीकथेची । वाट जावेची धरिलीसे ॥ ९१ ॥ अति त्वरें चालुनि पंथें । पोहचले आपुले सदनातें । द्वारिं शब्द रघुवीर समर्थ । ह्मणोनि निश्चित गर्जिनले ॥९२॥ भिक्षुकध्वनि पडतां श्रवणिं । भिक्षा घाला ह्मणे जननी । जेष्ठ बंधूची येउनि पाळि । पाहातां तयेनि वोळखिले ॥ ९३ ॥ येजमान घरिंचे आले ह्मणून । सांगितले सर्वांसि जाऊन । तात्काळ आली माता धाऊन । दिधले आलिंगन पुत्रासि ॥ ९४ ॥ गंगाधरबाबा जेष्ठ बंधु । वैराग्याचा केवळ सिंधु । तयाचे नेत्रासि आले बिंदु । सहित बंधु प्रेमळ ते ॥ ९५ ॥ राणुबाई ह्मणे नारायणा । दिसेनासि किं माझ्या नयना । रडोनि गेले डोळे जाणा । बाळा तान्हया काय करूं ॥ ९६ ॥ ततक्षणिं स्वामिनिं । हस्त फिरविला नेत्रावरुनि । दिव्य दृष्टि तेणें करुनि । होता जननी सुखावली ॥ ९७ ॥ हर्ष पावोनि माता वदे । पंच्याक्षरि तूं जाहलासि शुध्द । भूतें दैवतें जगिं प्रसिध्द । जाहली सिध्द तुजलागिं ॥ ९८ ॥ रामदासस्वामिनिं तये काळीं । मातोश्रीस विनंति केली । महद्भूताची झडपणि जाहलि । ह्मणुनि केली अभंगोक्ति ॥ ९९ ॥

## ॥ अभंग ॥

होतें वैकुंठीचे कोनीं । शिरलें आयोध्ये भुवनीं ।
लागे कौसल्ये स्तनिं । तें चि भूत गे माये ॥ १ ॥
जातां कौशिकराउळीं । अवलोकिली भयंकाळी ।
ताटिका ते सळोनि मेली । तें चि भूत गे माये ॥ २ ॥
चवदा संवत्सर तापसी । अखंड हिंडे वनवासी ।
सांगाते भुजंग पोषी । तें चि भूत गे माये ॥ ३ ॥
मार्गीं जातां वनांतरीं । पाय पडला शीळेवरी ।
पाषाणाची जाहली नारी । तें चि भूत गे माये ॥ ४ ॥
वामांगीं स्त्रियेसी धरिले । धाउनि शरयु तीरा आले ।
तेथें भरथासी भेटले । तें चि भूत गे माये ॥ ५ ॥

सर्वभूतांचें हृदय । नाम त्याचें रामराय ।
रामदास नित्य गाय । तें चि भूत गे माये ॥ ६ ॥

तें चि भूत गे माय । अभंगांत ऐसें लिहिलें आहे । कीर्तनामाजि उक्लाहे । गाती पाहे सकळिक ॥ १०० ॥ मग मातेने रामदास स्वामिंतें । प्रश्न केला जें कोणतें महद्भूत । ह्मणे प्रत्यक्ष दाखवी मज दृष्टितें । करणें कृतार्थ सुपुत्रा ॥ १ ॥ कपिलाचार्यें जेवि मातेसि । भगवत्दर्शन केलें आदरेसि । तयापरि राणुबाईसि । हृदयनिवासी दाखविला ॥ २ ॥ जानकीसहित श्रीराम । भक्तकाजकल्पद्रुम । ध्यान साजिरें पाहतां प्रेम । दाटले परम अष्ट भाव ॥ ३ ॥ सर्वां भूतीं येका-त्मता । बाणोनि गेली सहजि तत्वता । राहिल कैंचि मोह ममता । सुखी माता जाहली ते ॥ ४ ॥ मग ह्मणे रामदासातें । आजि धन्य त्वां केलें कृतार्थ । अंतर्बाह्य श्रीरघुनाथ । व्यापिला अनंत मजलागिं ॥ ५ ॥ ह्मणत होते आपुला कुमर । तूं प्रत्यक्ष मारुति साचार । केलासि सदया यशोधार । जन्मांतर धन्य आमुचें ॥ ६ ॥ शाश्वत सौख्य देउनि । संतोषविलि स्वामिनि जननी । आपण आज्ञा घेउनि । कृष्णातीरा निघोनि पै आले ॥ ७ ॥ श्रीकृष्ण उगमस्थान महाबळेश्वर । राहिले तेथें मास चार । अनंत भट आणि दिवाकर साचार । अनुग्रह केला तयांसि ॥८॥ मारुतीचें केलें स्थापन । अनंतभटजीस पूजा सांगुन । वाईक्षेत्रास निघोन । सचित्घन आले रामदास ॥ ९ ॥ ब्राह्मणाचें पिटके उपनाम । रम्य पाहून त्याचा आश्रम । वस्तीसि राहिले चित्सुखधाम । स्थापक धर्म जगद्गुरु ॥ ११० ॥ तयाचे मातेस उपदेश दिधला । दक्षण तीरीं मारुती स्थापिला । आर्चन सांगुनि त्या द्विजाला । जरंड्याला आले पै ॥ ११ ॥ द्रोणागिरींतील खडा पडिला । तो हा पर्वत जरंडा जाहला । स्वामिरायें जाणिजेला । जो आपण आणिला त्रेतायुगिं ॥ १२ ॥ कृष्णातीरीं माहुलीसंन्निध । जागृत स्थान तें परम शुध्द । वास केला काहि प्रसिध्द । तेथे सिध्दें रामदासें ॥ १३ ॥ नंतर पुढें कन्हाडास । प्रीति संगमीं आले स्नानास । विधि सारुनि शाहापुरास । सचित विळासें

प्रयाण केले ॥ १४ ॥ ग्रामा संनिध डोंगरखडी । जागा पाहुनि परम चोखडि । वास केला तेथे दराडि । परम आवडि करुनि ॥ १५ ॥ तेंव्हा शाहापुरीं आणि मसुरास । प्रत्यहिं जावे भिक्षेस । श्रीरघुवीर ह्मणोनि शब्दास । करिति घोष घरोघरीं ॥ १६ ॥ तव बाजीपंत शाहापुरीचा । कुळकर्णी असे भाविक साचा । स्त्री तयाची नेम तयेचा । चालवि पतीचा मनोधर्म ॥ १७ ॥ तयाचे घरिं कोणियेक दिनिं । भिक्षेसि गेले कैवल्यदानि । नामस्मरणें दीर्घध्वनी । श्रीरघुवीर वदनीं गर्जिनले ॥ १८ ॥ हें ऐकोनि बाईसि तया । राग आला फार ह्रदया । ह्मणे मरले घरांत येउनिया । विपरीत कासया वदलासि तूं ॥ १९ ॥ जाहलिया देहावसान । मग करिति रामस्मरण । भिक्षेसि येउनी तें चि जाण । केवि वदना आणिले ॥ १२० ॥ सतीबाई तों माता । ऐसें चि बोलेनिस्समर्था । येके दिवसिं घरासि जातां । बैसली तत्वता चिंतातुर ॥ २१ ॥ सांकल्य विचारितां श्रीस्वामिनिं । निवेदिलें तयेनें सविस्तर चरणीं । ह्मणे माझा पति नेउनि । दिवाणानिं बंदिं टाकिला ॥ २२ ॥ दुष्ट यवन तो अविचारि । ठाणे तयाचे विजापुरीं । तेथें घातले बुर्जावरि । नाहिं अंतरिं चैन तेणें ॥ २३ ॥ सतीबाईसी दयाघन । सांगती तेंव्हां कृपाकरून । कामना सिध्द होतां पूर्ण । नामस्मरण करिसील कीं ॥ २४ ॥ अकरावे दिवसिं येईल पति । आठव धरिं याचा चित्तिं । ऐसें वदुनि सत्वर गति । गेले निश्चिति विजापुरा ॥ २५ ॥ दासोपंत सांगोनि नाम । यवनासि दिधला नेम । सोडउनि आणिला विप्रोत्तम । भाग्य परम धन्य तयाचें ॥ २६ ॥ दामाजीचे संकटासि । धाविनलें ऋषिकेसि । तैसे च येथें कृपाराशी । बाजीपंतासि पावले ॥ २७ ॥ पातशाहाचें दैव भलें । म्हणोनि स्वामींचें दर्शन जाहलें । वस्त्रं देउनि बोळविले । जाणुनि भले गुमास्ते पै ॥ २८ ॥ असो रिसघडा परियंत । समागमें आले श्रीसमर्थ । मार्गें पाहतां जाले गुप्त । बाजीपंत विस्मय करी ॥ २९ ॥ घरासि येउनि स्त्रियेसि । म्हणे धाडिले होते कवणासि । दासोपंत नाम

यवनासि । निश्चयें सांगितलें ॥ १३० ॥ यथापद्धति हिशेब दिधला । रिसवडा पर्यंत घेउनि आला । पाठिमागे पाहातां तयाला । कोठें गेला, न कळे पै ॥ ३१ ॥ ऐसें सांगतां पत्निसि । सविस्तर निवेदिलें तिनें पतिसि । उभयतां लागले शोधावयासि । अरण्यासि ते काळिं ॥ ३२ ॥ पाडस चुकलें हरिणिसि । किं वछ शोधि धेनुसि । तान्हें जेवि जननीसि । अरण्यासि ते काळिं ॥ ३३ ॥ तैसें चि येथें फिरतां कानन । घडली दिनत्रय उपोषण । व्याकुळ होउनि फिरति नयन । निघति प्राण बाहेरि ॥ ३४ ॥ निर्वाण पाहुनि निकटभक्ति । कळवळा आला स्वामीचे चित्तिं । दर्शन देउनि उभयां प्रति । आत्मस्थिती दाविली ॥ ३५ ॥ सतीबाईसि प्रिति करून । नाम ठेविलें बयां जाण । प्रत्यहिं न होतां दर्शन । उपोषण करितसे ॥ ३६ ॥ जे जे दिवसिं घडलें पूजन । ते ते दिवसिं करावें भोजन । नाहिं तरि अन्नाविण । व्याकुळ प्राण होतसे ॥ ३७ ॥ बहुत प्रकारें सद्गुरुनिं । सांगतां प्रशस्त न वाटे मनिं । स्वामिरायें रागे भरुनि । उतरंडि जाउनि फोडाव्या ॥ ३८ ॥ तयांतील धान्य निवडून । पाक करविति बयाकडून । नाना प्रकारें छळितां जाण । संतोष मन तयेचें ॥ ३९ ॥ मग स्वामि चंद्रागिरिसि । वैसले येउनि येका घळिसी । बयाबाई शोधावयासि । हिंडतसे उपवासि ते ॥ १४० ॥ अकरावे दिवसिं जाहलें दर्शन । तो स्वामि भोवति वनचरें जाण । तेथें जाउनि निर्भय मनें । वंदिले चरण श्रीगुरूचे ॥ ४१ ॥ नंतर करूनि स्वयंपाक सिध्द । अर्पण केला श्रीस नैवद्य । बयाबाईनें नमुनि पद । अन्नप्रसाद मग घेतला ॥ ४२ ॥ निशिम भक्ति पाहुनि ऐसि । विचार न सुचे स्वामिचे मानसिं । येते जाहले शाहापुरासि । बयाबाईसि घेउनि ॥ ४३ ॥ आत्मस्थिति सांगून खूण । प्रताप मारुति स्थापिला जाण । करावया स्वार्चन तीर्थ ग्रहण । कृपेनें आज्ञापिलें ॥ ४४ ॥ हनुमंत आपणासि भेद नाहिं । प्रघट करुनि दाविलें ठाईं । बयाबाई समजुनि हृदईं । निवात देह आत्मसुखें ॥ ४५ ॥ पुढें कथा अत्यंत गोड । श्रीगुरुमाय

बोलवि कोडें । जन्मोजार्न्मि पाळिला लाड । फुटिला मोड बुध्दिसि तो ॥ ४६ ॥ स्वरूपीं येतां तुळणेसि । ते चि होउनि ठेलि तुळसि । गांजिल्या दाटल्या तयेसि । भक्त समरसि कथा त्या ॥ ४७ ॥ प्रेमकोरें गुंफोनि माळा । अर्पण होतसे श्रीरामाला । राजारामीं प्रसाद केला । प्रताप आगळा सिध्द कृपेचा ॥ ४८ ॥ भक्तमंजिरीमाला ग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । रामदास श्रीगुरुचरित्राते । अध्याय समाप्त तृतीय हा ॥ १४९ ॥

## अध्याय ४

श्रीगणेशायनमः । श्रीरामसमर्थ । जय सद्गुरु सिध्दमूर्ति । निर्विकारा बोधगभस्ती । दृश्य चांदणें सराळि राती । आत्मस्थिति उदय होतां ॥ १ ॥ नातरि श्रीज्ञानसमुद्र । दैवि असुरि मंथन विचार । चतुर्दशरत्नें सार । आत्मतत्व विचार या माजी ॥ २ ॥ कि भगवान कल्पद्रुम । निजभक्ताचा पुरविति काम । दीनदयाळ आत्माराम । नाशि श्रम सकळीक ॥ ३ ॥ किंबहुना गुरु माऊलि । स्वच्छदासा पान्हवलि । प्रसिध्द जगीं वंदिलि । रामदास माउलि सप्रेमें ॥ ४ ॥ सिंहावलोकन कथा मागील । बयाबाईस उपदेशिले । मारुतीतें स्थापियेले । ग्राम वोलिले शाहापुर ते ॥ ५ ॥ तयाचे करावया पूजन । बयासि आज्ञापिले जाण । नंतर श्री आपण निघोन । गेले जाण कराडासि ॥ ६ ॥ दिन त्रय करितां तेथें वास । द्विजें करविले कीर्तनास । मिळाले श्रोते श्रवणास । महा विद्वांस नरनारी ॥ ७ ॥ तयात रुद्राजीपंत देशपाडे याची । आलि होती कन्या साची । येथळी वृति तये सतीची । विरक्तीची पुतळी ते ॥ ८ ॥ बाळविधवा आधीं च उदास । तयात भेटले श्रीरामदास । ग्रहण करूनि उपदेश । समागमासि राहिलि ती ॥ ९ ॥ नंतर मिरजेस स्वामी समर्थ । सहजी आले फिरत फिरत । देशपांडे तेथील गृहस्थ । राहिले तेथे वस्तिसि ॥ १० ॥ वेणुबाई तयाची कन्या । योगभ्रष्ट परमहामान्या । बाळविधवा वैराग्य जाणा । अंतःकरणीं पासोनि ॥ ११ ॥ प्रत्यहिं तयेनें प्राकृत । याचावे येकनाथ भागवत । मेळवावे बहुत संत । करावा अर्थ कांहीं येक ॥ १२ ॥

पारि मुख्य स्वरूप निर्णय । काहिं केल्या लक्षासि नये । तो अवचिता देखिला कृपाळु माय । श्रीगुरुराय रामदास ॥ १३ ॥ मग उशीर काय तेथें । आत्मसौख्य व्हावया प्राप्त । जाहलि सहज वेणु विरक्त । कृपाळु मायसमागमें ॥ १४ ॥ असो उभयता शिष्यिणी आणि शिष्य । मंडळि मिळालि विशेष । पारि चैन न पडे अंतःकर्णास । न पडे सत्‌शिष्य पाहिल्यावींण ॥ १५ ॥ म्हणति माझा नळ वानर । कोठें घेतला तेणें अवतार । तयाविणें भवसिंधु पार । कंकर जीव अंतरति ॥ १६ ॥ कोणते स्थळि पाहाता सखा । भेट होईल तयाची देखा । निजध्यास हा चि निका । न पडे सखा कोठे हि ॥ १७॥ करवीर क्षेत्रासि भ्रमण करित । येते जाहले सद्गुरुनाथ । नळ अवतार जो निश्चित । भेटला अवतार तेथें चि ॥ १८ ॥ तव श्रोति इतिहास । प्रश्न केला ऐकावयास । ह्मणति कारण कार्य लीला आम्हांस । समूळ कथेसि सागणे तें ॥ १९ ॥ तये काळि सकळ संतासि । नमन करूनि श्रीगुरुसि । इथंभूत जन्मांतरासि । सविस्तरेंसि वर्णिजेला ॥ २० ॥ निर्विकार चिदाकाश । श्रीरामरूप ते अविनाश । तेथून स्फूर्ण जे वायूस । सोहं विशेष तो मारुति ॥२१॥ वायु घर्षण होतां नभा । प्रघट जाहली तेथें प्रभा । ब्रह्माग्नि जो सहजी उभा । सहजी शोभा अनळाचो ॥ २२ ॥ अक्षरामाजि अकार विभूती । व्यापि तयाचि सहजि अैति । भगवतगीतेंत व्यासोक्ति । स्वयें श्रीपति बोलतसे ॥ २३ ॥

श्लोक ॥ अक्षराणामकारोस्मि ॥ द्वंद्वः समासिकस्यच ।
अहमेवाक्षयः काळो । धाताहं विश्वतोमुखम् ॥ १ ॥

तस्मात् नल तोचि अनल जाहला । यदर्थि संशय नाहिं उरला । वाल्मीकानि वर्णियेला । स्वानुभवाला या युक्ति ॥ २४ ॥ निर्विकार रघुनंदन । तेथील स्फुरण तो हनुमान । पवननंदन त्यापासून । अनळ जाण सहजी तो ॥ २५ ॥ हनुमंत प्रसाद अभेद तयाला । महीपति हा वृत्तांत कथिला । आतां कथाभाग इतर जनाला । सागितला तो ऐका ॥ २६ ॥ अनळाचा तो अवतार । त्रेतायुगिं नळ वानर ।

उपदेशुनि तया अंजनीकुमरें । समुद्रावारें श्वेतु बांधविला ॥ २७ ॥ द्वापारिं अक्रुर तो जाहला । अद्भुत केलि तेथें लीळा । कलित मारुतीनें अवतार धरिला । रामदास जाहला हनुमंत ॥ २८ ॥ तयाचे सेवे जाण । जन्म घेतला प्रीति करून । अक्रुर जाहले तेचि कल्याण । तयाचे कथन परिसा तुम्ही ॥ २९ ॥ कोणते स्थळिं कोण ग्राम । पितामाता तयाचीं नामें । भक्ति वैराग्य ज्ञान प्रेम । अनुक्रमें सांगिजेल ॥ ३० ॥ गंगातीरिं बाभुळगाव । कुळकर्णि तेथिल कृष्णराव । ऋग्वेदि ब्राह्मण महानुभाव । वैराग्य वैभव अंगीं त्या ॥ ३१ ॥ व्रतबंध होतांचि उदासीन । बहुत केलें तीर्थाटण । तयाचे उदरिं कल्याण । अवतार घेणें भविष्य पुढिल ॥ ३२ ॥ यदर्थिं गृहस्ताश्रम करावयासि । आज्ञा जाहलि कृष्णाजीपंतासि । स्वप्नांत येउनि श्रीहृषिकेशि । निश्चयेंसि सांगितलें ॥ ३३ ॥ पाराजिपंत म्हणुन ब्राह्मण । तयासि दृष्टांत जाहला जाण । भगिनि आपुलि देऊन । विवाह करणें कृष्णरायाचा ॥ ३४ ॥ गंगातीरस्थ तो हि ब्राह्मण द्विज । अत्यंत भावीक भक्तराज । सुमुहूर्त पाहून तेणें सहज । वहिणि चोजे उजविलि ॥ ३५ ॥ कृष्णाजिपंतासि आग्रह करूनि । खर्च न पडतां देउनि भगिनि । सोहळा केला उत्तम जनिं । आंदण देउनि पाराजिपंतें ॥ ३६ ॥ पुढें सवेंचि पांच वर्षांनिं । बाई जाहलि ति गर्भिणि । डोहळे लागले तये लागुनि । ऐका जनिं श्रोते हो ॥ ३७॥ निर्माल्य तुळसि भक्षून । त्यावरि करावें तीर्थपान । किंचित मात्र खावें अन्न । येके दोन दिवसांनि ॥ ३८ ॥ सदा सर्वदा ध्यानस्थ । श्रीहनुमंतस्मरण वाचे करीत । उंच स्वरें शब्द गर्जत । श्रीरघुनाथ या नामें ॥ ३९ ॥ अैशा प्रकारें नउ मास । पूर्ण जाहले त्या गर्भास । प्रसुतकाळ पौर्णिमेस । चैत्रमास हनुमंतजयंति ॥ ४० ॥ हनुमंतभक्त निश्चयेंसि । म्हणुनि जन्म त्याच दिवसिं । उत्पन्न कालिं उल्हासि । मायबापासि आनंद बहु ॥ ४१ ॥ जगदंबा दैवत कुळार्चित । नाम ठेविलें तें ।चि तयातें । अंबाजीपंत ऐसे जन बोलत । गुणवंत पुत्र तो पै ॥ ४२ ॥ शुक्लपक्षि चंद्रमंडळा । वृध्दिंगत वाढलि ती कळा ।

बुध्दिप्रकाश अंबाजीला । प्रत्यक्ष उदेला ज्ञानसूर्य ॥ ४३ ॥ येक वेळ ऐकतां कोणतें हि । सदृढ धरावें ते चि ह्रदईं । वेदाध्ययन सहजि पाहि । शास्त्रें साहि मुखोद्गत ॥ ४४ ॥ नाना कळा सकळ विद्या । अनयासें प्राप्त जाल्या । अनेक युक्ति अभ्यासिल्या । जैश्या मिनल्या सिंधुसि नद्या ॥ ४५ ॥ पुढें कृष्णाजीपंतासि द्वितीय पुत्र । तोहि जाहला सुपात्र । दत्तात्रय नाम निर्धार । ठेविलें पवित्र तयाचें ॥ ४६ ॥ असो अनुक्रमें उभय कुमारांचा । व्रतबंध केला तयाचा । कृष्णाजीपंत विचारसाचा । परमार्थाचा आणिला मना ॥ ४७ ॥ ह्मणति पत्निश्रृणांतून । मुक्त केले नारायणें । कासया आता संसार करणें । संन्यास घेणें हें युक्त ॥ ४८ ॥ पाराजिपंत शालकादिका । बोलाविले सकळ लोका । स्त्रीआदि करूनि स्वबाळका । विचारि नेटका कृष्णाजिपंत ॥ ४९ ॥ नंतर काशिस जाउनि । चतुर्थाश्रम केला धारण । वास्तव्य केलें तेथें चि जाण । सदा निमग्न योगि ते ॥ ५० ॥ इकडे कथा कैसि जाहली । श्रोतिये पाहिजे ते परिसिली । श्रवण पठणें उभय कुळिं । तात्काळि पवित्र ते ॥ ५१ ॥ पराजीपंतानि भाचरे भगिनि । घेऊन आले आपुले सदनि । पुढें राजा शिवाजी यानी । कोल्हापुरिं नेउनि सुभा दिल्हा ॥ ५२ ॥ म्हणउनि करवीरि कुटुंबासहित । वास केला पाराजीपंतें । परि अंतरीं प्रेमळ विरक्त । कारभार करित लोकरिति ॥ ५३ ॥ जे जे संत क्षेत्रास येती । ठेउन घ्यावे तयाते प्रीति । आतिथ्य करावें यथानशक्ति । कीर्तन भक्ति करावे ते ॥ ५४ ॥ तशांत माहाराज रामदास समर्थ । येते जाहले अकस्मात । समागमें शिष्य बहुत । भजन करित अति हर्षे ॥ ५५ ॥ अगावरि दुर्मुजी वस्त्रें । घ्यान साजिरें सुंदर पवित्रें । हिंडत हिंडत आले क्षेत्रें । श्रीकरवीर तयामार्जी ॥ ५६ ॥ अंबिकेचे देवाळईं । कीर्तन केलें सहजीं पाहि । श्रवणासि आले सुभेदार हि । त्या समईं पाराजीपंत ॥ ५७ ॥ मूर्त पाहून श्रीस्वामीची । वेधली वृत्ती तया द्विजाची । दुसरे दिवसिं अनुग्रहाचि । योजना साचि केलि पैं ॥ ५८ ॥ साहित्यातें सिध्य

करूनि । विनंति केलि श्रीचरणीं । म्हणे मजला पुनीत करुनी । मन चरणीं निमग्न करा ॥ ५९ ॥ पाराजीपंताचा भाव जाणुनि । उपदेश केला तया लागुनि । भोजन कराया तयाचे सदनीं । स्वसुखखाणी पै गेले ॥ ६० ॥ अंबाजी बावा तेथें होते । अवलोकिले सद्गुरुनाथें । मोह उत्पन्न हृदयाते । उचंबळत जेवि नदि ॥ ६१ ॥ जैसा चंद्र पाहून पौर्णिमेला । भरते दाटले समुद्राला । किं तान्हें देखुनि मातेला । पान्हा फुटला अद्भुत ॥ ६२ ॥ कि वत्स अवलोकितां निरधारें । धेनु जैसि का हुंबरे । तयापरी घडला विचार । दृष्टांत सारे न पुरति ॥६३॥ सद्गुरुनाथ पडतां दृष्टि । अंबाजीस हर्ष न माये पोटीं । सद्ढ चरणीं घातलि मिठि । होतसे वृष्टि प्रेमाश्रूची ॥ ६४ ॥ अंबाजिस दृष्टिस पाहतां । पोटासि धरिले तया तत्वता । अनुपम्य आवडिसि सर्वथा । नये सांगता वाचेसि ॥ ६५ ॥ जैसे ध्रुवासि मधुवनीं । भेटते जाहले नारदमुनि । कि सुदामदेवासि श्रीकृष्ण नैनि । पाहातां मनि सुख बहु ॥ ६६ ॥ किं उपमन्य बाळकासि । प्रघट जाहले ऋषीकेशि । नातरि भीमकीपाणिग्रहणासि । आले निशीं भगवान ॥ ६७ ॥ असो फार काय दृष्टांत धेणें । श्रीगुरुशिष्य अभेद पूर्ण । कृष्णा ककुद्मतीचे जीवन । संगम जाण हा तैसा तो ॥ ६८ ॥ मग तेथें चि रामदासस्वामिनिं । अनुग्रह केला अंबाजीलागुनि । लोहो परिसासि झगटतां क्षणिं । व्हावया सुवर्णि काय उशीर ॥ ६९ ॥ हा हि दृष्टांत येथें गौण । लोखंड न पावे परीसपण । श्रीगुरु करिति आपुल्या समान । भोगिजे थाभिन्न पदवीजे ॥ ७० ॥ तात्काळ उघडली स्वरूपीं दृष्टि । हरपोनि गेलि असता सृष्टि । अपीआप ब्रह्मांड धटीं । पडलि मिठि स्वानंदीं ॥ ७१ ॥ वर्णित सुख ते अनुपम्य । अंतर्बाह्य आत्माराम । द्वैताद्वैत गेला भ्रम । लाधलें प्रेम गुरुभक्तीचें ॥ ७२ ॥ सहज समाधी अंबाजीस । प्राप्त जाहलि त्या समयास । ऐशा प्रकारें उपदेश । श्रीरामदासें पै केला ॥ ७३ ॥ नंतर सारोनि भोजनविधि । पाराजीपंतासि कृपानिधि । मागते जाहले ते चि

संधि । शिष्य सुबुधि न्याह्ययाते ॥ ७४ ॥ ते येळीं रामदासस्वामिते । अंबाजिची माता वदत । मजलागीं आणि दत्तुते । श्रीगुरुनाथें उपेक्षिले ॥ ७५ ॥ दुसरा कोण आम्हासि त्राता । तुम्हाविण सद्गुरुनाथा । विचारूनि पाहावे चित्ता । ठाईं समर्था आपुले तुवा ॥ ७६ ॥ ऐशापरि भाकिती करुणा । सद्गद होउनि अंतःकर्णी । अश्वासिले तयेसि जाणा । बोलति वचना सद्गुरु ते ॥ ७७ ॥ म्हणति समागमें तिधे चला । टाकीत नाहिं कवणाला । सत्पुत्र उदरीं जन्मला । कल्याणाला पात्र तो ॥ ७८ ॥ ऐशा प्रकारें प्रीती करून । त्रिवर्ग घेतले संगे जाण । पाराजीपंतासि विचारून । केले प्रयाण श्रीसमर्थे ॥ ७९ ॥ शिष्यासहित आनंदयुक्ति । मथुरासि आले कृपामूर्ति । तेथें स्थापून श्रीमारुति । उत्साहाप्रति आरंभिलें ॥ ८० ॥ ध्वज पताका करविल्या । मेळविल्या संतमंडळ्या । शिष्यासि पत्रिका लिहिल्या । सिधता जाहल्या सामुग्र्या ॥ ८१ ॥ असंख्य होतसे ब्राह्मणभोजन । कीर्तन करिति विद्वत्जन । छविना मिरवतसे जाण । रात्रंदिन प्रत्यहीं ॥ ८२ ॥ तव तेथें वृक्ष अंब्याचा । विस्तीर्ण होता पूर्वि साचा । आडवि ढाळि तयेचा । ढका साचा लागतसे ॥ ८३ ॥ तोडून तये शाखेसि । मार्गे करावा प्रदक्षणेसि । तव तेथील शेखदारासि । दुर्जनासि कळलें पै ॥ ८४ ॥ तेणें अवरोध करून । दुराइ दिधाले स्वामिसि जाण । तये काळीं समर्थ निघोन । गेले आपण विजापुरा ॥ ८५ ॥ पातशाहा जो यवनाधीप । तयानें पाहून श्रीस्वरूप । ह्रदईं जाहला अनुताप । लाधला कृपे स्वामींचें ॥ ८६ ॥ मोकाळिक चिठि देउन त्वरें । बोळविले अत्यादरें । येके दिवसांत निर्धारें । श्रीगुरु त्वरें पै आले ॥ ८७ ॥ द्रोणागिरि येक रात्रींत । जेणें आणिला श्रीहनुमंतें । तो हा अवतार प्रसिद्ध जगात । रामदास समर्थ कलिमाजि ॥ ८८ ॥ तेथें द्वादश योजने जावया । काय उशीर लागे तया । चिठि दाउन गावकरीया । ढाळी तोडावया आरंभिले ॥ ८९ ॥ तये काळिं स्वामि समर्थानिं । चमत्कार केला ऐका जनिं । समस्त शिष्यासि

अवलोकुनि। आज्ञा वचनीं करिती पै ॥ ९० ॥ अत्यंत खोल झाडा खालिं। विहिर प्रशस्त होति पहिली। तेथून पुढे फांद आलि। आडवि आलि आंबवृक्षाची ॥ ९१ ॥ परिक्षा करणें यदर्थि। काढिलि असे स्वामिंनिं युक्ति। बोलाविले शिष्या प्रति। काशिं लाविति सकळीका ॥ ९२ ॥ म्हणति कोणितरि येक जणें। वृक्षावरि चढा कुठार घेउन। शेंड्यावरि बैसोन। तोडणें ढाळी उफराटि ॥ ९३ ॥ धगापिवां समस्ता ऐसे। निश्चय न करवे कवणास। तये वेळिं अंबाजीस। रामदास अवलोकिति ॥ ९४ ॥ साष्टांग नमुनि श्रीगुरुराया। अनुक्रमें नमिले सकळ पाया। वृक्षावरि वेघोनिया। तोडि तया ढाळिसि ॥ ९५ ॥ असंभाव्य खालिं उदक। विहिर भरलि असे देख। जन पाहति सकळ कौतुक। शिष्यत्व निकें धन्य तें ॥ ९६ ॥ शेंड्यावरि स्वस्थ बैसोन। घाव घालितसे मुळाकडे जाण। अवलोकिति संत नैने। आदि करून रामदास ॥ ९७ ॥ तो कुन्हाड फांदि अकस्मात। विहिरींत पडलि अंबाजी सहित। घावरे जाहले जन समस्त। म्हणति अनर्थ थोर जाहला ॥ ९८ ॥ वृक्ष उंच अत्यंत फार। विहिर सखोल बहुत नीर। मग वाचेल कैसें शरीर। पडिला विचार सर्वांसि ॥ ९९ ॥ इकडे अंबाजी उदकांत। आरंभिलें भजन नृत्य करीत। चित्तिं स्मरोनि सद्गुरुनाथ। गिरक्या घेत पाण्यावरि ॥ १०० ॥ जयाचे सत्ते पंचभूतें। वर्तति आपुल्या स्वधर्मातें। तयाचि कृपा अंबाजितें। असतां व्यर्थ शंका ते ॥ १ ॥ स्वामिचि शिष्यिणि अकाबाई। चैन न पडे तयेचे हृदईं। मस्तक ठेउनि श्रीगुरुपाईं। कैलि घाई उठा म्हणोनि ॥ २ ॥ म्हणे च्यार घटिका समग्र जाहल्या। अंबाजि असे विहिरिंत मेला। गोष्टि तुम्हासि कैस्या सुचल्या। पाहिजे अणिल्या शुमाते ॥ ३ ॥ रामदास स्वामिजवळि। बैसलि होति संतमंडळि। आत्मचर्चा होतसे भळी। रुदत बैसली आका वे ॥ ४ ॥ मग तात्काळ उठोनि संतासहित। विहिरि जवळि आले समर्थ। हाक मारिती अंबाजिते। सदय चि ते श्रीगुरु ॥ ५ ॥ म्हणति बापा आहेस कीं कल्पाण। ऐसें बोलतां प्रिति करून। प्रश्नचरो

उदकांतुन । होय म्हणुनि दिधलें ॥ ६ ॥ तात्काळ निघुनि बाहिर । मस्तक ठेविलें पायावर । सकळ शिष्य जयजयकार । करिति रघुविर गर्जना ॥७॥ रामदासस्वामिनि स्वहस्तें । साखर वांटिली संतातें । नाम ठेविलें यथार्थ । कल्याण म्हणत निज भावडिं ॥ ८ ॥ सर्व जनांचें तूं कल्याण । करासिल ऐसा वर देउन । पद्म हस्त ठेविला शिरिं पूर्ण । कृपाघन सद्गुरुनिं ॥ ९ ॥ वारंवार पोटासि धरुनि । कुरवाळितसे श्रीगुरुजननि । नवल केलें सर्वत्र जनिं । धन्य गुरु आणि शिष्यत्व ते ॥ ११० ॥ दुजि गोष्टि चमत्कार । ऐका श्रोते सार । भिमाजि बावा शिष्य निर्धार । तयाचें चरित्र कांहिं येक ॥ ११ ॥ बयाबाई शाहापुरकरीण । तयेचा चुलत बंधुचा पुत्रजाण । भीमा त्याचें नामाभिधान । गोष्टि पूर्ण अद्भुत ते ॥ १२ ॥ स्वामिस नमस्कार करावया । सांगति जाहलि शाहापुरकर बया । भीमाजी म्हणे पडतां पाया । श्रीगुरुराया काय मागूं ॥ १३ ॥ हास्य करुनि बया बोलिली । मागासिल ते देईल गुरुमाउली । चरण धरिले तात्काळीं । घेतलि आळि ते ऐका ॥ १४ ॥ बाल्यदशा न कळे कांहिं । म्हणे पाताळ लोक दाखवि गुरु आई । समर्थे आज्ञापिलें पाहि । जावया ठाईं विहिरींत ॥ १५ ॥ कल्याण स्वामि नाहिं बुडाले । दृष्टिनें होतें हें पाहिलें । भीमाजी बावा निर्भय जाले । घालुनि घेतले विहिरींत ॥ १६ ॥ दीनदयाळ गुरुमाउली । तेव्हांचि मागे उडी घातिली । बाळकाची आळि पुरविलि । मंदिरें दाविली पाण्यांत ॥ १७ ॥ तेथें चि करुनि उपदेश । बाहेर काढिले भीमाजिस । धन्य स्वामि रामदास । लिळा विशेष तयाचि ॥ १८ ॥ मग उछाह करुनि समाप्त । बोळविले सकळ संत । शिष्य मंडळि समवेत । आले समर्थ कन्हाडासि ॥ १९ ॥ तेथें मुख्य दिवस पुण्यतिथि । निजानंद स्वामिचि रंगनाथ करिति । आठवण जाहली होती च चित्तिं । तव पातले मूर्ति श्रीरामदास ॥ १२० ॥ परस्परें होता भेटि । नसमाये आनंद उभयता पोटिं । बोलत बैसले हितगुज गोष्टि । होतसे वृष्टि प्रेमघन ॥ २१ ॥ उछाह विधि सांग करुनि । शिरगांवासि आले तेथोनि । कल्याणाचे मातें लागुनि । मठ बांधोनि ठेवियले ॥ २२ ॥

दत्तात्रय जो धाकुटा पुत्र । मातृ सेवेसि योजिला पवित्र । सकळ समिद्धा जो कां पात्र । कल्याण स्वतंत्र संगें ते ॥ २३ ॥ अंगापुरासि फिरत फिरत । येते जाले स्वामि समर्थ । स्नान संध्येसि कृष्णातीर्थ । पाहुनि निवांत उतरले ॥ २४ ॥ + + + + । + + + + । + + + + । मूर्ति कराबि श्रीरघुनाथ ॥ २५ ॥ श्रीरामचंद्राची स्थापना करून । भक्तिसि लावावे मूढ जन । ऐसे होता चि हृदईं स्फुरण । वर्तले जाण नवल पै ॥ २६ ॥ श्रीकृष्णेचे डोहांतुनि । सुस्वर निघाली मधुर ध्वनि । म्हणे मी सितेसहित च्यापपाणि । येथें चि जीवनिं आहे पै ॥ २७ ॥ शिळमय कल्पिले तुम्हि दासा । तरि मि हि उदकांत जाहलों तैसा । करवण्याचा नलगे घळसा । अंतरबाह्य सरिसा तिष्ठतसे ॥ २८ ॥ ऐसे ऐकोनि रामदास स्वामि । संतोष पावले अंतरयामि । कल्याणासि म्हणति लीलाधर्मि । कृष्णेतुनि आम्हि राम काढितो ॥ २९ ॥ तात्काळ उठोनि आसनावरुनि । उडि घातली कृष्ण जीवनिं । कल्याणानें पाहुनि नैनिं । डोहा तत्क्षणिं शिरले त्या ॥ ३० ॥ बुडि मारिता गुरुशिष्य । हातासि लागले आयोध्यानिवास । बाहिर काढितां ध्यान सुरस । आवलोकिलेसे रामदासें ॥ ३१ ॥ रथावरि श्रीभगवान । सव्य भागिं लक्ष्मण । वामांगिं ते जानकिनिधान । चामरे पूर्ण ढाळति ॥ ३२ ॥ धनुष्यबाण धारण केले । दुसरे हातिं लीळा कमळ । सारथि पुढे मारुति प्रांजळ । ध्यान सोज्वळ या रिति ॥ ३३ ॥ अत्यंत सुंदर लावण्य । सुखावले पाहतां नैन । चितृशक्ति अंबापूर्ण । ती हि जाण निघालि ॥ ३४ ॥ ति भगवति महिषासुर मर्दिनि । ऐशा प्रकारें मूर्ति दोनि । निघल्या जाल्या कृष्णेंतुनि । सुलक्षणि सुंदर त्या ॥ ३५ ॥ पुढिल आध्याईं श्रींची स्थापना । रामदासस्वामि करतिल जाणा । श्रोतिये देउनि अवधाना । येकाग्र मना परिसावें ॥ ३६ ॥ सिध होउनि हृदईं स्वामि । यदविति स्वयें राजारामि । देहमान उडउनि उर्मि । मेळविले प्रेमि निज अधिष्ठा ॥ ३७ ॥ भक्तमंजरिमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ ।

चवथा आध्याय जाला समाप्त । रामदाससमर्थचरित्रासि ॥ ३८ ॥ शुभंभवतु ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥

## अध्याय ५ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॐ नमो श्री आत्मयारामा । परात्परा स्वसुखधामा । वामांगि ते विलसे रमा । आदिधर्मा स्फूरद्रूपिणी ॥ १ ॥ जाणीव प्रासुनि उरले शेष । दक्षणभागिं तो मिरवला शेष । निज प्रेमाचें भरतें विशेष । भरथ निशेष तो चि पै ॥ २ ॥ शत्रुघ्न तो शत्रुहंता । कामक्रोधादिका समस्ता । विचार सन्मुख सदा पाहतां । तया हनुमंता नमियेले ॥ ३ ॥ इंद्रियगेळा वानर गण । अठरापद्में तीं च जाण । देह अयोध्येत देवगण । प्रगटि प्रगटि कर्ण तयाचे ॥ ४ ॥ चतुर्थिचें जें दैवत । चतुर्दळिं ते शोभत । चतुर्भुज गणनाथ । आधार म्हणत चक्रासि त्या ॥ ५ ॥ सृष्टि उत्पन्न जेथे स्वभाव । गुह्येंद्रिइं कमळोद्भव । दाहा अवतार घेतले देवें । दशदळि तो वासुदेव पै ॥ ६ ॥ निजभक्तासि अभय देत । नाभि नाभि ऐसें वदत । नाभिकमळ म्हणोनि संत । बोलति समस्त स्थानासि त्या ॥ ७ ॥ द्वादशदाळि श्रीशंभु । हृदयामाजि जो स्वयंभु । आत्मानुभवि तयासि लाभु । कामारंभु दर्शनि त्या ॥ ८ ॥ जीवाचे पालन शीव करि । मदनांतक तो चि त्रिपुरारि । असो शोडशदळ द्विदळांतरि । दैवतें साजिरि अनुक्रमें ॥ ९ ॥ सहस्त्रदाळि श्रीगुरुराव । जाणति ते माहानुभाव । दशवे द्वार ते चि बरवे । पाहति सर्व ज्या स्थळिं ॥ १० ॥ मुख्य स्थान म्हणोनि । नेत्रीं राहिला वासरमणि । ज्ञानोदय होतां जनीं । निस्तेजपणि मनचंद्रमा ॥ ११ ॥ जिव्हासनिं वरुण बैसला । मुखिं दैवत अनळ जाला । अश्विनि कुमार नासिकिं शोभला । दैवतें दिशाला कर्ण ते ॥ १२ ॥ त्वगेंद्रिय वायुदेव । अमरपति हस्त जाणावे । असो सर्व शरिरिं सांगता देव । चरित्र गौरव राहिला तो ॥ १३ ॥ साराश जो का दशकधर । रावण तो अकार चिन्ह । निर्दाळुनिया महिवर । स्वात्मविचार स्थापियेला ॥ १४ ॥

तो सर्वात्मा दाशरथी । प्रसिद्ध जगीं कृपामूर्ति । नमोनि तयासि अनन्योक्ति । चरित्राप्रति आरंभिलें ॥ १५ ॥ मागिल कथा इतिहास । अंगापुरीं श्रीरामदास । स्नान करुनि ध्यान योगास । मानसपूजे बैसले ॥ १६ ॥ पाषाण मूर्तिची स्थापना । करावि ऐसे वाटलें मना । तेणें करुनि कृष्णेंत जाणा । मूर्ति सुलक्षणा प्रगटल्या ॥ १७ ॥ पुढें कथन कैसें जाहालें । ऐकावें तें श्रोतिजनें । चित्तासि कथा निश्चळ । लाभ होईल श्रवणाचा ॥ १८ ॥ श्रीविष्णुतनु कृष्णा । आत्माराम उदकिं जाणा । मुळिचा चि अर्थ आहे पुराणा । दाविला जना येथें पै ॥ १९ ॥ प्रत्यक्षता जळांतुनि प्रघटविला कोदंडपाणि । उदकामाजि बुडि मारुनि । मूर्ति स्वामिनि काढिल्या त्या ॥ २० ॥ गुरेंखि पोरें तेथें होति । अवलोकिले तेणें समस्ति । अंगापुरांत जाहलि पळति । वेगिं सांगति गावकरयासि ॥ २१ ॥ म्हणति अपुले शिवेंत नदिंतून । मूर्ति काढिल्या गोसाव्यानें । आतां नेहिल पळऊन । पाठि धावणें करा वेगिं ॥ २२ ॥ ऐसे ऐकुनि ग्रामस्थ । मिळुनि धावले समस्त । इकडे रामदासस्वामि-समर्थ । शिष्यासहित निघाले ॥ २३ ॥ झोळिंत घालुनि श्रींची मूर्त । मार्गिं चालतां भजन करित । चरेगावचे रानांत । जाहले येते श्रीस्वामि ॥ २४ ॥ सुखठाण्याचे खिंडित पोहचतां । तेथें जाहले ऐकिजे वृत्तांता । अंगापुरकर तेथें तत्वता । आले सर्वथा धावोनि ॥ २५ ॥ म्हणति आमुच्या नदितील मूर्ति । न देऊं तुम्हा कदा निश्चिति । शिवेचे आंतिल आम्हाप्रति । करणें सर्वोक्ति अधिकार ॥ २६ ॥ स्वामि म्हणति घ्याव्या अपुल्या । ठेविते जाहले तेथेंच स्थळाला । आपण गेले चाफळाला । कल्याणादि मेळा शिष्यासहित ॥ २७ ॥ मग अंगापुरकर ग्रामस्थयानी । मूर्ति न्यावया डांगा आणुनि । आरंभिला प्रयत्न जनीं । मंडळि मिळुनि सकळिक ॥ २८ ॥ नाना उपाय करितां श्रमले । शेवटिं स्वामिसी शरण गेले । म्हणति दैवत आणा आपुलें । यत्न थकले आमुचे ते ॥ २९ ॥ तेव्हां हास्य करुनि रामदास-

स्वामिनि । शिष्य पाठउनि झोळितुनि । मूर्ति तात्काळ आणउनि । योजिले जनिं स्थापावया ॥ ३० ॥ तये काळिं अंगापुरकर । पसरिला तेणें स्वामिसि पदर । ह्मणति प्रसाद द्यावा ऐसा न सरे । जगिं साचार कळावा तो ॥३१॥ तये वेळीं स्वामी समर्थे । मान दिधला उछाहांत । सिंव्हासनाचि काठि निश्चीत । आणावयाते आज्ञापिले ॥३२॥ अणिक दुसरा अधिकार । कोठि दिधली समग्र । संतोष केला ऐश्या प्रकारे । अंगापुरकर मग गेले ॥ ३३ ॥ नंतर स्वामींनि चाफळकरासि । जागा मागितली मूर्ति स्थापावयासि । तयानि कुश्चळ भूमिकेसि । समर्थासि दाखविली ॥ ३४ ॥ ग्रामासि नदि स्या माहातीर्थ । मांडव्यऋषि जे कां प्रार्थित । जिचे तीरिं विख्यात । स्वयंभु असत सप्तलिंगें ॥ ३५ ॥ मांडगंगा म्हणती तयेला । औदुंबरक्षेत्रीं संगम जाला । श्रीकृष्णेसि बोध मिळाला । पावन जनाला करितसे ॥ ३६ ॥ तयेचे तटाकीं चाफळ । चाफेश्वर दैवत तेथिल । पवित्र क्षेत्र जाणुनि स्थळ । मागते जाले गावकरयासि ॥३७॥ परि तयानि कुश्चित स्थान । श्रीस्वामीचि केलें अर्पण । जेथें पिश्याच झुटिंग दारुण । संमध संपूर्ण वास करिती ॥ ३८ ॥ मांड गंगेचे दक्षण तीरिं । स्मशान भूमी ती निर्धारिं । रामदासस्वामी म्हणति बरि । जागा खरि हि आम्हा ॥ ३९ ॥ शिष्यासि आज्ञा करुनि सकळे । सिंदुर चर्चित दगड काढविले । मांडेंत तात्काळ भिरकाविले । शुध्द स्थळ केलें पैं ॥ ४० ॥ तेथें म्हसोबा म्हणुन । पाषाण होता आरक्तवर्ण । तो खाणितां प्रगटायमान । दैवत जाण जाहलें तें ॥ ४१ ॥ म्हणे मि होतो जाग्रत । परि स्वामिपुढें उपाय न चले । शरण येउनि हात जोडिले । नमन केले समर्था ॥ ४२ ॥ दीन वदने भाकितां करुणा । स्वामी सांगति तयासिजाणा । श्रीची करितो येथें स्थापना । येणें जना बहुतेका ॥ ४३ ॥ तुमचा समुचय तयासि । उपद्रव देतिल जगासि । यास्तव काढिले सर्वासि । झोटिंगादि समंधादि ॥ ४४ ॥ तुवा जावे सीघ्र येथून । कासया राहिलासि अज्ञुन । ऐसें बोलतां म्हसोबा म्हणे । गरीबपणें मी राहतो ॥ ४५ ॥ घेईन वाळ ते

खायासि । पीडा न करि कवणासि । ऐसें वदतां कृपाळासि । बहु मानसिं कळवळले ॥ ४६ ॥ जांभळिचा वृक्ष जो टेकाखालीं । तेथें म्हसोबासि राहावया आज्ञा केलि । नेमणुक करून तेव्हां च दिधली । उछाहकाळिं तयासि ॥ ४७ ॥ रथ उछाहा दिवसिं तांदुळ । मापटेभर धावे निश्चळ । आणि रथा दौ दिनि प्रस्थ मूळ । अछर सिजले देणें त्या ॥ ४८ ॥ माघारि स्वारि श्रीची येता । रथाखालिं उतरतां । वोवाळितिल दहिमाता । ते हि तत्वता देऊं पै ॥ ४९ ॥ परि सर्वथा जनाला । न करि उपद्रवाला । ऐसें सांगुनि मसोबाला । आरंभ केला देवालया ॥ ५० ॥ शिष्यमंडळे समस्ते । सिद्ध करूनि देउळाते । स्थापन केला रघुनाथ । मारुतिसहित यथाविधि ॥ ५१ ॥ श्रीजयंति उत्छाहासि । आरंभ केला त्या च वर्षि । दिवस वाटुनि शिष्यासि । दिधले सर्वासि स्वामिनिं ॥ ५२ ॥ शाहापुरकर बयाबाई । लक्ष जिचा स्वामीपाईं । प्रेमळ भतार तयेचा हि । बाजिपंत तो विदेहि ॥ ५३ ॥ प्रतिपदा दिवस तो तयाचा । आणि कीर्तनाचा मान साचा । प्रथमारंभिं गर्जोनि साचा । सवाई याचा म्हणतसे ॥५४॥ श्रीरामजन्मनवमि दिवसि । करणें हा अधिकार तयासि । रथावरि बैसावया देवासि । पालखिसि नेहणें तयाचे ॥ ५५ ॥ आणि श्रीपुढें भजन । तेणें चि करावें प्रीति करून । याप्रकारें सांगून । शाहापुरकर ब्राह्मण गौरविला ॥ ५६ ॥ आतां रुद्राजिपंत देशपांडे । वास्तव्य क्षेत्र ज्या कऱ्हाड । द्वितीयेचा दिवस तयाकडे । प्रीतिपाडें नेमियेला ॥५७॥ तारळेकर देशपांड्याची । तृतीया तिथी तयाची । चतुर्थी आणि पंचमीची । नेमणुक साची शिराळकराकडे ॥५८॥ देशलेखक तो हरिपंत । शिष्य स्वामीचा निश्चित । मठचे मान बहुत । दिधले समर्थे तयासि ॥ ५९ ॥ ललितासि उभे राहावे । आणि रथावरि मोरचळ वारावे । देउळांत आणितां देव । पालखींत बैसवावे तयानें ॥६०॥ श्रीचि स्वारि माघारि येतां । भजन करावे तेथें चि तत्वता । सूक्ष्म कार्य करणें सर्वथा । अधिकार पाहतां तयासी ॥ ६१ ॥ असो पुढें षष्ठीचा दिवस । करावया सांगितला रंगोबास । पवाराचे तो निगडित असे ।

प्रेमळ शिष्य स्वामिचा ॥ ६२ ॥ नरसोबा मल्लनाथ यानि । सप्तमी करावी प्रीति फरुनि । अष्टमी वेणुबाईनि । घेतली नेमुनि आपले कडे ॥ ६३ ॥ नवमी मुख्य मठांतील । देशपांडे दशमी चाफळ । कीर्तन हि तयानि श्रीजवळ । करावे प्रांजळ आनंदराव यांनि ॥ ६४ ॥ देशलेखक मेढेकराचि । वाकनीसि तयाचि । नेमणुक अैशा प्रकाराचि । निरंतर साचि केलि पै ॥ ६५ ॥ सूक्ष्म कार्य सांगतां फार । ग्रंथि होईल हा चि विस्तार । संक्षेप केला या विचारें । श्रोते चतुर जाणती पै ॥ ६६ ॥ असो नवविध भक्त्यात्मक नउ दिवस । रामजयंति उछा होतसे । असंख्य यात्रा येतसे । दुर्लभ प्रसादास अमर वांछिति ॥ ६७ ॥ प्रत्यहिं होतसे ब्राह्मणभोजन । सर्वत्र वर्णा अन्नदान । अहोरात्र जेथें कीर्तन । आदिकरून वेदघोष ॥ ६८ ॥ देशोदेशीचे मिळती संत । जयराम गोसावि आनंदमूर्ति । केशव स्वामि श्रीरंगनाथ । येति सतत चाफळा ॥ ६९ ॥ शिवरामस्वामी तुकाराम । रामदासपदिं यांचें प्रेम । निरंजन समर्थ वामन परम । पंडित निस्सीम आत्मव्यक्ता ॥ ७० ॥ इत्यादिकांचीं पुढें चरित्रें । वर्णिलीं आहेत पृथक पवित्रें । तेथिल रहस्य अति विचित्र । श्रवणमात्रें सुख होय ॥ ७१ ॥ सांप्रत ऐका हें चि कथन । चाफळीं स्थापिला श्रीरघुनंदन । देवालयाचे दक्षिणेस जाण । बांधविला पूर्ण मठ तेथें ॥ ७२ ॥ मागे पुढें मारुतीस । स्थापन केले रामदासें । शेपाकृति त्या स्थळास । अत्यंत दिसे शोभा ते ॥ ७३ ॥ शिष्यमंडळि मठीं राहात । डोंगरिं वास करिति समर्थ । कल्याणानें असावें हिंडत । संगें सतत सर्वदा ॥ ७४ ॥ केन्हांतरी चाफळासि यावें । श्रीचें दर्शन करूनि जावें । अरण्यांत सदा असावें । मानस बरवें हें चि पै ॥ ७५ ॥ घोडोबाचे डोंगरासि । उदक आहे गुन्हा काहनासि । तेथें बैसति ज्ञानरासि । चिद्विलासि रामदास ॥ ७६ ॥ देवालयाचें शिखर । पाहावे तेथुनि निर्धार । जन यात्रा अपार । दृष्टि समग्र पडतसे ॥ ७७ ॥ दास डोंगरिं राहात । यात्रा देवाचि पाहात । ऐसा अभंग केला समर्थें । गाति संत कीर्तनीं ते ॥ ७८ ॥ किंबहुना

डेरवणा जवळ । विशाळ पर्वत दारे सखोल । तेथें वसती दीनदयाळ । रामदास प्रांजळ जगद्गुरु ॥ ७९ ॥ ऐशा अनेक प्रकारें । डोंगरांत वास श्रींचा निर्धार । चाफळासि येति वारंवार । सीतावरपूजनासि ॥ ८० ॥ शास्त्रांतरिं बोलिलें जे । शिव होवोनि शिव यजिजे । यदार्थी विचार मांडिला सहज । श्रीगुरुराजें तो ऐका ॥ ८१ ॥ हनुमंत अवतार आपण स्वयें । जगत्रयासि हें ठाउक आहे । परि जनासि तरणोपाय । मूर्ति अन्वयें स्थापियेल्या ॥ ८२ ॥ हनुमंत प्रतिमा ठाईं ठाईं । मठ बांधविलें लवलाहि । शिष्य स्थापुनि तेथें पाहि । लाविलि सोई भक्तिची ॥ ८३ ॥ तयांत मुख्य येकादश । हनुमंत स्थापिले निःशेष । अकरा विघे येक येकास । जमिन असे त्या हनुमंता ॥ ८४ ॥ तया मूर्तिचा अनुक्रम । सांगिजेल ऐका धरुनि प्रेम । दर्शनमात्रें पुरति काम । ऐशि परम स्थानें तीं ॥ ८५ ॥ शाहापुरिं प्रथम हनुमंत । दुसरा स्थापिला मसुरांत । चाफळामाजि दोन तेथें । सदा विलसत मागें पुढें ॥ ८६ ॥ सिंगणवाडिसि पाचवा लाहान । गोजिरी मूर्ति अत्यंत गहन । माजगांवि पुरातन । होता पाषाण मारुतीचा ॥ ८७ ॥ दगडावरि त्या साहवी जाण । मूर्ति योजिलि सुलक्षण । उंबरजेस सातवें ध्यान । श्री हनुमान स्थापियेला ॥ ८८ ॥ आठवा मारुति शिराळ्यास । नवम स्थान मनपाडळ्यास । वारणेचे तटाकास । पारगांवास दाहावा तो ॥ ८९ ॥ माहरुद्र तो अकरावा । बाहुक्षेत्रासि जाणावा । इतिहास तया बर्वा । सांगूं सर्वा काहिं येक ॥ ९० ॥ कृष्णामाहात्मीं समग्र । सांगितलें आहे सविस्तर । कळावयासि किंचित्‌मात्र । सांगणें पवित्र तें ऐका ॥ ९१ ॥ रामचंद्र श्रीसर्वोत्तम । दीनदयाळ मेघशाम । अवतार धरूनि दुष्ट अधम । युगायुगीं अधम दैत्य मारिले ॥ ९२ ॥ लोकरीत्या जनाकारणे । प्रायश्चित्त तयाचें कराया जाण । काहीं करावें अनुष्ठान । आले म्हणुन फिरत फिरत ॥ ९३ ॥ शुद्धदेश पाहुनि । स्थिर जाले चापपाणीं । शिरटे ग्रामीं सीता जननी । सिंहासनीं बैसली ती ॥ ९४ ॥ श्रीरामासि उपासना । सदाशिवाची असे जाणा ।

ह्मणुनि केलि स्थापना । पाहतां ध्याना वाळुच्या ॥ ९५ ॥ राम लक्ष्मण जानकि । तिघी बैसली येकाग्र निकी । तो गडबड केलि बहुत उदकीं । कृष्णा नीर येतसे पै ॥ ९६ ॥ तये काळि हनुमंत । श्रीचे मागे उभे होते । परतविले दोहि हातें । कृष्णोदकाते तत्छमई ॥ ९७ ॥ तेव्हां च्यार कोशपर्यंत पाहि । डोहो पडत गेला महि । श्रीरामें जाणुन हृदई । केलि ध्याई मारुतिसि ॥ ९८ ॥ म्हणति जगदोत्धारासि कृष्णा येत । निवारण केले तुवा तयेते । तरि माघारि आणा त्वरित । नमन निरुते करुनि ॥ ९९ ॥ दंडवत पाडिले मेदिनि । नमस्कार घातला मारुतिनि । मग जगत्रयाचि जननि । ते चि क्षणि परतलि ॥ १०० ॥ ध्यान भंग न करितां । दोन वोघ जाह्ले तत्वता । श्रीरघुपतिसि ढका न लावितां । गेलि सर्वथा दो वाहे ॥ १ ॥ ह्मणुनि नाम क्षेत्रासि बाहे । जन सर्वत्र अद्यापि पाहे । श्रीराम लिंगस्थान जेथें आहे । प्रसिद्ध गाय व्यासमुखें ॥२॥ तये स्थळि दर्शनास । येते जाले रामदास । देवालयाचे पश्चिमेस । करावया स्नानास पै गेले ॥३॥ मारुतीनें पूर्वि नमन केले । भीमकुंड तीर्थ तें जालें । तेथें समर्थे लक्षुनि भले । आंत सिरले त्या ठाया ॥ ४ ॥ कृष्णेंत जाउनि चापचितां । मारुति लागला स्वामिचे हाता । तात्काळ बाहिर काढून पाहतां । सुवर्णमय तत्वता तें ध्यान ॥ ५ ॥ तये काळि श्रीरामानि । अज्ञापिले स्वामीलागुनि । लोभग्रस्त कलित प्राणि । प्रगट करणी न करा हो ॥ ६ ॥ सांप्रदाय अपुला जैसा । मारुति असावा येथें तैसा । ऐसें सांगतां रामदासा । आनंद मानसिं बहु जाह्ला ॥ ७ ॥ शिष्यासि अज्ञा करून । चुना तयार केला जाण । मग तैसि मूर्ति करून । केलें अर्चन परम प्रिति ॥ ८ ॥ हस्तसंकेत या प्रतिमेचा । तद्वत चि केला स्वामींनि साचा । नवल महिमा त्या स्थानाचा । जाय जीवाचा सकळ ताप ॥ ९ ॥ आणिक मारुति बहुत ठिकाणीं । स्थापन केले समर्थांनि । ग्रंथि लिहितां न पुरे वाणी । यास्तव वचनिं संक्षेपता ॥ ११० ॥ डोलगांवि उर्वसितीरिं । हनुमंत स्थापिला दगडावरि । स्नानसंध्येसि केव्हां तरि । जाति झडकरि तेथें पै ॥ ११ ॥ कोणि येके दिवसिं चाफळासि

येतां । विचारिलें तया हनुमंता । डोलविला तेणें माथा । स्वामिसि तत्वता पाहुनि ॥ १२ ॥ तो याकडि मान अद्यापि आहे । जन सर्वत्र देखताहे । अैसें समर्थ रामदास पाहे । न कारिति काम येक ते ॥ १३ ॥ आदौ मुख्य अवतार तो चि । पारि जगासि वाट लावणें भक्तींची । म्हणुनि लिला दाविलि साचि । नातरि कैचि भेदोक्ति ॥ १४ ॥ आत्मत्वि पाहा विचार । बाहिर सहजि साक्षात्कार । कासया श्रमति बाउगे नर । सांडुनि विचार गुरुकृपा ॥ १५ ॥ असो शिवाजी राजियास । उपदेश केला रामदासें । तयाचें कारण करुनि अवकाशे । येकाग्र मानसें अववारा ॥ १६ ॥ रायगडास राजा असतां । स्वारि माहाडास गेली तत्वता । तेथें ऐकिली सहजी कथा । सुंदर गाथा शिवाजीनी ॥ १७ ॥ तये कीर्तनीं अनुसंधान । श्रीगुरुमाहात्म केलें वर्णन । ध्रुवराज्ञासि नारदमुनिनें । केलें पावन चरित्र तें ॥ १८ ॥ प्रौढि ऐकुनि वैराग्याची । वेधलि वृत्ति शिवाजीची । उपरति जालि नेमाचि । मुरडलि साचि वृत्ति पै ॥ १९ ॥ पुन्हा येउनि रायगडासि । प्रार्थना केलि कुळदेवीसी । निद्रा लागतां डोळियासि । दृष्टांत राजासि पडला तो ॥ १२० ॥ स्वप्नि येउनि जगन्माता । सांगति जाहलि सकळ वृत्तांता । शरण जावे सद्गुरुनाथा । रामदास समर्था गुरुवर्या ॥ २१ ॥ कल्याणार्थ तुझे पाहीं । अवतार जाहाला प्रत्यक्ष महिं । अनुसरतां तयाचे पाईं । सकळ कांहि काम पुरतीं ॥ २२ ॥ थापटुनि सावध केलें । स्वमुखें देविनें सांगितलें । मग न पडे चैन जातसे पळ । गणि भुपाळ युगापरि ॥ २३ ॥ तात्काळ स्वारि सिध्द करून । चाफळासि आला नृपति जाण । शोध केला बहु ठिकाण । परि दर्शन न होये चि ॥ २४ ॥ तेव्हां श्रीरामासि करूनि नमन । देवापुढें ठेविले कांहि व्हन । उत्तरेकडील तटाक बांधउन । शिवाजी निघोन गेला पै ॥ २५ ॥ परि लागला निजध्यास । निद्रा नाहिं डोळियास । केव्हां पाहिन रामदास । राजीयासि हें चि वाटे ॥ २६ ॥ कारभार समूळ राहिला । सेनासमुदाय घाबिरा जाहाला । प्रधानादिका विचार पडला । राण्या बैसल्या तटस्त ॥ २७ ॥ सातदिवसपर्यंत पाहि ।

राजियासि अन्न नाहिं । वेधली वृत्ति रामदासपाईं । छंद हृदईं दर्शनाचा ॥ २८ ॥ तये काळि मध्यरात्रि । रामदास पाहिले स्वप्नि नेत्रि । महा-प्रसाद करपात्रीं । नारेळ स्वतंत्रि दिधला तो ॥ २९ ॥ संतोष केला राजिया मना । म्हणति शिवबा कारि भोजना । शनिवारिं भेट होईल जाणा । स्वसुखसदना पावसि तूं ॥ १३० ॥ तो जागृत होतां भूपाळ । हस्ति प्रत्यक्ष श्रीफळ । अंतःकर्ण चाकाटले । सद्गत जाहले मानसि ॥ ३१ ॥ निवेदन केलें मातुश्रीते । प्रधानादिकां कळलें समस्त । निजध्यास तो सदा चित्त । रामदास समर्था भेटिसि ॥ ३२ ॥ स्नान कराया सहजस्थिति । शिवाजी पातले माहुलीप्रति । तेथें पत्र शिष्या-हातिं । पाठविलें प्रीति स्वामीनीं ॥ ३३ ॥ मग तो आनंद कीति म्हणावा । स्वसुख पावले अत्यंत जीवा । शिवाचा तो अक्षै ठेवा । अभंग वर्णा बहुयुक्ति ॥ ३४ ॥ श्रीस्वामीचा अभंग ॥ ते पत्रिका अभंगार्थ । आवडि गाति सकळ संत । असो शिवाजी नृपनाथ । अनुग्रहार्थ गेले चाफळा ॥ ३५ ॥ समागमें बहु चतुर । कारभारि घेतले काहिं नर । पुढें पाठविला सांडिस्वार । माजगांव पवित्र तेथुनि ॥ ३६ ॥ तो शिंगणवाडिसि आहे समर्थ । ऐसा कळता राज्यासि वृत्तांत । शिवाजी पाय उतारा तेथें । गेले चालत अनुग्रहासि ॥ ३७ ॥ कल्याणस्वामी समर्था जवळि । अष्टौ प्रहर असति सर्वकाळिं । अनुग्रहार्थ विनंति केलि । गुरुमाउली दाखवी म्हणुनि ॥ ३८ ॥ अधिकार पाहुनी कल्याणस्वामी । कळवळले बहु अंतरयामीं । बैसले होते जेथें स्वामि । प्रार्थिले सप्रेमी जाउनि तेथें ॥ ३९ ॥ हास्य करुनि श्रीरामदासें । ह्मणति कल्याणा सांगतोसि तें कळले असे । येऊं द्या येथें शिवाजीस । अज्ञा असे आमुचि पै ॥ १४० ॥ तात्काळ राजा जाऊनि तेथें । घातिला साष्टांग दंडवत । कल्याण स्वामिंनि विधियुक्त । अर्चिला गुरुनाथ राजकरें ॥ ४१ ॥ तये पूजेचा विस्तार लिहितां । ग्रंथ नाटोपे सर्वथा । अनोपम्य वस्त्रें जव्हार पाहतां । न करवे गणिता, सुवर्णासि ॥ ४२ ॥ असंख्य व्हन तेथें उधळिले । ते गुरेख्या पोरानि गोळा केले । अद्यापि तेथे हुडकिता स्थळ । सापडति प्रांजळ

भाविकासि ॥ ४३ ॥ असो सांप्रदाय क्रमें करुनि । अनुग्रह दिधला शिवाजि लागोनि । मंत्र सांगतां निज कानीं । लाधली उन्मनि राज्यासि ॥ ४४ ॥ जैसा स्फुलिंग दारुत पडतां । आवाज उठे तो तत्वता । नातरि सूर्य प्राप्त होतां । अंधार सर्वथा न उरे चि ॥४५॥ असो फार काय दृष्टांत घेणें । अधिकारि शिवाजी मुक्तीचा पूर्ण । रामदासस्वामि सद्गुरु जाण । जीवन सकळ संतांचे ॥ ४६ ॥ मस्तकीं ठेविलां वरदपाणि । वरिले सहजी तेणें उन्मनि । प्रगट जाले स्वरूप नेनि । अंतःकर्णि निर्द्वंद्व ॥ ४७ ॥ द्वैताद्वैत सरला भ्रम । अन्वय व्यतिरेक कैचा नेम । आपुला आपण आत्माराम । लाधले वर्म गुरुकृपें ॥ ४८ ॥ जड समाधि विसर्जून । सहज स्थिति दाविलि खूण । ग्रंथी न करवे तें लेखन । सद्गुरु धन्य श्रीरामदास ॥ ४९ ॥ उपदेश जाहल्यानंतर । प्रसादार्थ पसरिला राज्यानें पदर । तये कालि श्रीगुरुवरें । चमत्कार केला पै ॥ १५० ॥ ह्मणति शिवबा तुझें कल्याण । प्रत्यक्ष करिल हा कल्याण । पदर असो दे तैसा चि जाण । प्रसाद पूर्ण लाधसि तूं ॥ ५१ ॥ ऐसें वदुनि कल्याणास । आज्ञा केलि श्रीरामदास । चाफळीं नेहून शिवाजीस । उपासनेस प्रगटवि तूं ॥५२॥ श्रीरघुपतीस प्रार्थना करून । तुरा मागून यावा आपण । राज्याचे मस्तकीं ठाउन । प्रसाद करणें तयासि ॥५३॥ वंदन करुनि पदकमळिं । कल्याण आले श्रींचे देउळीं । उभे ठाकले रामा जवळि । बंचाजुळि पसरिली पै ॥ ५४ ॥ ह्मणति राघवा शिवाजिला । तुरा पाहिजे आपुला दिधला । स्वात्मसुख निजमह्राला । राजपदाला पावेल तो ॥ ५५ ॥ प्रार्थना परिसोनि च्यापपाणि । हसिन्नले गदगदवाणि । कल्याणानें जोडिले पाणि । तुरा हातानि टाकला त्यात ॥ ५६ ॥ कल्याण स्वामीनीं घेतां हातीं । मोगरयाचे कळ्याची जाहलि मोति । अद्भुत ते ढाळ देति । संतोष चित्ति शिवाजीस ॥५७॥ स्वहस्तें तुरा लाविला । श्रीफळ प्रसाद पदरांत घातिला । उभय योग तो लाभ सुचविला । परमार्थ सोहळा राजभार ॥ ५८ ॥ मूर्तिमंत स्वयें कल्याण । मस्तकीं ठेविला कर तेणें ।

शिवाजि राजा आनंदानें । करि नमन प्रेमभरें ॥ ५९ ॥ हे आख्यान रूपी भागीरथी । संगमीं मिनलि तेथें मति । प्रवाह चालिला पुढें निगुती । शब्दोदक निश्चित परिपूर्ण ॥१६०॥ श्रवणें स्नान श्रोतियासि । घडतां सकळ दोष नासि । उत्पन्नता या तीर्थासि । हृदय निश्चसि सिध चरण ॥ ६१ ॥ श्रीवछलांछन जयाचे अंगि । प्रसिद्ध अवतार जो कां जगिं । मेळविले तेणें अभंगि । कथा रंगिं राजारामि ॥ ६२ ॥ भक्तमंजरिमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । रामदास सद्गुरुचरित्रातें । जाहाला समाप्त पंचमोध्यायः ॥ १६३ ॥

## अध्याय ६

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु आत्मयारामा । तूं स्वामिया बीज वेदद्रुमा । अकार उकार मकारोत्तमा । रेफधर्मा प्रणव बिंदु ॥१॥ ऋग्वेद पत्र निज वृक्षाचे । साम गर्भ ह्मणति साचे । यजुर्वेद कंद गर्जति वाचें । स्वानुभवाचे पूर्ण योगी ॥ २ ॥ पादपाचा त्या सुगंध । अथर्वण तो वेद प्रसिद्ध । यज्ञ रुपिणी छाया शुद्ध । सुसीतळ सिद्ध सर्वांति ॥३॥ तयाचा आमोद द्विज सेविति । अहोरात्र पठण करिति । उपनिषध भाग सार कथिति । मुख्य स्थिति तया आत्मत्वें ॥ ४ ॥ मुळीं बीज अंतीं बीज । अंतर्बाह्य तो श्रीरघुराज । सद्गुरुकृपें फावले निज । परिपूर्ण सहज ऐक्यत्वें ॥५॥ तया चरणिं ठेउनि शिर । वदतसे कथा श्रीचरित्र । सर्वांगाचे करूनि श्रोत्र । लीला पवित्र अैकिजेति ॥ ६ ॥ मागील अध्याईं शिवाजीस । उपदेश केला रामदासें । अज्ञा केलि कल्याणास । द्यावयास निज प्रसादु ॥ ७ ॥ कल्याणस्वामी प्रार्थना करितां । कृपा आली श्रीरघुनाथा । डोलविला आनंदें माथा । तुरा तत्वता दिधला पै ॥ ८ ॥ खोवोनि तुरा तो मस्तकासि । राजा पावला सुख मानसिं । वंदन केलें कल्याणासि । अत्यादरेंसि शिवाजीनीं ॥ ९ ॥ तो इतुकीयांत स्वामिसमर्थ । येते जाले आपण मठात । सिद्ध करूनि स्वयंपाकातें । घातले समस्त पात्रेसि ॥ १० ॥ भोजन करुनि सैन्यासहित । आसनि

बैसले स्वामिसमर्थ । शिवाजीनें जोडिले हात । अनन्युक्त सद्गुरुसि ॥११॥ तये काळीं रामदास । बोलते झाले शिवाजीस । म्हणति सकळ ऐश्वर्यास । अर्पिले आम्हांस तुवा पै ॥ १२ ॥ तरि आतां आज्ञा अमुची । मान्य करणें तुज साचि । सेवा करूनि रामाची । करवि राज्याचि वहिवट ॥ १३ ॥ आज्ञा वंदुनि शिवाजीनें । नमन केलें मागुति जाण । प्रेमाश्रूनें गळति नैन । गेला निघोन स्वस्थाना ॥ १४॥ परि सर्वकाळ गुरुपदिं । निमग्न जाहाली तयाचि बुधि । न विचारितां कार्यसिधि । करणें कधि नाहिं जया ॥ १५ ॥ आठा चह्र दिवसा येऊन । करावें साकल्य निवेदन । मागुति जावें आज्ञा घेऊन । ऐसें करणें सर्वदा ॥ १६ ॥ गनीमानें कोणि येक समईं । चढाई केली असे पाईं । तये काळीं दर्शन नाहिं । राजा ह्रदईं चिंतातुर ॥ १७ ॥ कारभारि तेव्हां विनंति करिति । राजेंद्रा आतां कोण गति । स्वारि न करि शिवाजी म्हणति । समर्थाप्रति विचारिल्याविणें ॥ १८ ॥ मग संकटीं पडले समस्त । न सुचे उपाय करणातें । तये वेळीं अकस्मात । सद्गुरुनाथ प्रगटले ॥ १९ ॥ पुढें आज्ञा शिवाजीस । करिते जाहले रामदास । म्हणति राम व्यापक असे । वियोग नसे सर्वथा ॥ २० ॥ परि तुझा सदृढ भक्तियोग । आणि आम्हांसि फिरणें चहुंकडे लागे । तरि तुझें न पडे व्यंग । ऐसा प्रसंग सांगतो पै ॥ २१ ॥ सर्व कारणा मुख्य शक्ति । विचारावि तियेसि युक्ति । सांगेल तुजला ती भगवति । जे जे चित्तिं इछिसि ॥ २२ ॥ आपुलेपणा आम्हि तेथें । देवीपासि ठेवितो निश्चित । रात्रौ येऊनि दृष्टांतातें । जाईल सांगत जगदंबा ॥ २३ ॥ ऐशा प्रकारें आज्ञापितां । चरणावरि ठेविला माथा । आनंद जाला शिवाजीचित्ता । स्वामी तत्वता गेले निघोनि ॥ २४ ॥ पुढें कांहिं दिवसानंतर । रायगडिं असतां नृपवर । गोमांतकि आंबे सुंदर । आली नदर शिवाजीसि ॥ २५ ॥ रात्रीमाजी राणियासहित । बैसला राजा उपहार करित । तये काळीं चोपणातें । घेतला हातांत आंबा तो ॥ २६ ॥ अच्युतफळ लावितां मुखासि । स्वामीची

आठवण जाहली मानसिं । अश्रु पातले नेत्रासि । प्रेम चित्तासि उचंबळले ॥ २७ ॥ म्हणे माझ्या श्रीगुरूस । अर्पण व्हावा ऐसा रस । टाकुनि उठला फळआहारास । उद्विग्न विशेष राजा तो ॥ २८ ॥ रामदास माहाराज सद्गुरुनाथ । जो कां अवतार पूर्ण हनुमंत । रामघळींत बैसले होते । समजले समर्थहृत्कमळीं ॥ २९ ॥ कल्याणासि म्हणति सख्या । येकटे असावे च्यार घटिका । शिवाजी स्मरतो मजला देखा । इछितो निका भेटिसि ॥ ३० ॥ मग मनोवेगें रायगडासि । मारली थाप येऊनि द्वारासि । हाक मारितां शिवाजीसि । शब्दासि तेणें वोळखिले ॥ ३१ ॥ राजासि आनंद जाला चित्तिं । आम्रे भक्षण केलें प्रीति । माग़ुति निघाले सत्वरगति । विस्मय चित्तिं नृपवरा ॥ ३२ ॥ म्हणे, स्वामिया आलेति कैसें । आतां जाणें कोणते स्थळास । समर्थासि आलें हंसें । दाविले सुरस ध्यान पै ॥ ३३ ॥ भीमस्वरूप तात्काळ धरिले । गडावरि येक दुसरे खालिं पाडले । राजयाचे नेत्र झाकिले । वेगिं परतले माघारें ॥ ३४ ॥ असो ऐशा अनेक लीला । मति न पुरे त्याहावयाला । कोणी येके दिवसिं दर्शनासि आला । राजा भला रामघळित ॥ ३५ ॥ निबिड अरण्य पर्वतदरि । वनचरें वेष्टित रामदास निर्धारिं । बैसले तेथें नमस्कारि । तृतीय प्रहरीं राजेंद्रा ॥ ३६ ॥ वैशाखमास निघति ज्वाळा । राजा तृषेनें घाबिरा जाहला । शोध करितां उदकाला । न दिसे नेत्राला कोठें चि ॥ ३७ ॥ तये काळिं सद्गुरुसमर्थें । कुबडि घेतालि स्वहस्तें । पाषाण ढकलुनी जळातें । प्रगट गंगेते पै केले ॥ ३८ ॥ सैन्यासहित शिवाजीनें । केलें तें चि उदक प्राशन । अद्यापि आहे तें जीवन । पाहति जन दृष्टिसि ॥ ३९ ॥ आणी तैसें चि कोणि येक वेळे । दर्शनासि आला शिवाजि नृपाळ । तये काळिं केलें नवल । ऐका सकळ श्रोते हो ॥ ४० ॥ दोन प्रहर वेळा जाहली । राजाची स्वारि घळिस आलि । रामदासस्वामीनीं आज्ञा केली । करूनि आंघोळि यावया ॥ ४१ ॥ कल्याणासि म्हणति आतां । उगे च बैसला काय पाहतां । क्षुधा लागली नृपनाथा । वाढीं सर्वथा

भोजनासि ॥ ४२ ॥ चरणीं ठेउनि निजमस्तक । खुणेसि पाचळा कल्याण देख । विवरांतुनि पात्रें अनेक । ततक्षणीक काढिलीं ॥ ४३ ॥ दिव्यान्नें मघमघीत । परिमळ दाटला पंक्तित । भोजन केलें सैन्यासहित । मनीं विस्मित शिवाजी ॥ ४४ ॥ म्हणे स्वामिया तुमची लीला । काय कळे मज पामराला । अरण्यामाजि जेवविला । समुदाय भला सकळिक ॥ ४५ ॥ तरि हें आहे कैसें सांगा । दयासागरा तूं सुख तरंगा । संशयातें समूळ भंगा । अक्षई अभंगा श्रीगुरु ॥ ४६ ॥ तये वेळि करूनि हास्य । शिवाजीस बोधिले रामदासें । म्हणति प्रत्यक्ष पाहाणें असे । सांगति तुम्हास तरि तुकोबा ॥ ४७ ॥ मग साष्टांग नमुनि घेतलि आज्ञा । राजा पावला आपुले स्थाना । इकडे श्रीपंढरीचा राणा । करि संज्ञा तुकयासि ॥ ४८ ॥ हनुमंत अवतार रामदास । भूमंडळामाजि जाहला असे । घेऊनि तयाचे दर्शनास । लाहिजे सुखास निरंतर ॥ ४९ ॥ आज्ञापिता ऋषिकेशी । हर्ष जाहला तुकोबासि । येते जाहले चाफळासि । रामदासासि भेटावया ॥ ५० ॥ मग तो प्रेमा उभयतांचा । ग्रंथि न करवे लेखन साचा । विभाग होतो गुरुपुत्राचा । जेथें वाचेचा सौरसु ॥ ५१ ॥ असो पूर्वीं शिवाजीस । आज्ञा केलि रामदासें । म्हणुनि गेले देहुस । कथा विशेष ति ऐका ॥ ५२ ॥ तुकाराम पाहावयासि । फौजेसहित देहु क्षेत्रासि । राजा पातला हेतु मानासिं । प्रत्ययासि पाहावयाते ॥ ५३ ॥ तुकोबा माहाराज नुगते तेथें । चाफळाहुनि आले होते । तव ऐकिला वृत्तांत । दर्शनार्थ आला नृपवर ॥ ५४ ॥ तत्काळिक स्वामीसारिखे । दाखविले राजासि कौतुक । जेवविले सकळ लोक । अपार देख क्षणामाजि ॥ ५५ ॥ शिवाजी बोले तुकारामा । अगाध तुमचा संतमहिमा । उभयतांचा ऐक्य प्रेमा । संशय तमा वारिले पैं ॥ ५६ ॥ तेव्हां तुकोबा वदति राजियातें । धन्य तुमचा सद्गुरुनाथ । जो कां अवतार श्रीहनुमंत । दर्शनें कृतार्थ मी जाहालो ॥ ५७ ॥ आतां सांगणें तुम्हा हें चि । सेवा करावि श्रीस्वामीची । पदवी प्राप्त साम्राज्याची । वाट मुक्तीची सुलभ ते ॥५८॥

सकळ कल्याणाचा ठेवा। सद्गुरुपदीं भाव ठेवा। तरी च तुटेल हा भवगोवा। इंद्रिय गोवा श्रीरामपदीं ॥५९॥ ऐसे बोधितां तुकाराम। उचंबळलें शिवाजीस प्रेम। अंतःकर्ण जाहलें आराम। स्मरतसे श्रीराम याचेसि ॥ ६० ॥ तुकोबासि करितां साष्टांग नमन। तेणें दिधलें आलिंगन। आज्ञा घेतलि आनंदानें। करुनि वंदन पुनःपुना ॥ ६१ ॥ आधीं च प्रेम श्रीगुरुचरणीं। तयांत बोधिलें तुकोबानिं। मग तो निजध्यास लागला मनिं। दुजे नाणि हृदयांत ॥ ६२ ॥ निद्रा करितां स्वप्नामाजि। उसणत उठे राजा शिवाजि। देखिली काय गुरुमाय माझी। विचारि सहजी झोपेंत ॥ ६३ ॥ वारंवार चाफळासि निघोन। जातसे राजा घ्यावया दर्शन। कोणि येके दिवसिं करूनि नमन। कर जोडुनी प्रार्थीतसे ॥ ६४ ॥ म्हणे महाराज किल्ला परळी। आपण राहावें तये स्थळीं। मी सेवक पायातळीं। निकट जवळि सातारिया ॥६५॥ आग्रह अत्यंत पाहुनि। अवश्य म्हणति कैवल्यदानी। सज्जनगडिं त्या राहातानि। दिधले नेमुनि कारखानीस ॥ ६६ ॥ जें जें कांहिं लागति पदार्थ। ते ते पुरवावे कोंडोपंतें। सर्वकाळ जोडोनि हात। निनोजी निश्चित काटकर तो ॥६७॥ सर्व प्रकारें सेवेमाजि। राजा तिष्ठे तो शिवाजी। नेमणुक करितां ऐशी सहजीं। गुरुमाय माझी राहिली ती ॥ ६८ ॥ आका वेणु बयाबाई। शिष्यमंडळि आणिक पाहि। कांहिं चाफळीं परळीसि कांहिं। ठाई ठाई वास करिति ॥६९॥ अंगापुरिं कृष्णेंतुन। निघाली पूर्वि जे देवि जाण। तयेचें केलें तेथें स्थापन। परळी धन्य किल्ला तो ॥ ७० ॥ नंदादीप नैवेद्यादिक। करूनि दिधली नेमणुक। शिवाजी राजा आज्ञाधारक। अलौकिक प्रेम तें ॥ ७१ ॥ शिष्यसहित श्रीरामदास। सज्जनगडिं त्या करिति वास। संत मंडळी दर्शनास। येति विशेष तये स्थानिं ॥७२॥ तव आषाढी यात्रा आली। अपूर्व गोष्ट तेंव्हां जाहलि। संतवृंदे सकळि निघाली। असंख्य मळी सर्वत्र ॥ ७३ ॥ रामदासस्वामी तैसे चि तेथें। राहाते जाहले शिष्यासहित। तये काळीं पंढरीनाथ। उद्विग्न बहुत मानसीं ॥ ७४ ॥ म्हणति सकळ संतांचा।

मुगुटमणि रामदास साचा । जो कां अवतार हनुमंताचा । भ्राम्त मणाचा स्वामि पै ॥ ७५ ॥ न येतां ते यात्रेसि । कासया राहणें पंढरिसि । ऐसे बोले ऋषिकेशि । रुक्मीणीसी प्रीतीनें ॥ ७६ ॥ मग घेऊनि ब्राह्मणाचा वेश । निघाले स्वयें पंढरीनिवास । येते जाहले परळीस । रामदासास न्याहावया ॥ ७७ ॥ म्हणति स्वाईक मी पंढरीचा । सेवाधारि सकळ संतांचा । येतिज तितुके साधुचा । पादपूज साचा घेणें मजकडे ॥ ७८ ॥ अधिकार हा क्षेत्रस्थानिं । दिधला करूनि सर्वत्रानिं । बहुत दिवस तये स्थानीं । वास्तव्य करुनि राहातसें ॥ ७९ ॥ संतकृपेचा हा देह । याल तितुकें खाउनि आहे । कुटुंब पोषण सांत चि होय । ध्यातसे पाय साधूचे ॥ ८० ॥ राजगुरुत्व आपणासि । ऐकिले उत्कृष्ट कीर्तीसी । ह्मणोनि आलो या स्थळासि । पंढरीसि न्याहावया ॥ ८१ ॥ ऐसे बोलतां तो ब्राह्मण । समर्थ वदति तयालागुन । आह्मि सर्वथा उदासीन । हा नसे जाणा कांहिं चि ॥ ८२ ॥ तशांत अमुची उपासना । राम चि येक सर्वथा जाणा । तयाविण दैवतें नाना । काय नैना पाहूनि ॥ ८३ ॥ रामदासस्वामी हें वाक्य बोलतां । हासिन्नले द्विज तत्वता । ह्मणे स्वामि हें काय सांगतां । राहतसा सर्वथा तेथेंचि ॥ ८४ ॥ पंढरिक्षेत्रीं श्रीरामविणें । देव दुसरा नाहिं पआन । खटके तरि वाहतो आण । करुनी प्रमाण विश्वाचा ॥ ८५ ॥ विप्रें तेणें ऐशापरि । शफत वाहतां निर्धारिं । रामदासस्वामि निज अंतरिं । सद्गद शरिरीं जाहलें बहुत ॥ ८६ ॥ तये वेळिं कल्याणस्वामी स्नानासि । गेले होते कृष्णोदक आणावयासि । न सांगतां अन्य शिष्यासि । पंढरिसि निघाले ॥ ८७ ॥ समागमें तो ब्राह्मणवेश । भगवान स्वयें पंढरिनिवास । मार्गे क्रमिति रामदास । भजन विशेषें करीत पै ॥ ८८ ॥ जेथें जेथें स्वामींनीं उतरावे । स्नान संध्यादि देवार्चन करावें । तये वेळिं साहित्य सर्व । करी भावें तो विप्र ॥ ८९ ॥ पादरक्षा न घालिता समर्थ । पंढरिचा चालती पंथ । कांटे रुतति पायांत । चिखल बहुत तये वेळिं ॥ ९० ॥ मग विप्रस्वरूप जो पांडुरंग । मांडिवरि

घेउनि चरण स्वांगे । कांटे काढि रमारंग । श्रमभंग श्रीहरि ॥ ९१ ॥ पुढें कल्याणादिक शिष्य सकळ । मागाहुनि आले पंढरी जवळ । भजन कडाका ध्वनि प्रबळ । आकाश भरलें गजरें त्या ॥ ९२ ॥ नृत्य करित आनंदेंसि । पातले स्वामी राउळासि । समागमिचे द्विजवरासि । दाखवि दृष्टिसी राम ह्मणति ॥ ९३ ॥ मारुतिपर्यंत धरूनि हात । बरोबर आला विप्र निश्चित । दाउनि स्वामीसि नेत्रसंकेत । जाहला गुप्त तेथें चि ॥ ९४ ॥ हनुमंत पाहतां रामदास ह्मणति । देउळांत असेल सीतापती । अवलोकितां परम प्रीति । देखिली मूर्ति श्रीविठल ॥ ९५ ॥ तये काळीं स्वामीनीं । करुणा भाकिली अभंग करुनी । ते अद्यापि संत कीर्तनीं । गाति धरुनी निज भाव ॥ ९६ ॥

## अभंग रामदास स्वामींचा

येथें उमा कां श्रीरामा । मनमोहन मेघःशामा ॥ ध्रु० ॥
काय केली अयोध्यापुरी । येथें वसविली पंढरी ॥ १ ॥
काय केली शरयुगंगा । येथें आहे चंद्रभागा ॥ २ ॥
किळकिळाट वानरांचे । थवे न दिसती तयांचे ॥ ३ ॥
दिसे हनुमंत येकला । हा कां सैन्यांतून फुटला ॥ ४ ॥
काय केले धनुष्यबाण । कर कटावरी ठेऊन ॥ ५ ॥
काय केली सीता सती । येथें बहुत जणी दिसती ॥ ६ ॥
आतां पहिला ऐसा होईं । रामदासा भेटी देईं ॥ ७ ॥

असो स्वामीनीं करितां श्रीरामध्यान । विठल जाहले रघुनंदन । रुक्मीणीसी वदती जगजीवन । लवकर होय सीता तूं ॥ ९७ ॥ जेणें कांहिं कृष्णावतारिं । गरुडासि मारिले मुखावरि । तो हा अवतार पृथ्वीवरि । कलींत निर्धारिं रामदास ॥ ९८ ॥ रामभक्त तो निस्सीम । अद्भुत पाहतां जयाचें प्रेम । मी च जाहालों स्वयें राम । होईजे परम सीता तूं ॥ ९९ ॥ ऐसें ह्मणतां च रुक्मिणी । जानकी जाहली तत्क्षणीं । वामांगीं बैसली येउनि । जगजननी आदिमाया ॥ १०० ॥ लक्ष्मण जवळि श्यामरे दाखिति । धनुष्यबाण घेतले हातिं । सिंहासनिं श्रीसीतापति ।

ध्यानस्थिति अनोपम्य ॥ १ ॥ मग तो आनंद सांगणें किति । रामदासें पाहिलि श्रीराममूर्ति । नमस्कार घातिला साष्टांग क्षितीं । दाटले चित्तिं अष्टभाव ॥ २ ॥ लगबगेंसि धाऊनि त्वरें । पायावरि ठेविलें शिर । आलिंगन दिधलें श्रीरघुवीरें । अत्यादरें प्रेमभरित ॥ ३ ॥ देवभक्त येक जाहले । तया सुखातें न जाय वर्णिलें । अनिर्वाच्य ठाईंचे भले । कोण वर्णील तया सुखा ॥ ४ ॥ पंढरीची अयोध्या केली । ऐसि कृपालु विठ्ठल माउलि । जे जे उपासना जया भली । ते ते आळी पुरवितसे ॥ ५ ॥ असो श्रीराम आणि रामदास । उभयता संवाद करिति विशेष । तेथें उभा कल्याण असे । सकळ शिष्य सभामंडपिं ॥ ६ ॥ तये वेळिचें भाषण आतां । उघड ग्रंथीं नये बोलतां । वाचा पावति तन्मयता । करि चित्ता चैतन्य ॥ ७ ॥ मग भजनासि प्रारंभ केला । शिष्यसमुचय भोवता मिळाला । रंगशिळेवरि गजर जाहला । तो सोहळा न वर्णवे ॥ ८ ॥ तये काळिं श्रीभगवान । दाशरथी जो रघुनंदन । सिंव्हासनीं डोलति जाण । ऐकुनि भजन रामदासाचें ॥ ९ ॥ संतमंडळि समग्र मिळोन । रामदास स्वामींसी केलें वंदन । म्हणति आजि श्रीरामदर्शन । तुमचे कृपेनें घडलें पैं ॥ ११० ॥ श्रीगोंदेकर शेख महंमद । तुकारामादि साधु प्रसिध्द । अनेक पातलीं संतवृंदें । विविध नामें तयांचि ॥ ११ ॥ कल्याणकर शिवरामभट । जयरामस्वामी गुरुभक्त श्रेष्ठ । रंगनाथ समर्थ आत्या वरिष्ठ । प्रेमळ स्पष्ट आनंदमूर्ति ॥ १२ ॥ केशवस्वामी वामनपंडित । निरंजन श्रीगाणपत्य । अनेक मिळाले भगवद्भक्त । आषाढी यात्रेंत त्या समई ॥ १३ ॥ सर्वत्रासि विस्मय जाहला । म्हणति मारुती च स्वयें अवतरला । अद्भुत जयाची पाहता लीला । केले विठ्ठला श्रीराम ॥ १४ ॥ पंढरीची अयोध्या केली । प्रत्यक्ष असतां युग हें कलि । धन्य कृपालु गुरुमाउली । ऐसी मंडळी बोलतसे ॥ १५ ॥ मग समस्त संत मिळोन । देवाळयासी आले जाण । प्रार्थियेला श्रीरघुनंदन । म्हणति व्हावें विठ्ठल आतां ॥ १६ ॥ ते वेळीं श्रीजानकीनिवास । बोलते जाले

सकळ साधूस । यात्रेसी आलेति रामदास । तुम्ही तयास विनवा पै ॥ १७ ॥ तेणें सांगितल्यावीण कांहि । स्वरूपासि पालट होणार नाही । दासांकित सदा पाहि । मेणे सोई दुजि ते ॥ १८ ॥ जेणें हातें कुलुप घातलें । तेणें चि पाहिजे पुन्हां काढिलें । दुसरे किल्लीसि तेथें आणिलें । द्वार उघडलें नर जाय ॥ १९ ॥ तैसें चि येथें घडलें जाण । रामदासास्तव राम होणें । विठल मागुति केलें तेणें । पालटे ध्यान तरि च ॥ १२० ॥ ऐसें सांगतां श्री रघुनाथें । परतले माघारे तेथुनि संत । रामदासस्वामी बैसले होते । आले तेथे सकळिक ॥ २१ ॥ सर्वत्रांनि साष्टांग नमन । करुनि उभे ठाकले जाण । म्हणति सर्वांत स्वामि आपण । समर्थ संबोधन शोभे तुम्हा ॥ २२ ॥ सिद्ध करुनि उपासनेते । चमत्कार दाविला कलियुगांत । आतां मागुति पूर्ववत । पंढरीनाथ व्हावे पै ॥ २३ ॥ प्रार्थितां साधु सर्वत्र ऐसें । रामदास स्वामींनीं करुनि हास्य । येते जाहले देउळास । अति उल्हासें भजन करित ॥ २४ ॥ संतमंडळीसमवेत । अवलोकिला अयोध्यानाथ । करूनि साष्टांग प्रणिपात । जोडिले हात स्वामिनिं ॥ २५ ॥ ह्मणति दयाळ रामाबाई । माझे अनाथाचे आई । युगायुगीं तुझे पाईं । असो ठाईं अनन्यता ॥ २६ ॥ आतां मागुति ध्यान पुर्वील । प्रगट करावे दीनदयाळें । निजदासाचि पुर्वीली आळ । जाहला सुकाळ आनंदाचा ॥२७ ॥ ऐसें वदतां च रामदासें । पोटासी धरिलें अयोध्यानिवासें । ह्मणती सखया भेद नसे । विठ्ला वेश धरिला मीं ॥ २८ ॥ मग तात्काळ श्रीभगवान । पूर्ववत धरिलें स्वरूप तेणें । विटेवरि समचरण । करुणावन पांडुरंग ॥ २९ ॥ कटावरि कर शोभाति । गळा माळा वैजयंति । श्रवणिं कुंडलें तळपति । कासे निश्चिति पीतांबर ॥१३०॥ अवलोकितां ध्यान ऐसें । अभंग केला रामदासें । श्रीराम पांडुरंगा भेद नसे । हा अर्थ विलसे तयामाजि ॥ ३१ ॥ मग स्वामिसमर्थें ते वेळा । कीर्तनाचा बहर केला । पौर्णिमेसी गोपाळकाला । सांग जाला यथोक्त ॥ ३२ ॥ यात्रा साग करोनि देवापाशि । आले स्वामि निरोप

ऐकावयासि । तये वेळिं रुक्मिणिविठ्ठलासि । सद्गद मानसिं बहु जाले ॥३३॥ म्हणति रामदासाते च्यातुर्मास । राहावें तुवां पंढरिस । प्रत्यहिं करावें भजनास । रंगशिळेवरी शिष्यसहित ॥ ३४ ॥ आज्ञा वंदुनि शिष्यसहित । वास केला श्रीक्षेत्रांत । आनंद जाहाला वैष्णवांतें । तुकाराम संत इत्यादि ॥ ३५ ॥ जयराम स्वामीचे मठाजवळ । क्षेत्रस्थांनीं दिधलें स्थळ । मठ केला तेथें प्रांजळ । भजन केवळ करावया ॥३६॥ नेमणूक पन्नास रुपये करूनी । खर्चास दिधले शिष्यजनिं । वेधली वृत्ती स्वामींचरणीं । क्षेत्रस्थजनीं आनंद ॥ ३७ ॥ माहाद्वारिं श्रीरंगनाथ । कीर्तन करिती राउळांत । ऐकावयासि मिळती श्रोते । आरमवेचे सकळिक ॥ ३८ ॥ तयांत मुख्य रामदासाविणें । प्रारंभ न करिति कथेसि जाण । सर्वांमध्यें श्रीहनुमान । अवतार पूर्ण यालागि॥३९॥ असो च्यातुर्मास्य करुनि समाप्त । परोळीसी आले स्वामीसमर्थ । प्रतिवर्षि यात्रेसि जात । आषाढीयुक्त कार्तिकीसि ॥ १४० ॥ मथडेग्राम भीमातीरीं । तेथें येतां स्वामीची स्वारी । मार्गामाजि त्या अवसरिं । जाहली वरि गोष्टि ते ॥ ४१ ॥ श्रीविठोबा रखुमाईच्या मूर्ति । सांपडल्या सहजि जातां पंथि । आनंदले रामदास चित्तिं । झोळिंत घालिति उचलोनि ॥ ४२ ॥ तात्काळ आणुनि स्वमठासि । स्थापन केल्या पंढरीसी । मथडेकर ब्राह्मणासि । तेथें पूजेसि योजिलें ॥ ४३ ॥ अनुग्रह तयासि देउनि । मठिं स्थापिला स्वामिनिं । गोपाळकाला तये स्थानिं । करिति मिळोनि सकळिक ॥ ४४ ॥ पुढें चमत्कार कथा गहन । परिसोत भाविक जन । पंढरीनिवास जानकीजीवन । रघुनंदन प्रसन्न तो ॥ ४५ ॥ संतकथा ऐकावयासी । उमा ठाकला वैकुंठविळासी । नाशिकामी दृष्टीसि । जाहालि देवासि येकाग्रता ॥ ४६ ॥ अवधान दिधलें श्रीविठलें । म्हणुनि ग्रंथासि आरंभिलें । राजारामी स्फुर्ण जाहलें । सिद्धदयाळकृपेनें ॥ ४७ ॥ भक्तमंजरीमाला ग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । रामदासस्वामीचरित्रातें । अध्याय समाप्त षष्ठम ॥ १४८ ॥

# अध्याय ७ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीराम समर्थ ॥ जय जय सद्गुरु सिद्ध स्वामिया । निर्विकारा सुखोदया । ज्ञानप्रकाशा चित्सूर्या । निज आत्मया श्रीमूर्ति ॥ १ ॥ सप्तम अवतारा करूनि नमन । सप्तमोध्याय आरंभिला जाण । सातवी भक्ति जयाचि पूर्ण । तया वंदन साष्टांगें ॥ २ ॥ पूजा सातवी शनिवारि । उपासकाते आवड भारि । भावें भजति नरनारी । ब्रह्मचारी श्रीमारुति ॥ ३ ॥ सप्त + + + कायेचा । भरवसा नसे काहींच साचा । शोध करावा ठाईंचा । निजतनूचा सर्वत्रीं ॥ ४ ॥ सातवे चक्रीं देहामाजि । तये स्थळीं गुरुमाय माझी । अनुसरता तेथें सहजीं । काय यमाजि करिल ॥ ५ ॥ सप्त ऋषि हें चि सांगति । आत्मानुभव जाणिजे स्थिति । शरण जाउनि सद्गुरुप्रति । सार्थक निश्चिती करा वेगीं ॥ ६ ॥ तो सद्गुरु श्रीरामदास । जो का पूर्ण मारुतिअंश । जगदोद्धार प्रघटलासे । कथा सुरस तयाचि ॥ ७ ॥ मागिल अध्याईं उपासना । सिद्ध केली स्वामींनी जाणा । पंढरपुरि रुक्मिणीजीवना । श्रीरामराणा केला तो ॥ ८ ॥ अयोध्या केली पंढरीची । अगाध महिमा समर्थाचि । गुरुमाउलि संताचि । प्रघटलि साचि कलिमाजि ॥ ९ ॥ जयाचे योगें रामायण । उदकीं तारिले जड पाषाण । वांचविला लक्ष्मण । तये आणुनि वनस्पति ॥ १० ॥ तो चि मारुति श्रीरामदास । अवतरला जगाचे कल्याणास । ऐकतां तयाचे चरित्रास । येकाग्र मानसें करुनी ॥ ११ ॥ शिवाजीराजा सत्‌शिष्य । सदासेवे तत्पर असे । प्रार्थना करुनी स्वामींस । परळीसी वास करविला ॥ १२ ॥ आणि वारंवार विनंति । श्रीगुरुचरणीं करी नृपती । म्हणे कांहिं संस्थानाप्रति । येणें निश्चिति सरंजाम ॥ १३ ॥ तये काळि समर्थांनीं । भविष्य पुढिलें जाणुनि मनि । आज्ञा केली शिवाजीलागोनि । सनदा करूनि द्याव्या ॥ १४ ॥ ज्या ज्या देशींचें अधिपत्य । राजियासि होणार सत्य । तेथिल गांव सद्गुरुनाथ । ल्याहावयाते सांगीतलें ॥ १५ ॥ शिवाजीस आश्चिर्य वाटलें । सद्ध धरिलीं दोन्हि पाउलें । म्हणे राज्य नसतां तेथील । पत्रीं लिहिले व्यर्थ तें ॥ १६ ॥ स्वामि समर्थ तेव्हां वदति । आज्ञा

प्रमाण तुजला नृपति । वृथा कार्णे चावटि किति । ऐक युक्ति शिवाजि तूं ॥ १७ ॥ विश्वास ठेऊनि श्रीगुरुचरणिं । सनदा लिहिल्या शिवाजीनिं । पुढें तैसी च काळे करुनि । राज्य सुटोनि यश आले ॥ १८ ॥ रोकडाराम स्वामीचा शिष्य । गांव दिधला तयास । मठ करविला कारंजेग्रामास । वन्हाड देश तो जाणा ॥ १९ ॥ मुसळराम नामें करून । अनुग्रहीक जो कां भाविक पूर्ण । तया दिधला पाठउन । प्रांत जाण वेदर तो ॥ २० ॥ जयरामशिष्यासि बाळेघाटावरि । निळंगे ग्राम दिधलें निर्धारिं । करविला तेथें मठाधिकारि । रावणारि स्थापविला ॥ २१ ॥ औरंगाबादेसन्निध । त्रिंबकवावासि भाळगांव प्रसिद्ध । संस्थान करविलें तेथें शुध । रामदास सिध धन्य ते ॥ २२ ॥ असे शिष्य अपार । लिहितां वाढेल विस्तार । मठपति केले निर्धार । श्रीगुरुवरें तयासि ॥ २३ ॥ काशिपासोनि रामेश्वरापर्यंत । संस्थानें वर्णितां अगणित । रामदाससांप्रदाय बहुत । न लागे अंत कवणासि ॥२४॥ असो भोळाराम स्वामिचा शिष्य । ऐका तयाचे चरित्रास । मगरध्वजाचा जो कां अंश । औरंगाबादेस जन्मला तो ॥ २५ ॥ जन्मांतरयोगें करून । अनुग्रह जाहाला स्वामिचा आण । आत्मानुभव होतां चि पूर्ण । श्रीगुरुभजन अवलंबिलें ॥ २६ ॥ जाणुनि तयाचा भावार्थ । आवड करिति सद्गुरुनाथ । सर्वकाळ जवळि राहत । दास्य करित परम प्रीतीं ॥ २७ ॥ विडा करुनि स्वामिसि । तेणें चि धावा दिवसनिशिं । आज्ञा केलि कोणे येके दिवसिं । भोळ्यारामा गुरुरायें ॥२८॥ ह्मणती पीकदाणी येकीकडे । टाकिजे कोणाचे दृष्टिसि न पडे । तये कालिं विचारा जाड । आरंभिला प्रौढ तयानें ॥ २९ ॥ ह्मणे कोणिहि न पाहे ऐसें स्थान । उदर येक आपुलें जाण । आणिक जागा तयावीण । निर्विघ्न पूर्ण नसे पै ॥ ३० ॥ ऐशा प्रकारें अंतःकर्णि । भोळ्यारामें विचार करुनि । प्राशन केली पीकदाणि । येकनाथ जनि तयापरि ॥३१॥ पुसों जातां स्वामि पुन्हां । निवेदिलें सविस्तर चरणा । श्रीगुरुरायें हांसोनि जाणा । तया ब्राह्मणा वर्जिलें ॥३२॥ तेन्हां पासोनि भोळा असे ।

नाम ठेविलें रामदासें। नामाभिधान पूर्वी असे। कांहीं तयास अन्य पै ॥३३॥ पुढें कांहीं दिवसानें। तांबोल द्यावा तेणें कुटोनि। तये काळीं अपूर्व जाण। करा श्रवण जाहलें तें ॥ ३४ ॥ अति त्वरेनें कोणी येके दिनिं। तांबुल मागतां श्रीस्वामिनि। खलबता न सांपडे म्हणोनि। चावुनि दीधलें विड्यासि ॥ ३५ ॥ समर्थे माक्षितां गोड लागला। नावाजिलें त्या शिष्याला। तेन्हां पासुनि आरंभिला। विचार भला तो चि पै ॥ ३६ ॥ प्रत्यहीं मुखांत घालुन। तांबुल द्यावा तयार करून। रामदासस्वामिनि आवडि करून। करावे सेवन तयाचें ॥ ३७ ॥ जेवि अरण्यांत श्रीरामासि। भिल्लटिनें आणितां फळें भक्षावयासि। मुखांत घालिति वैकुंठविलासी। अयोध्यानिवासी परम प्रीती ॥ ३८ ॥ नातरी जैसे गोपाळानि गोकुळांत। श्रीकृष्णासि उच्छिष्ट अर्पित। गोड लागतां घरीं पदार्थ। येती धांवत देवाकडे ॥ ३९ ॥ तेवि महाराज रामदास। मोहित जाले शिष्यभक्तिस। जन्मांतर तयाचें विशेष। वर्णिलें ग्रंथास नव जाये ॥ ४० ॥ असो भोळाराम समर्थातें। उच्छिष्ट तांबुल समर्पित। हें जाणुनि सर्वत्रातें। संशय मना आला पै ॥ ४१ ॥ परि कोणासि बोलवेना। भीड स्वामीची उलंघेना। तये काळि राजा दर्शना। आला जाणा शिवाजी ॥ ४२ ॥ तयासी कळवितां हा वृत्तांत। रामदासस्वामी समजले मनांत। विनंति करणार जों नृपनाथ। खलबत्यातें आणविलें ॥ ४३ ॥ भोळाराम उद्योगांत। कांहिं येक होता कार्यांत। तये वेळि शिवाजीतें। सद्गुरुनाथें आज्ञापिलें ॥ ४४ ॥ म्हणति राजा तूं जाऊन। खलबता आणावा इकडे मागून। आज्ञा मानुनि शिवाजीनें। मागितलें जाण खलबत्यासि ॥ ४५ ॥ भोळ्यारामें ते चि क्षणिं। वामहस्तें शेंडि धरुनि। दक्षिण करें गळा कापुनि। धैर्य धरुनि दिल्हा हातिं ॥ ४६ ॥ मग राजा भय पावला। बोलवेना कंठ दाटला। सद्गुरुचरणीं मस्तक ठेविला। मनासि जाहाला अनुताप ॥ ४७ ॥ म्हणे स्वामिया अपराध घडला। क्षमा करावि दीनदयाळा। व्यर्थ मनीं म्यां संशय आणिला। घडलि मला ब्रह्महत्या ॥ ४८ ॥

ऐसि भाकितां अत्यंत करुणा। कृपेनें द्रवला श्रीगुरुराणा। अभय देउनि शिवाजीस जाणा। केली आज्ञा मागुति ॥ ४९ ॥ खलबत्यासि जेथील तेथें। ठेव जा म्हणति स्वामी समर्थ। धैर्य धरुनि नृपनाथ। जातसे त्वरें तया ठाया ॥ ५० ॥ तों भोळाराम स्वकरें करुनि। कार्यभाग करिता पाहिलें नैनीं। आश्चर्य करि राजा मनीं। घडावरि धरुनि ठेविलें शिरा ॥ ५१ ॥ कांहियेक चळला हात जाण। वांकडि लागली तेणें मान। असो शिवाजी जाहाला लज्जायमान। धरिले चरण स्वामिचे ॥५२॥ सर्वत्रांनि नवल केलें। नमस्कार साष्टांग घातिले। संदेहातीत होऊनि ठेले। धन्य नवल श्रीगुरूचें ॥ ५३ ॥ कोणि येके दिन कल्याणास। म्हणति चला भ्रमण करायास। निघते जाहले रामदास। पावन जनास करावया ॥ ५४ ॥ ठाईं ठाईं उपदेश करित। गेले चिकुडि नगरांत। तिमाजीपंत तेथिल गृहस्थ। अनुग्रह तयातें केला पै ॥ ५५ ॥ निसीम भक्ति पाहून। दिधले तयासि पंचायतन। पुढें चालिले मार्गानें। रामदास निघोन पर्यटणा ॥ ५६ ॥ इकडे तिमाजीपंत तो शिष्य। तयासि जाहला सर्पदंश। तयानें आठविलें स्वामिस। अंतःकर्णांस संकटिं ॥ ५७ ॥ आणि भजनासि प्रारंभ केला। श्रीमूर्तिपासिं बैसला। करुणापर अभंगाला। गातसे समर्थांचे ॥ ५८ ॥ तये काळिं रघुपतीनें। विष समग्र शोषिलें जाण। तिमाजिपंत स्वस्त होऊन। कृष्णवर्ण जाहल्या मूर्ति ॥ ५९ ॥ जैसे मिराबाईचे वेळेसि। धांवण्या धांवले हृषिकेशी। तयापरि या ब्राह्मणासि। अयोध्यावासि पावले ॥६०॥ मग तिमाजीनें निश्चय धरून। आरांभिलें मागुति भजन। म्हणे महाराज श्रीराम आपण। काळे विषानें जाहले ॥ ६१ ॥ समुद्राचें मंथन केलें। देवीं दैत्यीं जेव्हां भले। तये काळिं विष निघालें। तें प्राशिलें माहादेवें ॥ ६२ ॥ तयानें उपद्रव करितां। आठविलें तुज श्रीरघुनाथा। तेणें करुनि जाहाला शमता। दाह तत्वता तात्काळ ॥६३॥ कृष्णावतारिं काळया सर्प। मुक्त केलासि त्वां सक्रूपें। येथें आजि तूं अयोध्याधीप। काळें स्वरूप धरिसि कां ॥ ६४ ॥ ऐशा प्रकारें

नानापरि । स्तवन करितां विप्र निर्धारिं । पूर्ववत जाहाले रावणारि । लीळाधारि श्रीरघुवीर ॥ ६५ ॥ पहिल्या सारिखीं पाहून मूर्ति । आनंद जाहाला तिमार्जीचित्ति । तो सरोनि गेली सकळ राति । आला गभस्ती उदयासि ॥ ६६ ॥ मग अभिषेक करुनी रामपंच्यायतना । विप्र करिता जाहला भोजना । धन्य तयाचा भावार्थ जाणा । श्रीगुरुचरणा विनटला जो ॥ ६७ ॥ असो स्वामिरामदास । पुढें गेले चंदावरास । शिष्याणि आणि बहुत शिष्य । समागमास असति पै ॥ ६८ ॥ व्यंकुजि राजा तेथिल । अत्यंत भाविक पुण्यशील । तयानें कीर्तिसि ऐकिलें । यश प्रांजळ स्वामीचे ॥६९॥ तशांत प्रत्यक्ष दर्शन । होतां वेधिले सकळ तनुमन । रामदासस्वामीचे केलें पूजन । घेतले ठेउनि निज आवडि ॥ ७० ॥ वैष्णव मंडळी तेथें बहुत । राजा तयाचा अनुग्रहित । स्वामीपासि मिळोनि समस्त । छळणाते आरंभिले ॥ ७१ ॥ म्हणति ब्रह्मचर्यव्रत आपणासि । आणि स्त्रिया असति समागमासि । हे तों गोष्टि अनुचित आह्मासि । दिसे शास्त्रासि विरुध्य ते ॥ ७२ ॥ तशांत वयस्वि तारुण्य सुंदर । शयन करितां जवळि तत्पर । सेवा करिति निरंतर । इंद्रियें स्थीर राहति कशी ॥ ७३ ॥ नपुंसक असाल हे येक । भ्रष्टाकार किंवा देख । असे बोलति वैष्णव मूर्ख । नाहीं विवेक ज्या ठाईं ॥ ७४ ॥ कौपिनि सुत्था गर्भांतुन । जन्मला तो अंजनीनंदन । तो हा अवतार समर्थ पूर्ण । सच्चिद्घन श्रीरामदास ॥ ७५ ॥ तयासि मिळोनि वैष्णव-वृंदें । स्त्रैण ऐसा ठेविति शब्द । तये काळि श्रीगुरु प्रसित्ध । लीला सित्ध केली ते ऐका ॥७६॥ निंदे करुनि नर्क प्राप्ति । जगीं विख्यात शास्त्रोक्ति । हे जाणुनि समर्थे चित्तिं । निसंशय करिति वैष्णवा ॥ ७७ ॥ कल्याणासि आज्ञा करून । मोठे पात्र आणिले जाण । वैष्णवासि ह्मणति पाहा नैनिं । धर्म धरून सर्वत्र ॥ ७८ ॥ तात्काळ रेत पतन करिता । उचंबळले पात्र तत्वता । घाबरे जाहाले समस्त पाहता । भय चिंता पावले ते ॥ ७९ ॥ मग पुन्हा तैसें चि गुह्यद्वारें । जेथिल तेथें केलें स्थिर । तये वेळिं द्विजजन

सारे । करिति विचार हृदईं ॥ ८० ॥ अनन्यभावें करुणा भाकिती पदर स्वामिसि वैष्णव पसरिति । शापूं नये असें वदति । नमन करिति साष्टांग ॥ ८१ ॥ कितियेक लागले परमार्था । वैराग्य जाहलें प्राप्त बहुता । सांडुनिया वैष्णवमता । शरण समर्था गेले पै ॥ ८२ ॥ व्यंकुजी राजासि वैष्णवानि सांगोन । उपदेश घेवविला पुन्हा जाण रामदासाचे धरितां चरण । जाहाला पावन तो हि त्वरें ॥ ८३ ॥ अनुग्रह करितां श्रीसमर्थ । राजा पावला स्वमुखातें । मस्तकीं ठेवित पद्महस्त । जाहला त्वरित पावन तो ॥ ८४ ॥ शिवाजी सारिखी भक्ति । सद्गुरुचरणीं जडली प्रिती । अर्पुनि राज्य स्वामिप्रति । भोगि स्थिति सुलीनता ॥ ८५ ॥ रामदासस्वामि जाऊं पाहाता । वियोग न साहे तया नृपनाथा । चरणावरि ठेऊनि माथा । करुणा भाकिता पै जाला ॥८६॥ ह्मणे ममता शिवाजीवरी । तैसि नाहिं मजवरि । तयेकाळिं राम चतुरि केले निर्धारि समाधान ॥ ८७ ॥ भीमाजीबावा जो कां शिष्य । पाणपात मंदिर ज्या दाविलें असे । तयासि ठेविले चंदावरास । संस्थानास करविले पै ॥ ८८ ॥ नंतर पुढें निघोन । श्रीरामेश्वरासि केलें प्रयाण । राघवेंद्र स्वामिसि भेटून । परतले जाण माघारे ॥ ८९ ॥ तोंडल गांवापर्यंत । अडवे आले शिवाजी नृपनाथ । घेऊनि गेले चाफळाते । निजमठांत स्वामिसिं ॥ ९० ॥ असो कांहिं दिवसा नंतर । शिष्य मिळाले स्वामिसि फार । तयांत कल्याण धुरंधर । निःसीम भक्ति थोर जयाचि ॥ ९१ ॥ क्षणक्षणा तयासि । श्रीगुरु सांगति कार्यासि । तो तो उल्हास मानसिं । सदा सेवेसि सादरें ॥ ९२ ॥ हें सर्वत्र शिष्यें पाहतां । द्वेष करिति सर्वथा । म्हणति हा चि एक आवडता । अम्हि वृथा उगेचि पै ॥९३॥ तये काळिं घडला विचार । ऐकावा तो श्रोते चतुर । रामघळिंत असतां श्रीगुरुवर । चमत्कार जाला तो ॥ ९४ ॥ दीड प्रहर होतां रजनि । तांबुल घ्यावया कैवल्यदानि । झोळणा सोडुनि केली करणि । न दिसति नैनिं पानें ती ॥ ९५ ॥ तये वेळि स्वामि समर्थे । आज्ञा केलि सकळ शिष्यातें । पानें आणा कोणि त्वरित । विडा सत्य घेणें

आम्हा ॥ ९६ ॥ ऐसें सांगता शिष्य मेळि । तोंडे करिते जाहले खालिं । मग कन्याणाकडे दृष्टि केलि । गुरुमाउली तयेनें ॥ ९७ ॥ खुणेसि पोहोचोनि तात्काळिक । स्वामिचरणि ठेविला मस्तक । मार्ग धरिला निशक । कोश येक जावया ॥९८॥ तो निबिड दाटला अंधकार । अत्यंत उचि डोंगर । कडे तुटले अपार । वनचरें तिं हिंडति ॥९९॥ असमान्य वाढलें गवत । वृक्ष विस्तीर्ण दाटि बहुत । विद्युलता असे लवत । करित वृष्टि पर्जन्य ॥ १०० ॥ दोन प्रहर जाहली निशि । येकटे जाणे चाफळासि । ऐसा प्रसग कल्याणासि । तये समयासि प्राप्त तो ॥ १ ॥ परि तयासी गुरुसेवेचि । आवडि अत्यंत असे साचि । स्मृति करूनि श्रीपायाचि । चाफळाचि वाट धरिली ॥ २ ॥ अर्धा डोंगर उतरिला । पुढें विचार कैसा घडला । तो हि पाहिजे श्रवण केला । श्रोते भला निज आवडि ॥ ३ ॥ माहान सर्प कृष्णवर्ण । मार्गावरि होता जाण । कल्याणाचा पडला चरण । पुछावर दारुण तयाचा ॥ ४ ॥ आधि च सर्प थोर जातिचा काळा । तशात शेपटावरि पाय पडिला । काय पाहाणें स्वभावाळा । क्रोधें चावला सरसाउनि ॥ ५ ॥ कडकडा फोडिले कल्याणासि । विष चढलें सर्वांगासि । काळिमा पातली देहासि । शेडु कंठासि आला तो ॥ ६ ॥ तयें काळि कल्याणानें । ह्रदइं आठउनी सद्गुरुचरण । श्रीरघुवीर वाचें गर्जुन । सोडिला प्राण ते क्षणिं ॥ ७ ॥ तो शब्द श्रीस्वामीचे श्रवणि । पडतां बोळखिली कल्याणध्वनी । समजले माहाराज अत कार्णें । जाहाली मनिं त्वरा बहु ॥ ८ ॥ शिष्यमडळी सहित । चुड्या पेटउनि घेतल्या हातें । शिष्योत्तम होता तेथ । येत जाहले श्रीसमर्थ ॥ ९ ॥ तो सर्प हि जवळ होता बैसला । आणि कल्याण निचेष्टित असे पडला । हें पाहुनि श्रीस्वामिला । मोह दाटला अनोपम्य ॥ ११० ॥ म्हणति सखया सेवेसाठिं । प्राण हि वेचलासि शेवटिं । तात्काळिक घातिले पोटिं । उदक दृष्टि श्रवतसे ॥ ११ ॥ क्षेत्रपाळ तेथिल डेरवणीचा । जागृत देव आहे साचा । कल्याणास्तव तयाचा ।

स्तव जयाचा आरंभिला ॥ १२ ॥ म्हणति माझ्या कल्याणासि जीवदान द्यावें । तरि तू सत्याचा होसिल भैरव । लोकरीत्या मनोभावें । नवस गुरुदेव करिति तया ॥ १३ ॥ या चि समई कल्याण उठेल । तरि अकरा मण वाटिन गुळ । ऐसें बोलति शिष्यवत्छळ । दिनदयाळ भैरवासि ॥ १४ ॥ जो पाहतां प्रत्यक्ष अवतार । रामदासस्वामी माहारुद्र । तयापरिस देवत थोर । पृथ्विवरि कोण आहे ॥ १५ ॥ परि शिष्यस्नेहाळ दीनानाथ । कृपेनें द्रवले जयाचें चित्त । प्रार्थना करिति दैवतातें । दया बहुत दासाचि ॥ १६ ॥ असो कल्याणासि कुर्वाळितां । अमृतकरें स्पर्श करितां । सज्जीव होउनि चरणीं माथा । ठेविला तत्वता स्वामीच्या ॥ १७ ॥ ह्मणे मी जातो चाफळासि । पानें आणितो श्रीच्या विड्यासि । आपण जावें स्वस्त घळिसि । अति त्वरेंसि येईन पै ॥ १८ ॥ तये काळिं स्वामि समर्थ । आश्चिर्य करिति मनांत । धन्य वदति हे शिष्यत्व । लोकत्रयांत न देखें ॥१९॥ कल्याण नाम शोभे यासि । ऐसे बोलति कृपाराशी । शिरीं ठेऊन पद्मकरासि । आलिंगनासि देउनि ॥१२०॥ धन्य सद्गुरु श्रीरामदास । धन्य कल्याण तो सत्शिष्य । जयाचि लीला वर्णितां विशेष । होय मानस सुखि ते ॥ २१ ॥ असो कल्याणासि श्रीसमर्थें । ह्मणति पानें आहेत झोळण्यांत । विडा घेऊ रामघळिंत । चला तेथें जाऊं पै ॥२२॥ श्रीरघुवीर ह्मणून । शब्द केला आनंदानें । निघते जाहले मार्गानें । तो सर्प येउनि पुढें पडिला ॥२३॥ तयालागि आज्ञा केली । दुष्ट वपु पाहिजे त्यागिली । ऐसे सांगतां मुक्ति घेतली । तनु टाकिली तात्काळ ॥ २४ ॥ मग स्वामींनीं रामघळींत । येऊनि सेविले तांबुलातें । उज्ज्ञायमान शिष्य समस्त । जोडति हात अनन्य ॥ २५ ॥ पुढें कथा आहे अपूर्व । श्रोतिं सर्वि अवधान द्यावें । वदविति स्वयें श्रीगुरुराय । सिद्ध दयार्णव श्रीगुरु ॥ २६ ॥ जन्मांतरिचा दास आपुला । जाणुनि मतिसि प्रसाद केला । राजारामिं मुळिंचि लीला । प्रगटविला गुरुमहिमा ॥ २७ ॥ भक्तमंजरीमाला ग्रंथ । श्रवणें चि

पुरति मनोरथ । रामदासस्वामी चरित्रातें । अध्याय समाप्त सातवा हा ॥ १२८ ॥

## अध्याय ८ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जय सद्गुरु पूर्णकामा । आदिपुरुषा आत्मयारामा । अज अव्यय निधर्मा । सिद्धनामा धरिसि तूं ॥ १ ॥ सर्वातीत स्वामिया असति । माया नाहिं ते जाह्ली कैसि । अभ्रें साउली येउनि जैसि । तेजोराशि आच्छादि ॥ २ ॥ सूर्यापासुनि मेघ जाह्ले । तेणें चि सूर्या झाकूळले । तैसें मायेनें व्यापुनि ठेले । निधर्म प्रांजळ असतां पै ॥ ३ ॥ सत्तायोगें त्रिगुण । माया गर्भि उमटलें जाण । निर्धमासि धर्म पूर्ण । असतां निर्गुण यालागि ॥ ४ ॥ मग भूतादिकाचा क्रम जाह्ला । तत्वसमोच्चय मेळा मिळाला । सृष्टि उभा राहोनि ठेला । आकारला ब्रह्मगोळा ॥ ५ ॥ परि विलक्षण सर्वांला । स्वतसित्व असति स्वामिया भरला । नमन माझें तव पदाला । श्रीगुरुला साष्टांगें ॥ ६ ॥ अष्टांगेसि नमन करितां । आठविली ती सहजि कथा । आठवा अध्याय आरंभीला आतां । श्रीगुरुनाथा आठउनि ॥ ७ ॥ अष्टांग योग साधितां सुख । प्राप्त होतसे निष्टंक । ते चि येथें आठव्यांत देख । श्रवण निके करितां चि ॥ ८ ॥ सप्तमोध्याईं कल्याणास । जाह्ला होता सर्पदंश । उतरोनि ते स्वामिनिं विष । सजीव निःशेष केले पै ॥ ९ ॥ अकरामण गुळाचा नवस केला । श्रीभैरवासि तो समर्पिला । कल्याणासि वाचविला । अगाध लीळा सद्गुरूचि ॥ १० ॥ शिष्यवछळ श्रीरामदास । माहत्म जयाचें पाहति विशेष । कोणे येके दिनिं परळीस । जावयास निघाले ॥ ११ ॥ निनामपाडळी जवळि जाता । दोन प्रहर जाह्ले तत्वता । माध्यान्हिक करावें या अर्थि । स्वामी समर्था उतरले ॥ १२ ॥ सुशीतळ छाया आम्र वागेंत । पाहूनि रम्य वाटलें मनांत । आज्ञा केली शिष्यवर्गाते ।

श्रुत्य भिक्षेस आणावया ॥ १३ ॥ प्रवेश केला समस्तें । झोळ्या घेउनि पाडळींत। कल्याण आणि श्रीसमर्थ। वैसले तेथें उभयता ॥१४॥ गावांत जाउनि सर्व मंडळि। श्रीरघुवीर म्हणुनि दिधली आरोळि। ग्रामस्त प्रभूनें अवलोकिली। नेत्रकमळिं हि वृंदे ॥ १५ ॥ कौपिनी धारण हुर्मुजि वस्त्रें। मुद्रा रेखिल्या सुंदर पवित्र। वाणिनें गर्जति श्रीराममंत्र। पाहिले नेत्रिं असे पै ॥ १६ ॥ मग तो दुर्जन कमाविसदार। अत्यंत पापी होता नर। क्रोधावला खवळलें अंतर। झोळ्या स्वकरें घेतल्या त्या ॥ १७ ॥ वागजल्पना तो दुष्ट करि। ह्मणे गोसावीयानिं केल्या मोव्या टिरि। मुलुक मारूनि खादला मारि। नरनारि भोंदिती हे ॥ १८ ॥ ऐशापरि वदोन अनादर। केला त्या दुर्जनें फार। जैसा सभेंत दुःशासन खळ। द्रौपदिसी वदनें बोलतसे ॥ १९ ॥ किंवा पतिव्रता पाहुनि स्त्रिया। व्यभिचारिणि निंदिति तयां। कीं तो सूर्य देखोनिया। उलुक ठाया अंध होति ॥ २० ॥ नातरि पंडित मूर्खासि। मुक्तसरोवर काउळ्यासि। दिव्य चांदणें चोरासि। पिशाच्चासि हरिनामें ॥ २१ ॥ तैसे तमा अज्ञानातें। गावकरिया मोकाशातें। दृष्टि पडतां वैष्णव संत। जाहले संतप्त हृदय तें ॥ २२ ॥ रामदासस्वामीचा जयावरि प्रसाद। तयाचा केला जेणें विनोद। मग क्षोभला सहजीं त्रिपाद। स्वतसिध्द हुताशन ॥ २३ ॥ चहूंकडुनि धडकला अग्नि। बोढवला असे अनर्थ जनिं। पाडाळि ग्राम तत्क्षणिं। ग्रासिले वदनिं यज्ञेश ॥ २४ ॥ विझऊं जातां अधीक चेतें। नवल वर्तलें ऐसें तेथें। तये काळीं ग्रामस्त। समजले मनांत आपुले पै ॥ २५ ॥ ह्मणति सत्पुरुषासि छळिले ह्मणून। ईश्वरें केलें ग्रामासि विघ्न। आतां सत्वर जावें शरण। शमेल तेणें अग्नि हा ॥ २६ ॥ शोकदारासहित। पश्चातापें तापले बहुत। धांवते जाले ग्रामस्त। अनन्य चि ते स्वामिकडे ॥ २७ ॥ तों श्रीगुरुसमर्थ पलायन। शिष्यसहित केलें जाण। पाठिं लागतां गावकर मिळोन। शक्तिहीन जाहाले ते ॥ २८ ॥ दीन वदनें

करुणा भाकितो । ठाईं ठाईं भडखळोन पडति । अट्टाहास्यें आरोळ्या देति ।। नाटोपति रामदास ॥ २९ ॥ कल्याणानें । तये काळिं । श्रीस्वामीस विनंति केली । स्वीर जाहली गुरु माउली । नमितां पाउली साष्टांगें ॥ ३० ॥ भक्तांकित दीनदयाळ । मार्गे चालतां उभे ठाकले । तो गांवकरि येउनि आडवे पडले । पसरिले पदर सर्वांनिं ॥ ३१ ॥ सद्गद होऊनि प्रार्थना करितां । नवल वर्तलें ऐकिजे श्रोता । पाडळीमाजि वानर तत्वता । प्रचंड सर्वथा उद्भवला ॥ ३२ ॥ पर्वतप्राय कुंभ घेउनि । विझवीतसे स्वयें अग्नि । अवलोकितां सहजी नैनीं । आश्चर्य जनिं वाटलें पै ॥ ३३ ॥ माघोरे घेउनि श्रीस्वामीतें । येते जाले ते ग्रामस्त । सामोपचारें करुनि आतिथ्य । घेतले निरुते ठेउनि ॥ ३४ ॥ भोजनादिक विधी जाहला । सर्वत्र अग्नि शांतवला । कांहींयेक पदार्थाला । ढका न लागला असे पै ॥ ३५ ॥ पाडळीकरानि तये समईं । मस्तक ठेवितां स्वामीपाईं । म्हणति आजपासुनि पाहि । उपद्रव नाहीं अग्नीचा ॥ ३६ ॥ आशीर्वाद देतां श्रीरामदासें । आनंद जाला गावकरास । याळागि तया ग्रामास । भय नसे अग्निचे ॥ ३७ ॥ ऐशा लीला वर्णितां भक्ति । सुख होतसे अत्यंत चित्तिं । जन्म धरिला या चि अर्थि । श्रीगुरुस्तुती करावया ॥ ३८ ॥ सज्जनगडीं असतां समर्थ । भेटीसि आले शिवाजी नृपनाथ । तयासि सुचवोनि सद्गुरुनाथें । धरिला पंथ जाबेचा ॥ ३९ ॥ तये वेळीं शिवाजी म्हणे । मीं हि येतो समागमें जाण । स्वामी वदती राजा-लागुन । सांप्रत येणें नीट नोहे ॥ ४० ॥ पुढें मुलुक सुटेल सर्व । तये काळिं जाण्यासि बर्वें । मातुश्रींचे दर्शन घ्यावें । म्हणुनि भावें जाणे आह्मा ॥ ४१ ॥ शीघ्र चि काळें येऊं मागुती । वियोग न धरि सर्वथा चित्तिं । ऐसें बोधोनि शिवाजीप्रति । धरिला क्षिति मार्ग त्वरें ॥ ४२ ॥ कांहिं चाफळी परळीसि कांहिं । शिष्य ठेविले असति पाहि । इतर संस्थानीं ठाईं ठाईं । गणना नाहीं तयासि ॥ ४३ ॥ समागमें कल्याणादिक । उद्धव शिष्य जो भाविक । येते

जाहले किती येक । भक्तीसुख भोगावया ॥ ४४ ॥ भजन करितां आनंदेंसि । पातले समर्थ स्वग्रामासि । जाऊनि सदनिं निज मातेसि । नमिले प्रीतीसि साष्टांगें ॥ ४५ ॥ जेष्ठ बंधु गंगाधर बावा । वैराग्याचा केवळ ठेवा । वंदन करितां तया भावा । स्नेह सर्वथा ठरेल पै ॥ ४६ ॥ त्रिवर्गांचि होतां भेटि । अद्भुत प्रेम तेथिल गोष्टि । आनंदाचि होतसे वृष्टि । वृत्ति हिंपुटि ते वर्णितां ॥ ४७ ॥ श्रीरामजयंति उछाहास । आरंभ होण्या तो चि दिवस । जांबेसि गेले श्रीरामदास । चैत्र मास प्रतिपदा ते ॥ ४८ ॥ हर्षे निर्भर जाहली माता । ठेऊनि घेतले स्वामिसि तत्वता । नवरात्र सोहळा होतसे कथा । सर्वभूता अन्नदान ॥ ४९ ॥ श्रीरामजन्म नवमीसी होतां । पारणाविधि दशमीसि सर्वथा । अनंत यात्रा प्रसादा करितां । तया समस्ता अन्न दान ॥ ५० ॥ स्वयंपाक सकळ होऊनि सिद्ध । घाला म्हणति देवासि नैवेद्य । स्वामीचा पुतण्या जो कां प्रसिद्ध । जाहला सद्गद त्या वेळा ॥ ५१ ॥ विनंति करि श्रीगुरुराया । सद्द ठेऊनि मस्तक पाया । म्हणे अद्दिसी घृत आणावया । गेला राया वाणी तो ॥ ५२ ॥ प्रातःकाळीं च यावें तेणें । परी अद्यापी न आला जाण । ऐसा घडला विचार पूर्ण । आतां करणें कैसें तें ॥ ५३ ॥ मग तया जेष्ठपुत्रास । आज्ञापिलें रामदासें । म्हणे आणा जा उदकास । जानकीवरासि आठउनि ॥ ५४ ॥ आतां वंदूनि तात्काळ । कुंभ भरोनि आणिले जळ । समर्थे केलें असे नवल । ऐका प्रेमळ भाविक हो ॥ ५५ ॥ अभिमंत्रण करितां मृण्मयपात्र । तूप जाहलें सुंदर पवित्र । उघडोनि पाहतां सकळ नेत्रें । सुवास फार घमघमीत ॥ ५६ ॥ असंख्य काढितां न सरे । अद्यापि आहे ती घागर । जंबुक्षेत्रि स्वामीचें घर । जन सारे पाहती ते ॥ ५७ ॥ प्रतिवर्षि उछाहात । ब्राह्मण वाढिति त्यांतील घृत । संशय असेल ज्याचे मनात । पाहवे निश्चित जाउनि ॥ ५८ ॥ प्रत्यक्ष अवतार मारुतीचा । रामदासस्वामी कळींत साचा । जेथें नवलावया अनेक कृतीचा । सहस्रवाचा न वर्णवे ॥ ५९ ॥ असो उछाहा करुनी समाप्त ।

मातापुरासि गेले समर्थ । वदन करुनि अंबिकेते । पातले दत्तस्थानाते ॥६०॥ तव तेथें ब्राह्मण बहुत । बैसले आहेत तप करीत । दत्तात्रयाचें दर्शन इछित । येकाग्र चित्तें करुनि ॥ ६१ ॥ तये स्थळीं श्रीरामदास । येवोनि विचारिलें सविस्तर तयास । निवेदिला द्विजें इतिहास । आला स्वामीसि कळवळा ॥ ६२ ॥ कल्याणासि वदति श्रीसमर्थ । बैसावे येथें चि ब्राम्हणाते । म्हणजे सहजी अनुसुयासुत । माहाराज दत्त प्रघट होति ॥६३॥ ऐसा विचार करुनि मनिं । शिष्यासहित बैसले तया स्थानिं । जैसा गृहांत वासरमणि । जान्हवी मेदिनि सरिते ते ॥ ६४ ॥ नातरि देवांत शचिरमण । कीं नक्षत्रांत चंद्र जाण । ऋषिमंडळांत श्रीरघुनंदन । शोभतो जाण तैसे ते ॥ ६५ ॥ रामदासस्वामी ब्राह्मणांत । बैसले सहजी दर्शनार्थे । दत्तात्रय जाणुनि हे निश्चित । जाहले येते भेटी ॥ ६६ ॥ दासोपंतासि जेणें रूपें । दर्शन दिधले त्रैलोक्याधिपें । ती च लीळा धरुनि सक्रूपें । पातले समीप स्वामींचे ॥६७॥ मळंगवेश धारण करून । संगें घेतला रेडा जाण । बकरी कोंबडि श्वानें । खटाटोप पूर्ण सांगाती ॥ ६८ ॥ पाळ पडदाला हनसीं हंडी । आदिमाया ज्याचि रंडि । ऐसि लीळा दाउनि प्रौढी । जवळि तातडि आलेति ॥ ६९ ॥ म्हैशावरुनि सामान काढिले । पाळ सत्वर तेथेंचि दीधले । आदिमायेसि आज्ञापिलें । वेगि बोलिले हंडि भराया ॥ ७० ॥ दोन दगड मांडुन तेथें । पात ठेविलें सहजी वरुते । कोंबडि कापोनि भरिता रिते । मडके अपूर्ण तैसेचि ॥ ७१ ॥ बकरें मारुनि मांस भरितां । मात्र न भेरे ते सर्वथा । रेडा बांधोनि जरी घालिता । लोटके तत्वता न भरेचि ॥ ७२ ॥ तेव्हां पुसे फकीरासीं बाई । म्हणे पठाणजी हंडि भरत नाहीं । मळंग वदति तयेसि पाहि । बंम्मन सब हि कापि तूं ॥ ७३ ॥ ऐसा प्रकारें आज्ञा करिता । धाविन्नली तीं माता तत्वता । सुरी तीक्षण घेउनि हाता । गेली समस्ता जवळ पै ॥ ७४ ॥ मग तपस्वी ते ब्राह्मण । केले तयानि पळायन । रामदासस्वामीनिं आसन । सोडिले जाण नसे चि ॥ ७५ ॥ समर्थ करिति हास्य वदन । जवळ शिष्य तो कल्याण । इतर गेले

पळोन । धरिले आसन उभयता ॥ ७६ ॥ तेव्हा माहाराज अत्रिनंदन। सौम्य लीळा धारण करोन । प्रगटविले मुळीचें ध्यान । षडभुज पुर्ण त्रिगुणात्मक ॥ ७७ ॥ ज्याचे हातीं शोभति आयुधें । दंड कमंडलु प्रसिद्ध । शंख चक्र मिरवे शुध । त्रिशुळ शुध डमरु पै ॥ ७८ ॥ जटाभार दैदिप्यमान । कौपीन साजिरे अखंड वसन । लाविले गोपिचंदन । भस्मोध्धारण सर्वांगि ॥ ७९ ॥ त्रिगुणात्मक यज्ञोपवीत । सुमनमाळा ज्या विलसत । दत्तात्रय सद्गुरुनाथ । देखिला समर्थस्वामींनी ॥ ८० ॥ अनन्यभावें करुनि नमन । परस्परें घडलें आलिंगन । उभयता संवाद बोलति खुण । असे कल्याण जवळ पै ॥ ८१ ॥ ते स्वमुख उघड अर्थी । कोण देइल वाचे हातीं । श्रीगुरु पुत्र ते जाणति । येरे कथनोक्ती परिसिजे ॥ ८२ ॥ असे रामदासस्वामिसि श्रीदत्त । म्हणति का बैसलात तुम्ही ब्राह्मणात । येऊनि सत्वर देउळात । भेटि निश्चित घ्यावी की ॥ ८३ ॥ स्वामी समर्थ तेव्हां वदति । कृपा आली द्विजाचि चित्ति । दर्शन द्याव तया प्रति । म्हणोनि युक्ती केली हे ॥ ८४ ॥ परी तु भेद जाऊन । पळविले तयासि जाण । मग दत्तात्रय प्रसंन्नवदनें । आणवा त्वरेने म्हणती त्या ॥ ८५ ॥ तये काळिं उध्दव शिष्यास । आज्ञा करितां रामदास । घेवोनि येई ब्राह्मणास । करूं दे भेटिस दत्ताचे ॥ ८६ ॥ तेव्हां उद्धवें जाउनि त्वरताहि । आणविले तया विप्रासि पाहि । दर्शन करविलें तये ठाईं । द्विज हृदईं सुखावले ॥ ८७ ॥ पूर्ण होतां तयाचा काम । स्वस्थाना पातले विप्रोत्तम । मग पूजिला चित्सुखधाम । श्रीगुरुपरम दत्तात्रय ॥ ८८ ॥ पाक सिद्ध करुनि । भोजन घडलें तये स्थानिं । दिनत्रय तेथें राहोनि । परतले चित्सुखदानी मग ॥ ८९ ॥ पुन्हां येउनि जांबेसि । नमस्कारिले जनानिशी । नंतर आले इंदुरासि । सान्निध ज्या सारंगपुर ॥ ९० ॥ रम्य पाहूनि तें नगर । रामदासस्वामी जाहले स्थीर । तव त्या प्रातांत जळधर । पर्जन्य साचार नव्हता पै ॥ ९१ ॥ पाळागि तेथिल अधिकारीयानें । अनुष्ठानि योजिले ब्राह्मण । उदकांत बैसोन मंत्रोच्चारण । करिति संपूर्ण द्विज सारे ॥ ९२ ॥ हें पाहून

श्रीरामदासें । आज्ञा केलि त्या विप्रास । म्हणति हनुमंत रेखिलो दगडास । अभिषेक तयास करा तुम्हि ॥ ९३ ॥ तात्काळ कोळसा हातिं घेऊन । पाषाणावरि काढिला हनुमान । अंगावरिल छाटी काढून । आच्छादिला पूर्ण मूर्ति ते ॥ ९४ ॥ अभिषेक पात्र त्यावरि । धरउनि तया विप्रा करिं । लघुरुद्र होतां चि निर्धारिं । गोष्टि बरि ते ऐका ॥९५॥ स्वामिनीं कल्याणासि सांगून । छाटि काढविली दगडावरून । तो घडल्या प्रमाणें मूर्ति होऊन । प्रसन्न वदने देखिली ॥ ९६ ॥ षोडशोपच्यारें करूनि पूजा । नैवेद्य समर्पिला तयासि वोजा । मंत्रपुष्प म्हणतां सहजा । मेघराजा आला तो ॥ ९७ ॥ ऐसी लीला होतां सर्वि । देशाधिकारि यांसि कळविलें सर्वि । म्हणति उगवला प्रतापरवि । लीला बरवि तयाचि ॥ ९८ ॥ महात्म्य ऐकुनि समर्थाचें । संतोषले चित्त तेथिल प्रभूचें । स्वअंगें येऊनि स्वामिचें । पूजन साचें केलें तें ॥ ९९ ॥ समारंभेसि आनंदयुक्त । ठेऊनि घेतले रामदासातें । मठ बांधुनि इंदुरातें । श्रीराममूर्तिते स्थापविलें ॥ १०० ॥ उत्कृष्ट तेथें कीर्ति होतां । सांप्रदाय वाढला बहु तत्वता । कृष्णातीरासि येऊं जातां । प्रभुसी त्या श्रम वाटले ॥ १ ॥ तये काळिं उद्धव शिष्य । तेथें ठेविला श्रीरामदासें । आपण आले सज्जनगडास । कल्याणासि घेऊनि ॥२॥ अणिक शिष्य बहुत । समागमें आले निश्चित । संसार टाकुनि जाले विरक्त । मिळाले अगणित श्रीजवळि ॥ ३ ॥ परि वैराग्ये कोमळे जयाचि । विपरीतवृत्ति फाके तयाचि । हेळणा करिति कल्याणाचि । प्रीति स्वामीची म्हणोनि ॥ ४ ॥ कल्याणशिष्याचा येकविध भाव । सर्व कांहिं श्रीगुरुदेव । न धरि कधीं साधनिं हाव । भक्ति सर्व सेवेचि ॥ ५ ॥ उत्तर रात्रीं उठोन । उदक आणावे कृष्णेसि जाउन । स्वामिलागिं करऊनि स्नान । करावें अर्चन यथोक्त ॥ ६ ॥ स्मार्त शिवाचि पूजा करिति । कीं वैष्णव विष्णूतें उपासिति । सद्गुरूचें तैसि भक्ति । कल्याण करिति उपासना ॥ ७ ॥ अनुग्रही स्वामीचे जे जे कांहिं । गुरुरूप भावना तये ठाईं । मस्तक ठेउनि सर्वांपाईं । दास्य देहिं

करितसे ॥ ८ ॥ शिष्यांनि त्या सांगत असावे । कल्याणानें तें ऐकावें । वेडसरपणें दिसावें । परि भाव गुरुपाईं ॥ ९ ॥ तये काळिं मंडळीं ती । कामें सकळ करविति । स्वामीलागि सांगति । केले म्हणती आपण ॥ ११० ॥ सर्वसाक्षि सद्गुरुनाथ । मुंगिचें हृदय कळे तयातें । तेथें जवळिचे अनुग्रहीत । काय अनृत वदोनि ॥ ११ ॥ कार्यकर्ता कल्याण आपुला । हा सर्वसा श्रीगुरूला । आज्ञा करिति तयाला । भलते वेळा असो कां ॥ १२ ॥ सर्वत्र शिष्य विस्मय करिति । तयाचो च कां बहुप्रीति । कल्याणासि पाचारिती । कार्यें सांगति सकाळिक ॥ १३ ॥ ऐशा प्रकारें स्पर्धा करितां । हें नावडे सद्गुरुनाथा । युक्ति आरंभिली ते तत्वता । ऐका सर्वथा ते सकळ ॥ १४ ॥ अच्युतफळ येक घेऊन । पायासि बांधिलें आपुल्या जाण । खांडुक जाहलें म्हणून । सांगितलें वचनें शिष्यासि ॥ १५ ॥ नित्यानित्य मोठा आधिक । अंबा योजिती देख । बंधन करुनि स्वामि कवतुक । वाढलें खांडुक म्हणति पै ॥ १६ ॥ कळा अधिक जाहल्या वदति । शरिरिं ग्लानी बहु दाविति । तये काळिं शिवाजि नृपति । सखेद चित्तिं जाहालासे ॥ १७ ॥ वैद्य असंख्य मिळाले । अनुष्ठानें ब्राह्मण योजिले । नाना उपाय आरंभिले । घाबरलें राजमन ॥ १८ ॥ तये वेळिं येक वैद्यास । बोलाविलें जवळि रामदासें । येकिकडे नेऊनि त्यास । खांडुकासि दाविति ॥ १९ ॥ म्हणति शिष्यपरीक्षेला । उपाय असे हा योजिला । सांगूं नका शिवाजिला । चिकित्सेला करि तु ॥१२०॥ मग तो चतुर धन्वंतरि । समजोनि विचार तेणें अंतरिं । काळखांडुक नाम निर्धारिं । सांगे वैखरि सर्वांते ॥२१॥ उपाय पुसितां राजियानें । सांगतां जाला वैद्य जाण । मनुष्यानें करितां चोषण । आरोग्य त्वरेनें श्री होति ॥ २२ ॥ खांडुकासि तोंड लावितां । मानव मरेल तो सर्वथा । उपचार नसे या परता । दारुण तत्वता दुःख ते ॥ २३ ॥ हें ऐकुनि सर्व शिष्यासि । धीर न पडे कदा मानसीं । सांगतां स्वामि चोखा-वयासि । म्हणति प्राणासि मुकूं आम्हि ॥२४॥ मृत्युसारिखे भय नाहिं ।

संसारचिंते गोविले पाहि । प्राणि बुडति भवडोहिं । संशय हृदई म्हणुनि ॥२५॥ पापासि मूळ लोभ पाहतां । धर्म नाहिं दयेपरता । तृष्णारुपिणी व्याधि सर्वथा । संशय चित्तासि बंधन तें ॥२६॥ असो रामदासस्वामिनिं अंघ्रा प्रौढ । चरणासि बांधिला सदृढ । अवलोकिती शिष्याकडे । चरण पुढें करूनी ॥२७॥ म्हणति कोणि तरि येकजण । जीवावरि उदार होऊन । सोडवा लवकर माझा प्राण । दुःख दारुण सोसवेना ॥ २८ ॥ आजिचा समय कठीण आहे । सुचविति अैसे गुरुराये । शिष्य पळति लवलाहे । सोडुनि ठाय किल्ला तो ॥ २९ ॥ मग शिवाजीनें निश्चय केला । म्हणे आज्ञा व्हावी मजला । निवारिति श्री तयाला । जाणुनि भला निर्धार ॥ १३० ॥ कल्याण शिष्य कृष्णेसि जाउनि । आले परळीस माघ्यान्हि । उदक आणिले स्नानालागुनि । कैवल्यदानि श्रीगुरूसी ॥ ३१ ॥ तो शिष्यमंडळि म्लानवदन । कोणि बैसले दडुनि जाण । कितेक उतरति किल्यावरून । कोणि भिडेनें जवळि ते ॥ ३२ ॥ रामदासस्वामि सर्वत्रातें । खांडुक सांगति चोखावयातें । नाहिं तरि आला मृत्यु । अैसे वदति सकळिका ॥ ३३ ॥ तव अकस्मात कल्याण तेथें । घेऊनि आला कृष्णोदकातें । तेव्हां सांगति श्रीसमर्थ । स्नान समासवेळा ही ॥ ३४ ॥ विच्यारितां कल्याणानें । सुचविलें खांडुक कराया चोपण । मग साष्टांगेंसि करुनी नमन । सिद्ध पूर्ण जाहाला तो ॥ ३५ ॥ म्हणे या दुःखासि उपाय । जवळि असतां गुरुमाय । वृथा क्लेश सोसिले काय । अर्पिले काया तव निजपदा ॥ ३६ ॥ हे चि प्रार्थना आतां पाया । जन्म घावा सेवा करावया । सर्वत्रातें नमोनिया । करुनि हृदया येकाग्र ॥ ३७ ॥ तात्काळ धरुनि श्रीचा चरण । काढिलें स्वकरें प्रावर्ण । दृढ निश्चय करून । केलें चोपण खांडुक तें ॥ ३८ ॥ मुख लावितां तयासि । अमृतफळ निश्चयेंसि । प्राशन करितां रसासि । काय गोडिसि वर्णिजे त्या ॥ ३९ ॥ आधीं च रसाळ अमृतफळ । श्रीगुरूनीं त्यात चरणीं बांधिले । रामदासस्वामीनीं आज्ञापिले । प्राशन केलें तें निज प्रीति ॥१४०॥

मग ती चखी सांगणें किति। कल्याणजीची उत्कृष्ट भक्ति। आणिक फळें मागतां प्रिति। फराळा प्रति दिधलीं तीं ॥ ४१ ॥ म्हणति उष्णातुनि बापा आलासि। श्रम जाहले बहुत तुजसी। आतां घेई निद्रेसि। संपादणिसि मज करूं दे ॥ ४२ ॥ श्रीगुरु आज्ञेवरून। शयन केलें कल्याणानें। इकडे बोलति निर्वाण। जाहाले म्हणोनि सकळिक ॥ ४३ ॥ मग भक्तवछळ सद्गुरुनाथ। रामदासस्वामी श्रीसमर्थ। अठाहात्यें भजन करित। कल्याणातें उठवावया ॥ ४४ ॥ मुहूर्तमात्रें करून। स्तब्ध जाहला कल्याण। जयजयकार केला जाण। श्रीरघुनंदन स्मरोनि ॥ ४५ ॥ पुढें आख्यान हें चि सुरस। वदविति स्वयें श्रीसिद्धेश। प्रसाद केला या दीनास। जन्मांतरा जाणुनि ॥ ४६ ॥ नातरि ठाईंचा मंदमति। ठाउकी नाहिं विरपत्ती। सरिते केलें निजग्रंथि। कृपामूर्ति धन्य ते ॥ ४७ ॥ अंतर्बाह्य होउनि सिद्ध। सुचविति सकळ कथा विशद। राजाराम सहजि आनंद। पूर्वी छंद श्रीगुरू ॥ ४८ ॥ भक्तमंजरीमाला ग्रंथ। श्रवणें चि पुरति मनोरथ। रामदासस्वामीचरित्रातें। अध्याय समाप्त आठवा हा ॥ ४९ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ८ ॥

---

## अध्याय ९ वा

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजय सद्गुरु अनादिसिद्ध। परात्पर सच्चिदानंदा। अद्वयरूपा स्वसुखकंदा। निज आत्मपदा तुज नमो ॥१॥ ध्येय ध्याता ध्यान त्रिपुटी। हें तों न घडे कांहिं च गोष्टी। श्रीगुरुपदीं पडतां मिठी। वृत्ति हिंपुटी होतसे ॥ २ ॥ आत्मनिवेदन ऐक्य स्थिति। तेथें कैचि स्तव्यस्तुति। येकात्मता सर्वत्र जगति। मराठे मूर्ति श्रीगुरूचि ॥ ३ ॥ आपण येक स्वामियेक। हें तों नुरे चि येवळिक। अनुभवासि पडले टक। सोलीव सुख सर्वदा ॥ ४ ॥ नववी भक्ति ते चि पाहि। अनन्यभाव श्रीगुरूचे पाईं। नमन सहजि घडतां

ठाईं । देहीं च विदेही सर्वदा ॥ ५ ॥ नव इंद्रिया चोरोनी । स्वात्मसुख भोगिति मुनि । प्राप्त होतसे सद्गुरुवचनीं । पाहातां नैनिं कृपादृष्टी॥६॥ ऐसा महाराज निजपददाता । ऐका तयाचि चरित्रकथा । जेणें करितां सार्थकता । येईजे हाता ब्रह्मपद ॥ ७ ॥ मागील अध्याईं श्रीरामदासें । परीक्षिलें सर्व शिष्यास । बैसविले कृपालेश । निजपदीं कल्याणास ॥८॥ पुढें चमत्कार स्वामींनीं । नवल केली विचित्र करणी । ते हि ऐकिजे सर्वत्र जनिं । धरुनि मनिं निजभाव ॥९॥ कोणि येके दिनिं श्रीगुरुराज। रामघळित असतां सहज । कीर्ति ऐकुनि आला द्विज । येकनाथ सतेज नाम तयाचें ॥ १० ॥ रोजगारि तो ब्राह्मण भला । हिंदुस्थानांत होता गेला । द्रव्य घेउनि स्वदेशाला । जातां मनाला आठवलें पै ॥ ११ ॥ म्हणे रामदास महाराज महासमर्थ । जो कां अवतार श्रीहनुमंत । तयाचे घेतां दर्शनातें । पुरति अर्थ सकळिक ॥ १२ ॥ याळागिं येतां चाफळासि । मग तो विप्र आला घळिसी । कल्याण भेटले तयासि । त्या शिष्यासि घेउनि संगें ॥ १३ ॥ दर्शन होतां श्रीस्वामीचे । समाधान जाहलें तयाचें । निवेदिलें सविस्तर सार्चे । रामदासाचे पाय नमोनि ॥ १४ ॥ असो कल्याणासि आज्ञा करून । साहित्य काढविलें वृक्ष वेळी खाल्हून । स्वयंपाकातें सिद्ध करून । नैवेद्य समर्पण होतसे पै ॥ १५ ॥ तों अकस्मात कोकणांतुनि । साठ असामि ब्राह्मण येउनी । नमन केलें स्वामीचरणीं । हात जोडोनि निवेदिती ॥ १६ ॥ म्हणति वाईक्षेत्रासी राजा धार्मिक । आला शिवाजी पुण्यश्लोक । आशिर्वादार्थ निघालो देख । द्रव्य निके मिळेल म्हणुनी ॥ १७ ॥ खांडवया ग्रामा जवळि येतां । आठवण जाहलि सहजि चित्ता । भेटुनिया स्वामि समर्था । जावें तत्वता राजाकडे ॥ १८ ॥ येतद्विषईं आलो येथें । पूर्ण जाहला मनोरथ । आज्ञा होतां क्रमूं पंथ । ऐसें वदति विप्र ते ॥ १९ ॥ हास्य करुनि श्रीरामदासें । म्हणति काय त्या द्विजास । निरोप घेणें या समयास । उचित तुम्हास नोहे पै ॥ २० ॥ श्रीरघुपतीसी नैवेद्य जाहला । वैश्वदेव असे केला । अतिथीचा लाभ

घडला । या स्थळाला अनपार्से ॥ २१ ॥ तरी प्रसाद श्रीचा घ्यावा । जावया पंथ मग धरावा । आज्ञापिता ऐसें सर्वां । आश्चर्य जीवा वाटलें तें ॥ २२ ॥ म्हणति तिघांचे स्वयपाकातें । साठ आसामी काय भक्षित । वाटणीसी येईल येक सीत । ऐसें बोलत परस्परें ॥ २३ ॥ परि आज्ञा उलंघवेना । स्नान करुनि आले जाणा । बैसविले त्या ब्राह्मणा । करुनि स्मरणा श्रीरघुपतीचें ॥ २४ ॥ येकनाथ जो प्रथम आला विप्र । तयासि घाला म्हणति पात्रें । मुळि होती तीन पात्रें । पाहिलें नेत्रें सकळिकें ॥ २५ ॥ कल्याणानें तीन पानें । सघृत वाढली होती जाण । उचलुनि ठेविता येकनेथानें । आणिक पर्णे तैसिं चि ॥ २६ ॥ द्रौपदीची वस्त्रें जैसीं । येकामागे येक निघती तैसी । लीळा केली श्रीरामदासीं । रामघाळिसी तयापरी ॥ २७ ॥ असो ब्राह्मण जेऊनि तृप्त जाहले । सर्वत्रासि तांबूल दिधले । येकनाथासि पाचारिलें । दक्षणेसि भले द्यावया ॥ २८ ॥ येकसष्ट होन तया जवळि । अवघा विषय होता मुळी । समर्थांनीं मागोनि घेतली । समग्र गाठोडी आपण ते ॥ २९ ॥ निश्चय करुनि त्या द्विजानें । रामदास स्वामीसी केलें अर्पण । श्रीगुरुसमर्थ कृपाघन । ब्राह्मण संपूर्ण तोषविले ॥ ३० ॥ साठ न्हन्न दिधले द्विजासी । येकसष्टावा ठेविला आपणापासी । तो देउनि खर्चासि । येकनाथासि बोळविलें ॥ ३१ ॥ तयेकाळीं येकोबास । अंतःकर्णि जाहले क्लेश । बोलवेना स्वामिस । परि मानस सखेद तें ॥ ३२ ॥ म्हणे जाउनि मायबापासि । दाखऊं काय मुख जगासी । काळ क्रमुनि दूर देशीं । काय घरासि आणिलें म्हणू ॥ ३३ ॥ चिंताक्रांत होऊनि मनीं । पोहचला गावा अस्तमानीं । तो रामदास महाराज त्रिकाळज्ञानी । अंतःकर्णीं समजले ॥ ३४ ॥ आदीं जाऊनि तयाचे सदना । जनकजननिसि भेटले जाणा । अवलोकितां कृपानयना । अंतःकर्णा आनंद तया ॥ ३५ ॥ म्हणति तुमचा पुत्र येकनाथ । मागाहुनि येतसे निश्चित । न्हन्न घ्यावे यथार्थ । दिधले होते आम्हा जवळी ॥ ३६ ॥ दुपट द्रव्य देऊन । स्वामी परतले तेथोन ।

अस्तमानासि जातां दिन । येकनाथ ब्राह्मण घरासी गेला ॥३७॥ मायबापें मार्गावरि । तिष्ठत बैसळी होती द्वारीं । तो संकोच रिति अंतरीं । पुत्र निर्धारिं देखियेला ॥ ३८ ॥ आनंदानें उभयतांनि । आलिंगन दिधलें प्रीति करुनि । म्हणति आम्हालागुनि । पुष्कळ जनीं द्रव्य ते ॥३९ ॥ खंति न करि तूं मानसें । दोन प्रहरा आले रामदास । पाठविले सुवर्णास । ते आम्हास पोहचले ॥ ४० ॥ द्विजवराचि माता । विचार ऐसा कथन करितां । अनुताप होऊनि येकनाथा । जाहली कथा सांगतसे ॥ ४१ ॥ मग उपरति जाहली सर्वांते । श्रीगुरुचरणीं घेधलें चित्त । येऊनि सर्वत्रि चाफळांत । अनुग्रहातें घेतले ॥ ४२ ॥ प्रपंचभार सांडुनि । निमग्न जाहले सद्गुरुभजनीं । स्वस्वरुपीं गेला मिळोनि । आदिकरुनि कुटुंबेसी ॥ ४३ ॥ आणिक चमत्कार स्वामिनिं । मिरजेंत केला तो ऐकिजे श्रवणीं । निघाले सहजीं फिरावया अवनिं । कैवल्यदानी श्री रामदास ॥ ४४ ॥ जयरामस्वामी माहा समर्थ । समागमें ते हि होते । आणिक मिळाले बहुत संत । अगणित नामें तयाचीं ॥४५॥ भजन करित आनंदेंसि । अस्तमानीं आले मिरजेसी । ग्रामस्त पातळे दर्शनासी । बिराडासि दिधले ॥ ४६ ॥ हरिदिनिचा दिवस होता । आरंभिली श्रीजयरामें कथा । श्रवण कराया तत्वता । श्रीसमर्थ बैसले ॥ ४७ ॥ आब्राह्मवृंदें सकळ ज्ञाती । कीर्तन विधि श्रवण करिती । चार घटिका उरली राती । मंगळ आरति होणार पुढें ॥ ४८ ॥ तो ग्रामस्त प्रभु तेथें पातला । जात होतां समनामिराला । कांहि येक स्थिरावला । संशय आला हृदईं त्या ॥ ४९ ॥ तयेवेळीं जयरामस्वामीनीं । साधु माहात्म वर्णिलें जनीं । म्हणति कैसा हि असो प्राणी । कोदंडपाणी भेटविति ॥५०॥ हें ऐकोनी त्या यवनानें । बळकट हृदईं धरिले स्मर्ण । जासुदा सांगून । बिराढ पाहुनी ठेविले ॥ ५१ ॥ अंतःकर्णी तो चि घ्यास । छळण करावें त्या संतास । येतद्विषईं पालखीस । आणावयास धाडिले ॥ ५२ ॥ जयरामस्वामीसी बोलावणें । समारंभें पाठविलें जाण । अविंदानें सभा करून । बैसला

पूर्ण वाट पाहात ॥ ४३ ॥ तो जयराममहाराज समाधिस्त । येकटे ि
बिराडीं शिष्यासहित । प्रातःस्नानासी कृष्णेते । गेले समर्थ रामदा
॥ ५४ ॥ तये वेळीं त्या वाड्यांत । लोक आले सिबिकेसहित
म्हणति प्रभूनें तुम्हाते । दर्शनार्थ बोलाविले ॥ ५५ ॥ जयरामस्वामींच
शिष्य गोपाळ । तेणें तयासि निवारीले । परि ते न ऐकति खळ
नेहति बळें स्वामीते ॥ ५६ ॥ जयराम समर्थ मग निघोनि । जा
जाले ठाण्यांत जाण । सत्कार केला यवनानें । परि छळण मानस
॥ ५७ ॥ आणि मनांत होतें जें का । प्रश्न केला तो चि निका
म्हणे भेटवा श्रीरघुनायका । मेळवा सुखा तात्काळ ॥ ५८ ॥ आपण
चि बदला कीर्तनीं । कैसा हि असो प्राणी । संत भेटविति तया
लागुनि । चापपाणी श्रीरघुवीर ॥ ५९ ॥ तरीं आतां दाखवा प्रचीत ।
संत म्हणविता आपणाते । मोंदियेले फार जगाते । अनुग्रहाते देउनि
॥ ६० ॥ जयरामस्वामीनीं तये काळीं । साधनक्रमणिका सुचविली ।
परी तो यवन नायके बोली । बुद्धि भ्रमली तयाची ॥ ६१ ॥
तात्काळ भरुनीं मांसताट । सभेमाजी आणिलें निकट । म्हणे आतां
करीन भ्रष्ट । दावा स्पष्ट देवासी ॥६२॥ जयरामसमर्थ ते वेळा । सांगते
जाहले यवनाला । श्रेष्ठ सर्वांत साधु भक्त । असे गेला तो स्नाना ॥६३॥
तयाते शिष्य पाठऊन । बोलाउनि आणितो जाण । करवितील ते
श्रीदर्शन । नाहीं क्षण तयासी ॥६४॥ ऐसे वदोनि दुर्जनासी । आज्ञा
केली गोपाळजीसी । म्हणति जाउनि कृष्णेसी । रामदासासी ये घेऊन
॥६५॥ मग गोपाळबावा अतित्वरेनें । निवेदन केलें सविस्तर जाऊन ।
रामदास महाराज हास्य करून । बोलती वचन ते वेळा ॥ ६६ ॥ काढुनि
यवनाची समजुत । निघोनी जावे बिऱ्हाडाते । कैसीयासी आला येथें ।
कार्य किंचित असतां पै ॥६७॥ निराकरण ऐसें करिता । गोपाळजीस
वाटली उद्विग्नता । रामदासस्वामीं समजले चित्ता । निघाले तत्वता त्वरेनें
॥ ६८ ॥ कल्याणासि सुचवोन । घेतले गवाळें आसन । यवन सभेत
प्रगटून । भेट दिधली जयरामा ॥६९॥ अविंदासी म्हणती श्रीरामदास।

तुज दावितो श्रीरामास । उठा सत्वर या वेळेस । विलंब नसे कांहीं चि ॥ ७० ॥ आमुच्या मार्गे येईल जाण । तयासी होईल श्रीदर्शन । ऐसी सांगुनी यवनासी खूण । उठविली जाण सकळ सभा ॥ ७१ ॥ जयराम स्वामी समजले मनीं । सूक्ष्मरूप धरिलें स्वामिनीं । भिंताडाचे जंगितुनि । गेले निघोनि शिष्यसहित ॥ ७२ ॥ यवनप्रभुनें पाहातां नैनि । विस्मय जाला बहुत मनीं । उपरति जाली अंतःकर्णि । लागला चरणीं स्वामीचे ॥ ७३ ॥ मग कांहि दिवस आदर करून । ठेऊन घेतले सर्वांसी जाण । जयराममहाराज करिति कीर्तन । करिति श्रवण सर्वत्र ॥ ७४ ॥ ग्रामाधिकारी प्रभुनें त्या । मठ बांधला तेथें तत्वता । मसिदिपासीं आहे आतां । जन पाहति सुखी होति ॥ ७५॥ वेणूबाईसी तयं स्थानि । ठेविते जाहले कैवल्यदानी । उपासना लाउनि जनिं । आले निघोनि चाफळा ॥ ७६ ॥ कोणे येके दिनिं श्रीसमर्थ । बैसले असती आनंदांत । तासमईं कल्याणाते । सत्शिष्याते विचारति ॥ ७७ ॥ म्हणति तुजलागि अनुभव जाला । कैसा प्रत्यय होउनि ठेला । कथन करितसे स्थितिला । अनुक्रमाला सकळिक ॥ ७८ ॥ कल्याणानें तये वेळीं । जोडिलीसे बद्धांजुळि । म्हणे महाराज चरणकमळीं । बुधि अर्पिली सकळीक ॥ ७९ ॥ प्रसन्नता जाणून मानसीं । करूं आदरिले प्रश्नासी । ग्रंथ जाहाला तो ज्ञानराशी । नाम त्याची तो दासबोध ॥ ८० ॥ श्रुति स्मृति भगवद्गीता । अर्थ कथिला त्याचा तत्वता । तयापरते सार पाहातां । अन्य ग्रंथ नसे पै ॥ ८१ ॥ सेवटि आरति कल्याणानें । दासबोधासि केली जाण । तेथें केलें आहे वर्णन । करिति पठण जन सर्व ॥ ८२ ॥ आणिक ग्रंथ शिष्य मिसें । केले आहेत रामदासें । श्रवणपठणें श्रोतीयास ॥ मुक्ति जीवास वरीतसे ॥ ८३ ॥ पदें अभंग अनेक स्तोत्रें । मनाचे श्लोक सारांश विचित्र । प्राणि गातां होति पवित्र । स्वतंत्र पद तया ॥ ८४ ॥ असो ऐसी ग्रंथ रचना । रामदासस्वामिनीं केली जाणा । मग समर्थ वदति अरे कल्याणा । करि लेखन हें सर्व ॥ ८५॥

तये काळीं कल्याण वदे । अक्षर सुंदर नाहीं शुद्ध । आज्ञापिति सच्चिदानंद । श्रीगुरु प्रसिद्ध तत्समईं ॥ ८६ ॥ अक्षरासी वळवावयातें । किता दिधला श्रीसमर्थें । जाळिं खाळीं स्पर्शिला हात । प्रगटली सत्य सरस्वति ॥ ८७ ॥ सूवर्णाचे शाईनें । केलें असे तें लेखन । प्रत्यहिं होतसे पूजन । संस्थान डोंब गांवीं ॥ ८८ ॥ कल्याण स्वामीचे समाधी जवळि । किता आहे तो प्रांजळी । सुखावती पाहातां डोळीं । दुःख समूळ जातसे ॥ ८९ ॥ असो कल्याणानें ग्रंथ लिहीले । श्रीगुरुचरणीं निवेदिले । जगदोद्धारा निर्मोनि ठेविले । भाग्य उदेलें सकळिका ॥९०॥ आणिक गोष्टी चमत्कार । ऐका तुम्ही श्रोते चतुर । श्रवणमात्रें कामना पुरो । संकट निवारे सकळिक ॥ ९१ ॥ समुद्रिं बुडता जहाज काढिलें । तें चि कथन आरंभिलें । स्मरण करितां सावकार भले । स्वामि पावले तयासी ॥ ९२ ॥ शिवाजी राजा कोण येके दिवसीं । येता जाहला चाफळासी । वस्त्रें अलंकार अर्चनासि । श्रीस्वामीसी घेउनि आला ॥ ९३ ॥ मरजरी पोषाग सुंदर । अमोल्य रत्नें पवित्र हार । सुगंध सुमनें बहु प्रकार । पूजा थोर आरंभिली ॥ ९४ ॥ मंगळ वाद्यें अनेक वाजती । ब्राह्मण मंत्र घोष करिती । होतसे कर्पूर आरती । शिष्य गर्जति स्तुतिवाद ॥ ९५ ॥ ऐसी पूजा समाप्तिसी आली । तो अपूर्व गोष्टि तेथें जाहाली । रामदास स्वामिनीं दृष्टी झाकिली । बुंथी घेतली मुखावरून ॥ ९६ ॥ चार घटिका समग्र होता । विस्मय जाहला सर्वत्र चित्ता । चैन न पडे नृपनाथा । म्हणे सर्वथा आश्चर्य हे ॥ ९७ ॥ तों समर्थें नेत्र उघडून । सांगते जाहले वर्तमान । म्हणती झाज आलो काढून । समुद्रांतुन या वेळा ॥ ९८ ॥ वस्त्रें पिळुनि राजियासि । दाखविलें क्षारोदकासी । याचा अनुभव पंधरा दिवसीं । निश्चयेंसीं फळेल तुम्हा ॥ ९९ ॥ ऐसें वदतां श्रीगुरुनीं । हर्ष जाहला सकळ मनीं । तो सावकार पंधरावे दिनीं । आला निघोनि चाफळा ॥ १०० ॥ इथंभूत सविस्तर तेणें कथिलें । मुंजे उपनाम तयाचे भले । म्हणे: झाज

तळासि चालिले । तेव्हां आठविले सकळ दैवतें ॥ १ ॥ परि येक हि देव न पावे । घाबिरे जाहले सकळ जीव । पांचजन्य करिती स्वभावें । दैवतें सर्व न पावति ॥ २ ॥ रामदास महाराज तये काळीं । चिचि स्मरलीं गुरुमाउली । मग येकसरा ध्वनी उमटली । श्रीरघुवीर बोली या शब्दें ॥ ३ ॥ प्रचंड वानर येऊन । झाज काढिलें कडेसि तेणें । तात्काळ जाला अदृश्यमान । पाहिले नैने सकाळिकें ॥ ४ ॥ तये वेळि चतुर्थांश । नवस केला श्रीस्वामीस । तो आजि घेऊनि चाफळास । आलों असे मी येथें ॥ ५ ॥ माहात्म्य स्वामीचें सावकारें । वर्णन करितां ऐशा प्रकारें । सद्गद जाहले नृपवर । जयजयकार करिती पै ॥ ६ ॥ समर्थापुढें तें द्रव्य ठेवितां । उदास म्हणति आम्ही सर्वथा । काय घेउनि नाशिवंता । अनेक पदार्था वस्तुसी ॥ ७ ॥ परि आग्रह तयाचा बहुत । दीन वदनें पदर पसरित । तयेकाळिं सद्गुरुनाथ । द्रव्य बहुत वाटले ॥ ८ ॥ संतोष करुनी तयाचा । निरोप दिधला प्रेमें साचा । श्रीगुरुप्रताप गर्जति वाचा । चमत्कार तयाचा काय वानूं ॥ ९ ॥ आणिक दुजी गोष्टी सुरस । परिसिसी असतां श्रीरामदास । घोडा अर्पिला सद्गुरूस । राजा शिष्य धन्य तो ॥ ११० ॥ पक्षेंद्र गति तो वाजी सुंदर । अत्यंत उंचा लावण्य फार । कोणी केला होता नदर । सावकार थोर तयानें ॥ ११ ॥ नृपवराचा अवघा भाव । सर्व प्रकारें श्रीगुरु देव । वस्त्रें अलंकार घालुनि स्वभावें । पाठविला गौरवें स्वामीकडे ॥ १२ ॥ सज्जनगडाचे तटाकावरीं । रामदास महाराज त्रितीय प्रहरीं । बैसले असतां निर्धारें । घोडा सत्वरीं पोहचला तो ॥ १३ ॥ अत्यंत अश्व तो चपळ । उड्डाण गती त्याची विशाळ । श्रीगुरुरायें अवलोकिला । धरिले, आयाल तयाचें ॥ १४ ॥ बंद मोकळे करुनि । बैसोनि पाहातां रामदास स्वामीनीं । अश्व उडोनि गेला गगनीं । उतरला अवनीं अरण्यांत ॥ १५ ॥ अनेक स्थळें फिरऊन । पर्वतात गेला घेऊन । शिष्य धावति मागे, जाण । आदि करून कल्याण ते ॥ १६ ॥ प्रथम

अनुग्रहीत उद्धव जो कां । तयानें घेतले असे उदका । धारण करोनि चुंबिची देखा । स्कंदावरी निका धांवतसे ॥ १७ ॥ तो स्वामींसी अरण्यांत । तृषा लागली अत्यंत । पाचारितां उद्धवातें । उदक त्वरित दिधलें पैं ॥ १८ ॥ श्रांत होतां प्राणी । शिव ऐसें वदतां वदनीं । शितळ होय तेणें प्राणि । शिवस्मरणें तत्वता ॥ १९ ॥ तृषा काळीं उदक देतां । संतोष जाहला सद्गुरुनाथा । नाम ठेविलें तें चि तत्वता संतोष चित्ता होउनि ॥ १२० ॥ ते वेळे पासोन । उद्धवें केलें कवन । शिव नाम योजिलें जाण । अभंगीं पूर्ण यालागीं ॥ २१ ॥ मग तो घोडा चाफळासि येतां । स्थिर जाहाला अहे तत्वता । दर्शनालागीं श्रीसमर्था । आणिले भक्ता रघुपतिचे ॥ २२ ॥ खालीं उतरोनी रामदासें । नावाजिले त्या अश्वास । नमन करुनी देवास। रामबाण ऐसें नांव ठेविलें ॥ २३ ॥ नंतर पुढें डेरवण गावाजवळि । बैसावयाची रामघळी । तेथें असतां दीनदयाळ । नवल केलें श्रीरामदासें ॥ २४ ॥ चमत्कार तेथें जाला जो कां । श्रवण करितां पाविजे सुखा । भवाचिये पार देखा । उत्तरि नौका ते कथा निरूपणि ॥ २५ ॥ दिवाकर माहान पंडित । काशीकर जन विख्यात । उद्धरिलें सद्गुरुनाथें । ऐका कथा तयाचिये ॥ २६ ॥ उत्कृष्ट जयाचियें अध्ययन । वामना परि तो श्रेष्ठ जाण । दिवसा दिवटी लाऊन । जिंकिलें ब्राह्मण सर्व हि ॥ २७ ॥ येज्ञोपवितासी बांधोनि सुरी । हिंडतां जाहला पृथ्वीवरी । क्षेत्रें जिंकोनी निर्धारिं । कृष्णातीरीं पातला ॥२८॥ तव ऐकिले तेणें कीर्तीसी । गंगाधर पंडित राजियापासी । घेउनि तयाचे भेटिसि । वाद भिक्षेसि मागावे ॥२९॥ यदर्थीं दिवाकर पंडीत । सातारियासी आला निश्चित । म्हणे दाखवा दर्यांते । गंगाधर महंत शिष्याचा ॥१३०॥ परस्पर नमन घडलें । सभा करावयाचें ठरलें । तयेकाळीं संकट पडलें । मन जाहलें चिंतातुर ॥ ३१ ॥ तेव्हां गंगाधर विप्र तेणें । रात्रौ जाऊन घेतलें दर्शन । पंडितासी त्या दिलें सुचऊन । म्हणे वाद घालणें राजगुरूसी ॥ ३२ ॥ रामदास नाम तयाचें । बहुत ब्राह्मण शिष्य जयाचे । दैवत अवघे

शिवाजीचें । मनो वाचे सद्गुरू तो ॥ ३३ ॥ तयासी जिंकुनि येथें येतां । सभा करूं मग सर्वथा । ऐसें सांगतां त्या पंडिता । हर्ष चित्ता जाहालासे ॥ ३४ ॥ आदौ वाढला अभिमान । तयात "संत महाश्रम श्रवण । घृतें सिंपिला हुताशन । तैसें जाण पै जाहाले ॥ ३५ ॥ निद्रा न लागे तयाचे नैनिं । केव्हां ह्मणे सरेल रजनि । प्रातःकाळिं निघोनि । आला त्वरित राजसभे ॥ ३६ ॥ शिवाजीस वदे पंडित । दाखवा तुमचा सद्गुरुनाथ । आदौ जिंकूं तयातें । मग सभेतें करूं पै ॥ ३७ ॥ राजेंद्रानें ऐकुनि ऐसें । सुचविता जाहला त्या शिष्यास । आपण न पडावे छंदास । महापुरुषास छळूं नये ॥ ३८ ॥ सांगितलें जेणें या विचारा । तयासि तुम्ही वाद करा । शिवाजी त्या द्विजवरा । बहुप्रकारा बोधवितसे ॥ ३९ ॥ परि तो न ऐके ब्राह्मण । अभिमानासि चढला जाण । ह्मणे तुजला काय कारण । करवी दर्शन आह्मासी ॥१४०॥ तरि कां अनुग्रह तयाचा घेतला । आज्ञा मानिसि सर्व कार्याला । आतां प्रताप पाहूं भला । नमन तयाला मग करूं ॥४१॥ दुरोक्ति ऐसा राजियाते । बोलता दिवाकर पंडित । स्वारि तयार केली त्वरित । नृपनाथें ते काळिं ॥४२॥ पंडितासि घेउनि स्वामिजवळि । येऊन नमन केलें भुपाळें । दिवसा लाविली तेणें मशाल । पुस्तकें सकळ संग्रहि ॥ ४३ ॥ शिष्य सर्व पुकारणी करिती । विद्या सिंधु किताप वर्णिति । पुस्तकभार संगें मिरविति । अजींक क्षिति तो पंडित ॥४४॥ रामघळिवर पर्वत प्रचंड । तेथें आहे भैरव धोंड । स्थळ पाहुनि सहाजि चोखड । रामदास सदै त्या ठाईं ॥ ४५ ॥ सवा प्रहर आज दिवस । जवळि सत्शिष्य तो कल्याण असे । कुबडी टेकुनि सावकाश । श्रीरामस्मरणीं विनटले पै ॥ ४६ ॥ तों अकस्मात सैन्यासहित । शिवाजी राजा आला तेथें । समागमें तो पंडित । आणि गंगाधर तो विख्यात शास्त्री हि ॥४७॥ आणिक क्षेत्रि विद्वान । बहुत असति ब्राह्मण । साष्टांगेंसि करूनि नमन । करिताति स्तवन सर्वत्र ॥ ४८ ॥ पंडित नमन कांहिं न करि । संशय पावला तो अंतरिं । ह्मणे मी जिंकीन आतां निर्धारिं । काय

थोरि तयाचि ॥ ४९ ॥ कदाचित हराविजे मजला । नमस्कार करिन मग स्वामीला । ऐशा प्रकारें विचारिं पडला । उभा ठाकला तैसाचि ॥ १५० ॥ रामदासस्वामि महा समर्थ । जो कां अवतार श्रीहनुमंत । यापुढें बापुडे ते । छंद व्यर्थ करिले किति ॥ ५१ ॥ सूर्याजवळी खद्योत जैसे । कीं खगेंद्रा पुढें वायस । नातरि थिल्लरोदक गर्जतसे । समुद्रास पाहून ॥ ५२ ॥ श्रीरामापुढें रावण । माहात्म आपुलें करी कथन । तयापरि तो ब्राह्मण । करि वदनें आत्मस्तुति ॥ ५३ ॥ असो फार काय दृष्टांत घेणें । रामदास स्वामी समर्थपूर्ण । आदौ तया नम्र वचनें । नमन करूनि गौरविला ॥ ५४ ॥ परंतु तयासि ते नावडे । जिंकावयाचि बाधली होड । आरंभिली तेथें बडबड । काय तोंडे वानुति ॥ ५५ ॥ तये वेळिं सर्वज्ञ समर्थें । आज्ञा केली कल्याणाते । म्हणति मोळक्या जातसे पंथें । बोलावा येथें तयासी ॥ ५६ ॥ मग आज्ञांकित तो शिष्यशिरोमणी । नमन करुनि श्रीगुरुचरणीं । अति शूद्रासि त्या आणुनि । कर जोडोनि उभे केले ॥ ५७ ॥ पुन्हा कल्याणासि वदति । रेषा वोढि चारि निगुति । आणि तया महाराप्रति । येऊ दे युक्ति रेषेते ॥ ५८ ॥ तात्काळ कल्याण स्वामींनीं । भुमिसि रेषा वोडुनि । मोळि तयाचि टाकउनि । बोलति वचनिं शांत ये ॥ ५९ ॥ येक रेषा उलंघन करिता । विचारिले तयासि तत्वता । असंज वदे मी शूद्र निश्चिता । कल्याण समर्था गुरुवर्या ॥ १६० ॥ वोलांडिता रेषा दुसरि । वैश्य जाहला तो निर्धारिं । तिसरि रेखा टाकितां वरि । बोले वैखरि क्षेत्रि मी ॥ ६१ ॥ उलंवितां चारि अवर्ण । मग ह्मणे मी शुद्ध ब्राह्मण । केलेसि काय शास्त्राध्यायन । वदे कल्याण ऐसें तया ॥ ६२ ॥ तये काळिं जोडुनि हात । उभा ठाकला तो निश्चीत । जाणतसे सकळ सिद्धांत । आज्ञा त्वरित व्हावी मज ॥ ६३ ॥ तेव्हां कल्याण तया सुचविति । वाद घालि या पंडिता प्रति । आज्ञा वंदुनि सत्वर गति । भाषणोक्ति आरंभिली ॥ ६४ ॥ आश्चिर्य पाहून दिवाकर पंडित । चिंत्ति जाला

भयाभित । उभा ठाकला साशंकित । नेत्रीं श्रवण उदक पै ॥ ६५ ॥ मग योगभ्रष्ट तो दिवाकरा । म्हणे पूर्वपक्ष वेगिं करा। जिंकीयेले.बहुत क्षेत्रा । आजि विचारा पाहूं ते ॥ ६६ ॥ चार घटिका पर्यंत । वाद जाला असेल तेथें । जिंकीयला सहजि निश्चित । जो कां पंडित दिवाकर तो ॥६७॥ गळित होऊनि अभिमान । साष्टांगेंसि केलें नमन । दुःखाश्रूनें गळति नैन । दीनवदनें ठाकला उभा ॥ ६८ ॥ सुरि घेऊन जानव्याचे । जिव्हा काढिली बाहिर साची । कल्याणानें घेतलि हातीचि । कोवळी मनाचि गुरुमाये ॥ ६९ ॥ पश्चात्ताप जाहाला जाणुनि । कृतार्थ केला तो ब्राह्मण । तत्त्वज्ञान सांगून । निजभुवन दाखविलें ॥ १७० ॥ नंतर तया मोळव्यासि । आज्ञा करिति कृपाराशि । उलंघन करून रेषेसि । घेऊन मोळिसी जाई तूं ॥ ७१ ॥ ऐसें वदतां श्रीरामदासें । वंदन करून साष्टांग पदास । कथिता जाला जन्मांतरास । येकाग्र मानसें ऐका तें ॥ ७२ ॥ म्हणे मी गंधर्व चित्र-सेन । निजस्थानासि असतां जाण । येते जाले नारद भगवान । करिता भजन सहज स्थिति ॥ ७३ ॥ न करितां तयाचें आतिथ्य । क्रिडा करावया गेलो स्त्रियाते । देता जाला श्रापातें । नारद समर्थ तो मुनि ॥ ७४ ॥ म्हणति दोन जन्म पशु होसील । सेखिं अंत्यज्यत्व पावसील । ऐसें वदतांचि हात जोडिले । प्रार्थियले नारदासि ॥ ७५ ॥ उश्राप मागतां बदली वाणी । श्रीरामदास कृपेनें येसील स्वस्थानीं । मृत्युलोकीं मग जन्मुनि । घोडा मेदिनी जाहालोसे ॥ ७६ ॥ जयपाळ राजाचे गृह प्राप्त होतां । मुकुंद मुनि आले तेथें अवचिता । निज करें तेणें शिरिं ताडितां । मुक्त सर्वथा त्या देहि ॥ ७७ ॥ मागुति रेडा होऊनि । प्रतिष्ठावर्नि वाहतसे पाणी । ज्ञानेश्वर तेथे येऊनि । पशुत्व ते क्षणिं दूर केलें ॥ ७८ ॥ तृतीय जन्म अंत्यज कुळिं । प्राप्त जाहला हा चाफळीं । नित्य आणुनि टाकितो मोळि । हृत्कमळिं स्मरुनि निज ॥ ७९ ॥ सत्संगाचे योगें करून । जन्मांतराचें जाहलें ज्ञान । तें सर्व निवेदन । निजभक्तीनें केलें पै ॥ १८० ॥

प्रत्यक्ष मारुति अवतार । रामदासस्वामी जो साचार । तेणें स्वमुखें दिधला मंत्र । त्रयोदश अक्षरें ज्यामाजि ॥ २४ ॥ परि दुर्धर कर्मगति । द्विजाची त्या भ्रमली मती । म्हणे साबडे मंत्राप्रति । काय निश्चिति जपोनि ॥ २५ ॥ यालागीं वाचाहीन जाला । प्रस्थाई तो विप्र पडला । मग चरणावरी मस्तक ठेविला । पदर पसरिला स्वामींते ॥ २६ ॥ तेव्हां दीनवत्सल श्रीगुरूनीं । अवलोकितां कृपा नयनीं । मागुती वाचा येउनी । स्वसुख सदनीं नांदविला ॥ २७ ॥ आणिक दुसरा चमत्कार । परळिस असतां श्रीगुरुवर । गुप्त पंथें जाती त्वरें । गेले साचार ते ऐका ॥ २८ ॥ बैसले असतां ध्यानस्त । आले श्रीच्या पूर्ण मनांत । निर्वाण समय मातेते । जाला प्राप्त ते सर्व ॥ २९ ॥ सकळ शिष्यासि सुचऊन । निद्रास्थानीं केलें शयन । म्हणति पंधरा दिवस पर्यंत जाण । द्वार निक्षून उघडूं नये ॥ ३० ॥ ऐसें वदोनी सर्वत्राते । प्रगट जाहालें जांबेंत । नमन करुनि मातुश्रीतें । जेष्ठ बंधुते भेटले ॥ ३१ ॥ राणुबाई जे कां माता । सांगति जाले स्वामिसि तत्वतां । म्हणे सखया आलासि आतां । साधिली सुता तूं वेळ ॥ ३२ ॥ गुरुवार आजि उत्तम दिवस । जाणें आहे वैकुंठास । म्हणुनि आठवण जाहाली मनास । तुझी विशेष नारायणा ॥३३॥ नाहीं जाहल्या चार घटिका । तव तूं पातलासि सख्या । आतां मेळउनि सकळ लोका । कीर्तन सुखा मेळविजे ॥ ३४ ॥ निर्वाणपीठ सिद्ध करूनी । बैसवि मजला योगासनीं । आपण पुढें उभे राहुनि । स्वरूपखाणी वर्णावी ॥ ३५ ॥ अज्ञेप्रमाणें श्रीरामदासें । कीर्तन विधि केला असे । मग आरंभिलें आरतीस । घोष होतसे नामाचा ॥ ३६ ॥ तव विमान स्वर्गीहुनि । उतरते जाहले तेथें मेदिनी । राणुबाई ततक्षणीं । चिद्गगनीं मिळाली ॥ ३७ ॥ येकात्मतेच्या विमानांत । बैसले स्वामींचे मातृ दैवत । अवलोकीति सकळ संत । घंटा वाजत घणघणा ॥ ३८ ॥ निजधामासि गेली सती । पुष्पवृष्टी सुरवर करिति । उत्तर विधि जनरिति । करिते स्वामी

यथोक्त ॥ ३९ ॥ चतुर्दशदीन होतां सांग । परळीस आले चित्सुखरंग । देवालयांत स्वअंगें । प्रगटले निःसग देवीचे ॥ ४० ॥ क्षौर केले पाहुनी । विस्मय केला समस्तानी । शिष्य सकळ लागता चरणी । संतोष वचनी गौरविति ॥ ४१ ॥ असो कोणे येके दिवसी श्रीरामदास । माहुलीस गेले कृष्णास्नानास । सकल्याणआदि करुनी शिष्य । समागमास असती पै ॥ ४२ ॥ भिक्षा करित ग्रामात । येते जाहले श्रीसमर्थ । तेथुनि पातले सातारियात । राजमंदिरात सहज स्थिति ॥ ४३ ॥ शिवाजीनी विचार केला । जे भिक्षा घाला श्री स्वामीला । चिटणिसासी बोलाविला । मजकूर लिहीला सुंदर ॥ ४४ ॥ सकळ राज्य श्रीगुरुचरणी । अर्पिले सनदेत लेहुनि । स्वहस्ते मुद्रिका करुनि । पत्र घेउनि घातले झोळित ॥ ४५ ॥ उद्धव शिष्या करवी वाचविता । हासे आले श्रीसमर्था । म्हणती करणे का आता । तुजलागी तत्वता राजेंद्रा ॥ ४६ शिवाजीराजा ते वेळी । जोडुनिया बद्धांजुळि । मस्तक ठेउनि चरण कमळी । गुरुमाउली प्रार्थीतसे ॥ ४७ ॥ कल्याणा सारिखा जवळि असोन । निच दास्यत्व तितुके करीन । ऐसे वांछित असे मन । करावे पूर्ण मनोरथ ॥ ४८ ॥ उत्तम म्हणोनि श्रीरामदासे । घेतले संगे शिवाजीस । खांद्यावरि देउनि झोळिस । घेतली भिक्षेस तिन घरे ॥ ४९ ॥ संत रमाघारे भजन करित । परळिस निघाले श्रीसमर्थ । दोन प्रहरा माध्यान्हिकाते । उतरले निश्चित गंगेवरी ॥ ५० ॥ भिक्षा मागुनि गावातून । पिठ आणिले असे जाण । पानगे तयाचे करऊन । समग्र पूर्ण पात्रे घातली ॥ ५१ ॥ शिवाजी आदि शिष्य घेऊन सहित । भोजनासि बैसले सद्गुरुनाथ । म्हणति ऐसे सुख प्राप्त । समागमे सत्य आमुचे पै ॥ ५२ ॥ तरि आता सांगतो तुजला । गुरु आज्ञा प्रमाण शिष्याला । जाउनिया स्वस्थानाला । राज्यभार मला चालवी तू ॥ ५३ ॥ गाई ब्राह्मण पालन । प्रजा सकळ संरक्षण । तेणे आम्हाति घडले पूर्ण । सर्व जाण उपचार ॥ ५४ ॥ ऐसे निक्षुन आज्ञा करिता । राजा सद्गद जाला चित्ता । चरणावरि ठेविला माथा ।

प्रेमसर्वथा स्फुंदतसे ॥ ५५ ॥ तयेकाळीं शिवाजी लागुना । पादुका दिधल्या पाईच्या जाण । श्रीराम दासबोध करून । दय डिले मीपण तेचि क्षणीं ॥ ५६ ॥ जैसे भरतासी रघुनंदनें । सतोष केला पादुका देऊन । मग सेविलें कानन । दयाघनें श्रीरामें ॥ ५७ ॥ तैसेंचि येथें श्रीगुरुरायें । समाधान केलें पाहे । शिवाजी राजासी लाउनि सोय । गेले स्वयें स्वस्थाना ॥ ५८ ॥ आज्ञा घेउनि राजा निघाला । सातारियासी जाता जाहला । चिंतीतसे श्रीगुरुला । नाहीं तयाला रात्रदिन ॥ ५९ ॥ वारंवार परळीसी जाऊन । दर्शन घ्यावें प्रीति करून सर्व साहित्य पुरवोन । असावें पूर्ण सेवेसी ॥ ६० ॥ भोजन कराया स्वामींप्रति । पाट करूनि पाठविले प्रीती । चोशीग वाट्या खिळोनि निश्चितीं । परमयुक्ती अति सुंदर ॥ ६१ ॥ गाशागिरद्या शयनाशी पलंग । सुलक्षण पवित्र रम्य चांग । नानाविध पदार्थ सांग । नसे व्यंग काहींचि ॥ ६२ ॥ ऐसे अनेक उपचार । समर्पण केले राजेंद्र । सर्वकाळ जोडुनिकर । फार्कुना साचार जवळि तो ॥ ६३ ॥ सन्निध असति शिष्य । अका वेणु शिपिणि विशेष । शयन केलें श्रीरामदासें । सेवा निःशेष कारिती त्या ॥ ६४ ॥ हें पाहुनि त्या फार्कुनानें । संशय आणिला मनांत पूर्ण । वारंवार पत्रांत लेहून । सुच-विलें जाण राजियाप्रति ॥ ६५ ॥ म्हणे ब्रह्मचारी असता व्रत । निद्राकाळीं स्त्रिया कीमर्थ । ऐसा जाहला संदेह मस्त । कोंडोपंत ते काळीं ॥ ६६ ॥ पत्रिका लेहून धाडिता । राजा आला परळीस तत्वता । अशंका धरूनि रात्रौ चिता । गेले तत्वता पाहावया ॥ ६७ ॥ गुप्तरूपें निद्रास्थानि । शिवाजी पाहता आपुले नैनि । दर्शन दिधलें रूप पालटोनि । प्रत्यक्ष होउनि श्री मारुती ॥ ६८ ॥ वेणु आका त्या वानरी दिसती । राजा देखुनि लज्जित चित्ति । परतला तेथुनि परमयुक्ती । मंदमति हळुहळु ॥ ६९ ॥ कोंडो पंतासि मूर्ख ऐसें । शिवाजी तेव्हा वदतसे । ही अक्षरें श्रीरामदासें । स्वकर्णासि ऐकीयेली ॥ ७० ॥ जे मुंगीचे मनोगत जाणति । समुद्रा पैलि कडील पाहति । तेथें सूक्ष्म

बोलता स्थिति । न फळे युक्ति काय स्वामीते ॥ ७१ ॥ सर्वसाक्षी श्रीगुरुराव । राजियासि म्हणति इकडे यावें । मूर्ख कोणासी म्हणावें । ठाई पाहावें तूंचि पैं ॥ ७२ ॥ शिक्षा उत्तर ऐकुनि । नृपति ग्लावला आया परम भिती । मृत्युप्राय होउनि चित्ती ॥ पडला क्षिति साष्टांगि ॥ ७३ ॥ थरथरा अंग कापतसे । बोबडी पडली मुखास । मग समग्र वळले श्रीरामदासें । समिध राजास केले पैं ॥ ७४ ॥ निःसंशय होउनि चित्तीं । शिवाजी गेला सातारिया प्रति । आणि चमत्कार ऐका श्रोती । सद्गुरु कीर्ति जगपावन ॥ ७५ ॥ कोणीयेक समई सातारियास । गेले असता श्रीरामदास । घेतला ब्राह्मणे उपदेश । गोष्टी विशेष परिसा ते पैं ॥ ७६ ॥ अत्यंत दरिद्री असे जाण । इच्छि सदा मिष्टान्न । एतद्विषयी पर्यटण । करी भ्रमण सर्वदा ॥ ७७ ॥ हिंडत हिंडत सातारियासी । आला द्विज तो मेमेसि । अवलोकिले राजगुरूसी । अलंकारादि वस्त्रादि ॥ ७८ ॥ समारंभ तो पाहून । आनंदला ब्राह्मण मनें । म्हणे स्वामीसी जाऊन शरण । उपदेश घेवों लवलाही ॥ ७९ ॥ तेणे करून राजियाचे । गुरुबंधुत्व घडेल साच । पक्वान्नाशी उणे कैचे । मिष्टान्नाचे भोजन सदा ॥ ८० ॥ ऐसा विचार आणुनि मुनी । मस्तक ठेविले स्वामीचरणी । करिता जाहला विनवणी । जोडोनि पाणी स्वामीते ॥ ८१ ॥ मेघ सर्वत्र वर्षावे । तैसा साधुचा स्वभाव । अवश्य म्हणति श्रीगुरुराव । केला अनुग्रह गौरव ॥ ८२ ॥ पुढे काही काळे करून । अरण्यात असता स्वामी जाण । दर्शनासि तो ब्राह्मण । आला निघोनि शोध करित ॥ ८३ ॥ वैराग्य स्थिति यानि पाहता । विपरीत भाव त्या जाहला चित्ता । म्हणे ऐसियाचा अनुग्रह पाहता । घेवोनि वृथा काय फळे ॥ ८४ ॥ वेडसरपण गोसावीयाचे । अंगी दिसत असे साचे । आश्चर्य टाकुनी नेमाचे । वैराग्याचे काय सुख ॥ ८५ ॥ शिवाजी सारिखा नृपाळ । शिष्य असता प्रेमळ । भिक्षेचे तयासी डोहाळे । मंत्र केवळ गौण याचा ॥ ८६ ॥ या प्रकारे दुर्भावना । येति जाली त्याच्या मना । मौनेचि करूनि गमना । परतला जाण हेतुसि ॥ ८७ ॥

जाजा साधूकडे जाता । प्रश्न करी तेथे तत्वता । निघोनि जाय धिकारिता । ठाई बहुता फिरला तो ॥ ८८ ॥ तुकाराम तेहि भेटले । तयानि स्पष्ट सांगीतले । रामदास स्वामी समर्थ भले । उपासना केवळ योग्य तो ॥ ८९ ॥ परि तो नायके ब्राह्मण । पाठिसि लागला रात्रंदिन । पडु देइना कदा चैन । तेंव्हा वचन बोलिले त्या ॥ ९० ॥ रामदासस्वामीचा उपदेश जयासी । सद्गुरुरूप ते पुरुष । आम्हासी उपदेश करणे तयासी । काळत्रयासि न घडे पै ॥ ९१ ॥ मग निघोनि तो ब्राह्मण । स्वामीपासी आला जाण । औदुंबर क्षेत्र पूर्ण । उत्तमस्थान कृष्णातिरी ॥ ९२ ॥ नमन करुनि उभा राहिला । मंत्र म्हणे घ्यावा आपुला । तये काळी दाविली लिला । द्विज तयाला श्रीरामदासे ॥९३॥ आज्ञा करुनि ब्राह्मणाते । उदक घेवविले मुखाते । मंत्र जपोनि खडकावरुते । नेले निरुते तत्क्षणी ॥ ९४ ॥ त्रयोदश अक्षर ते वेळी । पाषाणावरि त्या उमटली । वाच्या गेली तात्काळी । उपासना मलि त्याग करितां ॥ ९५ ॥ मग घाबरा होउनि ब्राह्मण । तुकोबाकडे गेला जाण । सांगितले सकळ खुणे । वर्तमान जाहले तें ॥ ९६ ॥ पश्चाताप होउनि मना । लागतसे विप्र चरणा । हास्य करोनि बोलति वचना । तुकाराम जाण त्या विप्रासी ॥ ९७ ॥ म्हणति असे मतिमंदा। काय तुजसी करणे बोधा । शरण जाई रामदास पदा । तेचि सदा तारिति पै ॥९८॥ जयाचे सामर्थ्य निर्धारि । मंत्र उमटला दगडावरी । तेथे तुझी कोणसरी । इच्छिते अंतरी पुरवावया ॥ ९९ ॥ परि तु अनाधिकारी म्हणून । येथे आलाशी लाजीरवाणा । हिंडुनि काय त्रिभुवना । सांडुनि चरण श्रीगुरूचे ॥ १०० ॥ तरी तूं जाई माधारा । शरण जाई श्रीगुरुवरा । तेणेचि तरसी भवसागरा । निश्चय खरा जाणिजे पै ॥ १ ॥ तयेकाळी तुकारामाला । म्हणे मजला घेवोनि चला । निरावेता सद्गुरुला । कृपा तयाला येईल पै ॥ २ ॥ नातरी मजला मुख दावावया । शंका वाटे फार हृदया । ऐसे खुणेने सुचवोनिया । लागला पाया तुकोबाच्या ॥ ३ ॥ तेंव्हां तुक-

याचें चित्त द्रवले । तात्काळीक संगे निघाले । पायावरि घातिले । करकमळ जोडुनि ॥ ४ ॥ परस्परे भेटि होता । आनंद जाहला उभयतां । विप्रासि याच्या फुटली तत्वता । कृपा करिता श्रीरामदासे ॥ ५ ॥ पाषाणावरी त्या होताचि मंत्र । चाटविला तो चि पवित्र । औदुंबर जेका क्षेत्र । तेथे विचार होता जाहला ॥ ६ ॥ मग समर्थानी त्या ब्राह्मणासी । पुसिले तुजला इच्छा कायसि । निवेदन करितां सर्थासि । हास्य मानसी करिता गुरु ॥ ७ ॥ म्हणती पुर्वीच नाही सांगीतले । उगाच फिरसी भू मंडळी । सुसीया केला तात्काळ । उध्दरिला निज विप्रा ॥ ८ ॥ सकाम निष्काम ऐशा प्रकारे । शिष्यमंडळी मिळाली फार । तयेकाळी श्रीगुरुवरे । केले चमत्कार ते ऐका ॥ ९ ॥ कोणेयेके दिवसी समेत । पुराण ऐकता शिवाजी नृपनाथ । निरोपण जाहाले सहज्यात । वासना निमित्य जन्म म्हणोनी ॥ ११० ॥ राजियानी ते वेळा । चित्तामाजी विचार केला । शोध करिता पदार्थाला । कोठे मनाला प्रीति नसेचि ॥ ११ ॥ परी येक तरुवार । अयत आवडे ते हत्यार । तेथे लक्ष वारंवार । निरंतर जातसे पै ॥ १२ ॥ यालागि दूतासि सांगून । तलवार पाठविली स्वामीकडे जाण । परळीगड सस्थान । श्री दयाघन तेथे होते ॥ १३ ॥ येकांती असता ध्यानस्त । हत्यार आणोनि ठेविले तेथे । अवलोकिता तलवार ते । घेतली हातांत गुरुराये ॥१४॥ बाळोन्मत्त पिशाच्च स्थिति । साधु अंगी सहजी असती । शिष्य परीक्षा करावया निगुति । पिशाच्चवृत्ति अवलंबिली ॥ १५ ॥ कुंकुम लाउनी भव्य भाळा । तरवारेचा सळ सोडिला । खोलिबाहेर निघोन लीळा । आरंभिला विचार तो ॥ १६ ॥ जे जे दृष्टीस पडे मनुष्य । तयावरि धावति श्रीरामदास । वेड लागले म्हणति शिष्य । निश्चय सर्वास हाच मनी ॥ १७ ॥ कोणी शिष्य सन्मुख येता । तयासि वाटावे तोडितील आता । मोहे कैचा जीवा परता । निर्धार चित्ता न धरवेचि ॥ १८ ॥ किल्याचे तटावरी स्वामी गेले । तेव्हा शिष्य सकळ म्याले । निर्धारासि सर्वी केले । खूळ लागले म्हणूनी ॥ १९ ॥ याचत नाहीत म्हणति

आता । परतते जाहले माघारे तत्वता । कल्याण माघे जाउं जाता । तया सर्वथा निवारिती ॥ १२० ॥ खूळ लागले म्हणता स्वामी । तरी समस्त खुळे तुम्ही । श्रीगुरुमाझे निभ्रांती । ज्याचे नामि भ्रांति तुरे ॥ २१ ॥ ऐसे वदोनि कल्याणाने । निश्चय केला असे मनें । रामदास स्वामींचे मावे जाण । गेले निघोन लवलाही ॥ २२ ॥ रानभरी स्वामी होता । कल्याण येकटा संगे तत्वता । सन्मुख पुढे जाउं पाहता । सद्गुरुनाथा क्रोध बहु ॥ २३ ॥ तलवारेचा घाव घालिति । आंगावरि दगड मारिती । परी निर्भय असो निश्चिति । चरणी प्रीती स्वामीचे ॥ २४ ॥ पर्वत कडे दरि शिखरे । फिरले अरण्य वनांतरे । न विसंबे चि कल्याण स्वरे । शिष्यत्व खरे ज्याचे पै ॥ २५ ॥ सेवटी उर्वशी नदींचे उगमी । पिपरणी वृक्षावरि चढले स्वामी । कल्याणासी म्हणति मारीन मी । नका तुम्ही येउ पुढे ॥ २६ ॥ अत्यंत कडा तुटला जेथे । दृष्टी न पुरे खाली भुमीते । ऐशास्थळी श्रीगुरुनाथे । बैसले स्वस्थ जाउनी ॥२७॥ तेथे जावोनी कल्याणाने । करुणा मांकिली प्रार्थना करून । प्रेमाश्रुने गळती नैन । धरिले चरण सदृढ पै ॥ २८ ॥ सदय व्हा वेगि सहृदया । ऐसे वदोनि धरिले पाय । कृपासिंधु श्रीगुरुराय । म्हणती काया श्रमली तुझी ॥ २९ ॥ मग तो प्रेमा गुरुशिष्याचा । काय उघड सांगु त्याचा । तर्क न चले मनाचा । अनुभव साचा अबोलणा ॥१३०॥ पोटिसि धरुनि आनंदाने । आलिंगन दिधले प्रिती करून । म्हणती वो सखया जाहला शीण । शोभे कल्याण नाम तुला ॥ ३१ ॥ भजन करी तू अति हर्षे । स्वस्थाना पावले गुरुशिष्य । पुढे कथा श्री सिद्धेश । लीला बोलावी विशेष ॥ ३२ ॥ स्वयेचि हृदई प्रगटोन । आप आपुले पदवी गुण । राजारामीं नियलोण । केले अर्पण देहभावा ॥ ३३ ॥ भक्तमंजरीमाला ग्रन्थ । श्रवणेचि पुरति मनोरथ । रामदासस्वामी चरित्राते । अध्याय हो दहावा ॥ १३४ ॥ शुभंभवतु ॥ ५ ॥

## अध्याय ११ वा

श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजय सद्गुरु अपरमिता । विश्वव्यापका आनंद भरिता । चराचरी पूर्ण समता । येकात्मता परिपूर्ण ॥१॥ स्वरूपाकडे पाहूं जाता । विदेही होणे देहि असता । जे जे घडे ते ते सत्ता । नाहीं सर्वथा दुजे पै ॥ २ ॥ इंद्रिये स्वकर्मि वर्तति । परि न मोडे आत्मस्थिति । नवल केले कृपामूर्ति । काय युक्ति वाजु ते ॥ ३ ॥ आता हेचि येक भले । मौनेचि न मिश्री पाउले । आदिअंति मरोनि ठेले । स्वरूप सगळे अविनाश ॥ ४ ॥ येकात्मता येकादशे । अध्याय आरंभिला कथा रस । श्रीगुरुलीला जेथ विशेष । उरे लेश द्वैताचा ॥ ५ ॥ अकरावा रुद्र जो मारुति । रामदास अवतार तोचि जगति । तयाचे आख्यान प्रसवलि मति । कोण प्रिती न धरी त्या ॥ ६ ॥ दशमोध्याई कथन जाहले । स्वामीनी शिष्यासि परिक्षिले । करि उतरिला कल्याण । कल्याण भले ज्या नामे ॥ ७ ॥ म्हणति सर्वे जगाचे कल्याण केले । तुचि सख्या करिसील जाण । आणि गंगातीर संस्थान । कराया कृपेने अज्ञापिले ॥८॥ शिवाजी राजा दर्शनासी । आला होता ते वेळेसि । गाव दिधले स्वस्थानासि । कल्याणासि दोन पै ॥ ९ ॥ डोवगाव आणि गौडरे । अर्पिले तेव्हा नृपवरे । मुले घेवोनि संगे चार । गेले त्वरे तद्देशी ॥१०॥ वाईकर मुधोबा म्हणोनि । दुसरा निनामकर कुळकर्णी । गोमाजी नाम सुलक्षणी । बोलती वाणी जगतया ॥ ११ ॥ तिसरा चोरेकर मुरारी । चौथा शाहापुरकर निर्धारी । या प्रकारे मुले चारि । ठेविली बरी मठ करुनि ॥ १२ ॥ परमार्थ वाढवावयाची । हातवटि अधीक कल्याणाची । अन्यग्रंथी वर्णिली साची । कथा तयाचि सविस्तर ॥ १३ ॥ याळागि संक्षेपे केला येथे । श्रीगुरु कृपेचे अवघे सामर्थ्य । वाचांश करणे कासया बहुत । लक्ष जेथे विरतसे ॥ १४ ॥ असो परिळीसी वास स्वामीचा असता । चमत्कार जाहाला तत्वता । वेणूबाईसी दाविली व्यवस्था । ते,

ऐकता माहा पुण्य ॥ १५ ॥ कोणीयेक समई भोजनास । येकांती बैसले श्रीरामदास । पदार्थाते वाढितसे । वेणुबाई सत् शिष्य ॥ १६ ॥ चोवीस वाट्या खिळोनि सुंदर । ताट पाठविले होते नृपवरे । येकावेळा तयात सारे । स्वकरे अन्न समर्पावे ॥ १७ ॥ ऐसा प्रत्यहि नेम असता । ते दिवशी चुकली वेणुबाई पदार्था । म्हणोनि जीनस घेउनि तत्वता । पुन्हा वाढावयासि जाता ॥ १८ ॥ द्वार उघडिता खोलिचे । ध्यान पाहिले स्वामींचे । तो भीमरूप प्रचंड साच । न ये वाचे वर्णिता ॥ १९ ॥ भयाभीत तेणे होऊन । भुमीसी पडली वेणु जाण । तत्काळ जाहाली प्राणहीन । अचेतन काष्ठवत ॥ २० ॥ अका धावोनि तेथे आली । पाहू जाता वेणु मेली । भोजनानंतर प्रार्थियेली । गुरुमाउली अकानि ॥ २१ ॥ रामदास वदति वेणुते । पुर्वीच सांगितले होते । पाहु नको दृष्टीते । वाढून मागुते गेलीया ॥ २२ ॥ उलंघिता आज्ञेसी । गति जाहली तयेचि ऐसि । आता वेणु निजधामासि । गेली असे वाटते ॥ २३ ॥ अकाबाईने प्रार्थना करून । विनविले मागुति स्वामिसि जाण । म्हणे महाराज कृपेकरून । सजीव करणे वेणुसि ॥ २४ ॥ भक्तवछल श्रीरामदास । करिते जाहाले तेंव्हा हास्य । करे स्पर्शित त्या प्रेतास । आली देहास प्राण चेतना ॥ २५ ॥ वेणुबाईनी श्रीगुरुचरणी । मस्तक ठेविले प्रीति करून । आनंद जाहला सर्वत्र जनी । यशवदनि गाती ते ॥ २६ ॥ मग बहुत दिवसावाचून । केले स्वामीचे आराधन । नानाविध करून स्तवन । पूजिले चरण सद्गुरूचे ॥ २७ ॥ मिरजेहुनि येत असावे । काहि मठी तेथे राहवे । उधरिले जडजीव । लाउनि उपासना भावे ॥ २८ ॥ सेवटी जाणूनि निर्याण समय । आठविले श्रीगुरुपाये । येती जाहली त्वरे । लक्षुनि ठाय स्वामीकडे ॥ २९ ॥ तयेकाळी आकास । सांगते जाहले श्रीरामदास । वेणु भिऊनि मरणास । येईल परळीस आजि येथे ॥ ३० ॥ ऐसे वदतो सायंकाळि । वेणुबाई मठासि आली । मस्तक ठेविले पदकमळी । बध्यांजुळी जोडोनी ॥ ३१ ॥ निवेदिला मनीचा अर्थ ।

म्हणे मी जातें निज धामाते । तये वेळी सद्गुरुनाथे। घेतले वेणूते राहूनि ॥ ३२ ॥ मग ती दोन वर्षे पर्यंत पाहि । मृत्युलोकी असावे सुठाई । नंतर धाडू त्वराहि । वैकुंठा जाई तूं निज प्रीति ॥ ३३ ॥ ऐशा प्रकारें आज्ञापिता । चरणावरि ठेविला माथा । आज्ञा घेवोनि तत्वता । गेली सर्वथा मिरजेसि ॥ ३४ ॥ दोन संवछर राहूना। उत्धरिले बहुत जन। सर्वत्राति विचारूनी । परळी संस्थान आली तेथे ॥ ३५ ॥ आजि उद्या म्हणोन। वेणूबाईसी चाळऊनी । पंधरा दिवस घेतले ठेउनि । श्रीगुरूनि अति आवडि ॥ ३६ ॥ मग पक्वान्ने करउनि सुंदर। भोजन सारिले श्रीगुरुवरे । आज्ञापिले प्रेमभरे । कीर्तन गजरे करावया ॥ ३७ ॥ यथासांग कथा जाहली । मंगळ आरति आरंभिली । निर्याण समय घटिका आलि । प्रमा दाटली येकसरा ॥ ३८ ॥ श्रीगुरुसमर्थ गर्जोनि वाणी । जड तनु ठेविली मेदिनी । ज्योति मिनली चिद्गगनी । निजात्म भुवनी मिळाली ॥ ३९ ॥ दहन केले जेथे पाहि । चंपकवृक्ष उगवला ते ठाई ॥ तयाचि पुष्पे श्रीगुरुपाई । अर्पिति देहि जन सारे ॥ ४० ॥ वृंदावन तये स्थानी। देवालयाचे वायव्य कोनी। अवलोकिती सकळ नयनी । सुख दर्शनी होय जीवा ॥ ४१ ॥ गुण आठवोनी वेणूचे। दुखीत जाहले मन लोकाचे । समजोनि सांगता श्रीगुरुवाचे। क्लेश कैचे मग राहती ॥ ४२ ॥ असो कोणे येके दिवशी शिवाजीस। आठवले सहजी मनास । सद्गुरुनाथ रामदास । आणि तुकोबास अभेदता ॥ ४३ ॥ आपणासि पाहिजे सत्संगती । स्वामि जवळि सतत नाहिति । येत-द्विपई योजिले चित्ति । तुकारामा प्रति आणावया ॥ ४४ ॥ पत्रिका लिहून कारकुना हाते । पाठविले बोलावण्याते । तयेकाळी तुकोबा संत । महा समर्थ ज्ञानराशी ॥ ४५ ॥ जाणोनि भावार्थ पत्राचा । अभंग लिहिला सुंदरसाचा । रामदास अवतार मारुतीचा । छंद तयाचा असो म्हणोनि ॥ ४६ ॥ अष्टप्रधनासि पत्रे । देसन केली सुंदर पवित्रे । रामदास स्वामीसी स्तुति स्तोत्रे। लिहिलीं स्वतंत्र यथा

न्याये ॥ ४७ ॥ वैराग्य अपुले दर्शउन । राज्याचे केले समाधान । तेव्हा शिवाजी घ्यावया दर्शन । गेला निघोनि रायगडाहूनि ॥ ४८ ॥ शितोळे देशमुख पुण्यात । तेथे होते तुकोबा समर्थ । वातमी लागोनि अकस्मात । गेले तेथे ते राजे ॥४९॥ तो कीर्तनाचा लोट चालला । स्मृति नसे तुकयाला । तशात शिवाजी पातला । प्रेमळ भला गुरुभक्त ॥ ५० ॥ भगवद्भक्ताचे कीर्तन । मारुति सहीत तेथे भगवान् । तिष्ठायमान असती जाण । जाहले कारण ते ऐका ॥५१॥ कथा रंगाशी येता । तुकया आंगि प्रेम भरला । आनंद नावरे श्री हनुमंता । आरंभिले नृत्य तया ठाई ॥ ५२ ॥ राजियाने पाहूनि भक्ति । तुकोबासि धन्य म्हणती । स्वामिपेक्षा आधिक स्थिति । ऐसे चित्ति वाटले ॥ ५३ ॥ सर्वसाक्षी तुकाराम । जाणिले राजियाचे मनीचे वर्म । कीर्तन समाप्त होताचि धर्म । निरोपण प्रेमे आरंभिले ॥ ५४ ॥ म्हणति देवांश सकळ वानर । आम्ही तेचि संतसारे । सर्वाध्यक्ष श्री महारुद्र । रामदास अवतार तयाचा ॥ ५५ ॥ तयापेक्षा ज्ञान काही । लोकत्रै कोठे नाही । प्रत्यक्ष मूर्ति डोळे पाहि । पाहिली महि तेचि ते ॥ ५६ ॥ नृत्य केले श्री हनुमंते । तेचि महाराज सद्गुरुनाथ । ऐसे सांगता शिवाजी ते । रामदास तेथे प्रघटले ॥ ५७ ॥ मग लज्जीत होवोनि नृपति । नमन केले साष्टांग क्षिति । उभयता वंदोनि श्रीमूर्ति । आले निगुती स्वस्थाना ॥ ५८ ॥ सर्व काळ श्रीगुरुपदी । निमग्न जाहली सत्बुधि । दृढभक्ति जयाचि आधि । तयात सिधि चमत्कार ॥ ५९ ॥ रामदास स्वामिसी वारंवार । प्रार्थना करी राजेंद्र । म्हणे सेवेसी असता किंकर । दास्यत्व विचार न घडेचि ॥ ६० ॥ तये काळि समर्थानि । आज्ञापीले राजालागुनि । म्हणति जोहार मोडोनि । सकळ वदनी राम म्हणावा ॥ ६१ ॥ आणि ब्राह्मण भोजनासी । परस्पर देविले सरंजामासि । ठाई ठाई उछाहासी । समारंभासि कराथया ॥६२॥ असो सद्गुरुनाथ श्रीरामदास । शिवाजी राजा जयाचा शिष्य । तेथे उणे किमपि नसे । कराविही विशेष संस्थाने ॥ ६३ ॥

कोणे येके दिवशीं माहुली सन्नीध । स्वयंभु स्थानें श्रीपाटेश्वर प्रसिद्ध । तेथे आले श्रीरामदास सिद्ध । भजन शुद्ध करित पै ॥ ६४ ॥ रम्य-स्थान पाहून । सुखावले स्वामींचें मन । आवलोकिले देवगण । पर्वत धन्य ते जाणा ॥ ६५ ॥ श्रीसांमाच्या विवाहा निमित्य । आदौ आली तेथे दैवते । हरिद्रालेपन जाहली त्वरित । पावले समस्त ऋषि आदि ॥ ६६ ॥ तीर्थें जे का तेथील तळे । पीतवर्ण दिसते जळ । प्राशन करिता मधुर प्रांजळ । स्नानें सकळ दोष हरति ॥ ६७ ॥ तये स्थाळि श्रीस्वामिनीं । तोषविला शिव आर्चनीं । कीर्तन तेथे करुनि । कैवल्य दानी निघाले ॥ ६८ ॥ पर्वताखाली उतरता । देगावचें रान लागले तत्वता । तो क्षुधा लागली शिष्या समस्ता । विचारिति स्वामीसी ॥ ६९ ॥ शेतागणिता कणसे चार । घेवो निर्वाह करा सारे । उपद्रव कोणासि निर्धार । देउ नये फार सर्वथा ॥ ७० ॥ ऐशाप्रकारे स्वामीनीं । आज्ञा करिताच शिष्यानि । कणसे काही जमा करून । आगटि पाहुनि हुरडा भाजिति ॥ ७१ ॥ देवगावकर पाटिलाचे शेत । तेथे येवोनी श्री समर्थ । अग्नि पेटविला शिष्या हाते । धूर बहुत निघाला ॥ ७२ ॥ तव तेथे होता तो शूद्र । अवलोकिले तेणे नेत्रे । क्रोधायमान होउनि अंतर । धाविन्नला त्वरे तात्काळ ॥ ७३ ॥ म्हणे न विचारिता गोसावियाने । शेत लुटले समग्र जाण । हुरडा भक्षिति शिष्यासि घेउन । शिक्षा करणे वेगेसी ॥ ७४ ॥ दुरोक्ति ऐसे वदोन । ताटे घेतली हाते तीन । येकसरा मारिली रागे करून । प्रत्यक्ष जाण स्वामिसी ॥ ७५ ॥ पारे जयाचि केवढि शांति । रामदास महाराज हास्य करिति । सकळ शिष्यासि आज्ञापिति । चला पंथी उगेचि म्हणोनि ॥ ७६ ॥ सातारियासी पोहचता भले । आडवा आला शिवाजी नृपाळ । सिन्हासनी बैसविले । आरांभिले उपचार ॥ ७७ ॥ स्व आंगे घालिता स्नान । विचारिले राजियाने । म्हणे स्वामीसी मारिले कवणे । दिसती व्रण पृष्टी वरी ॥ ७८ ॥ रामदास वदति तेन्हा पाहे । शिवाजी याविण कारण काय । विचारू नको उगाच राहे । प्रारब्ध

देह भोगितसे ॥ ७९ ॥ ऐसे श्रीगुरुसमर्थ म्हणता । बोलवेना राजाशी सवर्था ॥ परि अंतरी उद्विग्नता । बहुत चिंता जाहलीसे ॥ ८० ॥ कल्माण स्वामीसी युक्तीनें । येकीकडे पाचारून । प्रश्न करिता शिवाजीनें । सद्भने सांगितले ॥ ८१ ॥ ऐकोनि राजासी क्रोध चढला । म्हणे आणवा त्या शूद्राला । तोफेचे तोंडी द्यावयाला । आज्ञा केली दूतांते ॥ ८२ ॥ तेव्हां दीनदयाळ सद्गुरुनाथ । क्षमा दया ज्या आंगि विलसत । शपथ घालुनि राजयाते । वर्जिति त्वरित तत्क्षणि ॥८३॥ मग सामोपचारे त्या पाटिला आणोन । जमीन दिधली ती इनाम करून । ऐसे महाराज दयाघन । समर्थ पूर्ण रामदास ॥८४॥ आणीक गोष्टी चमत्कार । ऐका तुम्ही श्रोते सारे । कपिला षष्ठीचे पर्व थोर । आले साचार ते काळी ॥ ८५ ॥ परळीहुनी अकस्मात । माहुलीस आले समर्थ । पर्वकाळ जाणुनी चित्ते । स्नान करिती संगमी ॥ ८६ ॥ अवलोकिता ब्राह्मणानी । हर्ष बहुत जाहला मनीं । म्हणति स्वामिया आचमन करुनी । संकल्प श्रवणी ऐकावा ॥ ८७ ॥ अवश्य म्हणोनि सकळ द्विजाते । संकल्प ऐकिला सद्गुरुनाथे । विप्र मागति दक्षणेते ॥ पसरीत हस्त स्वामीपुढे ॥ ८८ ॥ तेव्हां दगड वेचूनि वाळवटातील । ब्राह्मणाचे हातावरी ठेविले । ब्रह्मवृंदे हास्य केले । फार वदले दुरोक्ती ॥ ८९ ॥ म्हणति राजगुरु हा समर्थ । जेथें तेथें किर्ति बहुत । ऐसे असता दगड हातात । काय व्यर्थ ठेविले ॥ ९० ॥ तस्मात थबाड संतपणा । द्रव्यलोभी दिसति जाणा । वल्गना करिति ऐसे नाना । खेद मना करुनि ॥ ९१ ॥ त्याग करोनि पाषाणाते । गेले आपुल्या सर्व घराते । भाविक येक होता तयाते । तेणे दगडाते ठेविले ॥ ९२ ॥ म्हणे साधुच्या हातीचा कंकर । आम्हासि कैचा मिळणार । पुजन करून देव्हारियावर । तेयेचि दरिद्र जाईल ॥ ९३ ॥ शाळग्रामा-तुल्य मानुनि । पदरी बांधिला प्रीति करुनि । जाउनि आपुल्या स्वसदनीं । दिधला नेऊन स्त्रीपाशीं ॥ ९४ ॥ तयेनें धुण्यांत घालुनि वसन । गंगेवरी आणी त्वरेनें । सोडून पाहाता पाषाण । जाहले सुवर्ण सर्वांचे

॥ ९५ ॥ तो पाणवठ्यावरील सकळ स्त्रिया । आल्या होत्या उदक भरावया । दगड सोन्याचा पाहुनिया । धांवत गेल्या घरासी ॥ ९६ ॥ आपआपुल्या पतीते । करितां जाल्या प्रश्नाते । म्हणती रामदासानें दगड तुम्हाते । दिधला तो कोठें हो ॥ ९७ ॥ कृष्णेवरी येक बाईनें । सुवर्णाचा दाविला पाषाण । दरिद्र तयाचें गेलें जाण । देणें देणें दगड तो ॥ ९८ ॥ ऐशा प्रकारें घरोघरीं । विचारिती पुरुषासी नारी । ब्राह्मण दचकले अंतरीं । पाडिले विचारीं सर्वत्र ॥ ९९ ॥ अदृष्टहीन ऐसे वदति । दगड टाकिला म्हणोनि सांगती । स्त्रिया तेव्हां कलह करिति । निखंदति पतीसी ॥ १०० ॥ रात्र दिवस न पडे चैन । घ्यावे म्हणति स्वामीचे दर्शन । परळीस गेले ब्राह्मण । सारे माहुलीचे मिळोन ॥ १ ॥ हास्य करोनि श्रीगुरुराये । वंदियले द्विजाचे पाय । तये काळि व्वलाहे । करद्वय जोडित पै ॥ २ ॥ पदर पसरोनि करुणा भाकिती । कृपा करावी ऐसे वदती । अपराधि म्हणोनि स्तवन करिती । दगड इछिती सुवर्णाचा ॥ ३ ॥ दीन दयाळ स्वामी समर्थ । प्रशासिले ब्राह्मणाते । भोजनासि घालोनि तयाते । सांगीतले सत्य ऐका ते ॥ ४ ॥ म्हणति मार्गी जाता उर्वेसि तिरीं । दगड घ्यावा येकयेक निर्धारी । मुठींत मावेल तितुका करी । घेता साचारी सुवर्ण होईल ॥ ५ ॥ अति स्वार्थ धरिता मना । शब्द नसे आम्हासि जाणा । ऐसे सुचवोनी त्या ब्राह्मणा । हर्ष मना बहु तया ॥ ६ ॥ मग आज्ञे-प्रमाणे त्या द्विजानीं । पाषाण घेताचि उचलोनी । कांचन जाहले ततक्षणि । अतःकर्णि आनंदले ॥ ७ ॥ ऐसा महाराज सद्गुरूनाथ । कर्तुत्व जयाचे अघटित । पूर्ण होती मनोरथ । भाव सत्य धरिता पै ॥ ८ ॥ असो कोणे येके समई श्रीरामदास । जात जाहले आळंदीस । कल्याणादि करुनि शिष्य । समागमाशी असती पै ॥ ९ ॥ ज्ञानेश्वराची समाधी वंदून । चिंचवडासी गेले जाण । गाणपत्य तेथील पूर्ण । भगवद्भक्त जननी शिमते ॥ ११० ॥ रामदास स्वामीसी तेणे पाहून । करिते जाहले

साष्टांग नमन । मोरया देव नामाभिधान । तयाचे जाण परीयेसा ॥११॥ परस्परे आलिंगन घडून । संवाद जाहला आनंदाने । आत्मस्थिती बोलता खूण । अनिर्वचन सुख ते ॥ १२ ॥ असो दीनत्रय राहोनि तेथे । येते जाले परीळेते । जेजोरी क्षेत्र मार्गाते । दोखियेले समर्थ स्वामिंनि ॥ १३ ॥ पर्वत करिता अवलोकन । मनात आले स्वामीच्या जाण । घेवोनीया देवदर्शन । मग निघोनि पुढे जावे पै ॥ १४ ॥ एतद्विषई कल्याणाते । सुचविते जाले श्री समर्थ । तो समजले म्हाळसाकांत । गडबड बहुत जाहली देवा ॥ १५ ॥ शिवाजी राजियाचे रूप धरून । निळ्या घोड्यावरि बैसले जाण । श्री खंडोबा आले निघोन । सामोरे पूर्ण रामदासासी ॥ १६ ॥ शिवाजीस विचारिता स्वामी । म्हणति आलो होतो पुरंधरासि आम्ही । त्वरा बहुत अंतर्यामि । पुण्यग्रामी जाणे आम्हा ॥ १७ ॥ निरूर्डीचे काम दर्शऊन । उभाउभी नमन करून । उलंघिला मार्ग जाण । किंचित त्वरेने घोडासा ॥ १८ ॥ रामदास स्वामी पहात आहेत । तो तेथेचि तात्काळ जाहले गुप्त । मग समजले सद्गुरुनाथ । म्हाळसाकांत आडवे आले ॥ १९ ॥ आनंदे नाचत गजरेसी । रामदास गेले देवापाशी । तये समई खंडोबासी । आरती स्वमुखे शिकले स्वामींनि ॥ १२० ॥ नंतर निघोन सज्जनगडास । येते जाहले स्वस्थानास । पुढे कथन वर्तन कैसे । तेही विशेष अवधारा ॥ २१ ॥ कोणेयके समई परळीहून । चाफळासि निघाले समर्थ जाण । बरोबर शिष्य कल्याण । नामस्मरण होतसे पै ॥ २२ ॥ पाली जवळी स्वामी येता । यात्रा देखत्ति देखिली तत्वता । पौषमास तो असे सर्वथा । म्हाळसाकांत स्मरति जन ॥२३॥ तयात शाही परम आग्रही । तेही आले होते पै । वाद घालीत येके ठाई । बैसले नाहि विवेक ज्या ॥ २४ ॥ फड मांडुनि चार दिवस । तट घालोनि करिति उपास । चढ टाकिति येकमेकास । कोणी कोणास नाटोपति ॥ २५ ॥ तशात महाराज रामदास । मार्गे चालता देखिले तयास । सांगितले कल्याणास । करी प्रश्नास तू तयासि ॥ २६ ॥

विचारिता कल्याणाने । निवेदिले सविस्तर जाण । रामदास स्वामींनी करिता श्रवण । राहिले दयाघन उभे तेथें ॥ २७ ॥ शाहीरासी म्हणती श्रीसमर्थ । चड टाकितो त्याचा उतार या आम्हास । नाहीतरी उठा त्वरित । ठेउनि निश्चीत कळगी तुरा ॥ २८ ॥ ऐसे सुचउनि श्रीगुरुराये । अभंग केला तेथेचि पाहे । पिंड ब्रह्मांड ऐक्य होये । द्वा/ अनय या माजी ॥ २९ ॥

॥ डफगाणे ॥

किती पृथ्वीचे वजन । किति आगोल्या गगन । सांग सिंधूचे वजन। किती टांक ॥१॥ किती आकाशी वारा ।किती पर्जन्याच्या धारा । गण भुमिवरच्या तुरा । संख्या सांग ॥ २ ॥ वायुसरसे उडति । सांग अणुरेणु किति । लक्ष चौरियाऐंसी उत्पती । रोम कीतीते ॥ ३ ॥ नद्या सरिताचि। वाळु । सप्तसागरी वाळु । किती मोकळा वरळु । सांग मज ॥ ४ ॥ बिजवडि आणि पिपाळि । किति आहे भूमंडाळि । आठरा धान्याचि मोकळि । संख्या सांग ॥ ५ ॥ आठरा वनस्पति । भूमंडळी पाने कीति । फुले फळे मज प्रति । सांग संख्या ॥ ६ ॥ जे जे पुसीले तुज । ते ते सांग मज । अनंत ब्रह्मांड मरिजे । किति जाहली ॥ ७ ॥ सांग माझे डफगाणे । नाही तरी सोड जाणपण । देह बुध्दीचे लक्षण । सांडावेगि ॥ ८ ॥ श्रोते व्हावे सावचित । आता सागतो गणित । सर्व अगणित । सत्य जाणा ॥ ९ ॥ रामदासाचे विनोद । सोडा अहंतेचि बिरुदे । मग सुख स्वानंदे । सुखी राहा ॥ १० ॥ इति स्वामींचे डफगाणे ॥ ५ ॥

डफगाण्याचे चालीवरी । काव्य करिताचि निर्वारि । शाहीर दचकले अंतरी । उत्तर वैखरि न फरवे ॥ १३० ॥ मग म्लानवदन होऊन । घातिले साष्टांग स्वामिसि नमन । कळगेतुरा समर्पून । गेले स्थानासि निघोनि ॥ ३१ ॥ सकळ कळा ज्याचे आंगि । तो हा अवतार मानवी जगी । तयापुढे अज्ञान विमार्गी । विषय संगी बोल-

ती कीर्तीते ॥ ३२ ॥ स्वामी कृपेचे सागर । करोनि तयाचा उधार । येते जाहले निर्धार । चाफळी रघुवीर देखावया ॥ ३३ ॥ ऐशा लीला अनेक असती । लिहिता न पुरे ग्रंथमती । उद्धरिले जीव नाना जगती । बहु युक्ति करुनी ॥ ३४ ॥ असो शिवाजीराजा सत्‌शिष्य । तयावरि कृपा स्वामीची विशेष । अंतकाळ स्मरणास । दिधले तयास श्री समर्थे ॥ ३५ ॥ पारळीसी येता राजा दर्शना । सुचविले स्वामिनी तयाशि जाणा । म्हणती बंदोबस्त करावा अष्टप्रधान । व्हावी आज्ञा प्रतिनिधींशी ॥ ३६ ॥ पध्यतिवार यथोक्त । योजोनि द्यावी कामे तयाते । अंती असावे स्मरणाते । आत्मपदाते विनटावया ॥ ३७ ॥ ऐसे सांगता रामदास स्वामिनी । शिवाजी राजा समजला मनी । साष्टांगेसी नमन करोनी । अंतःकर्णी खुणेशी पावला ॥ ३८ ॥ आज्ञा घेवोनी रायगडासी । निघोनि गेला ते वेळेसी । निर्वाण समय स्वमातेसी । येऊतेसि सुचविला ॥ ३९ ॥ ज्येष्ठ पुत्रासि पाचारून । योजना केली पनाळ्यासी जाण । प्रधानादिका बोलाऊन । बंदोबस्त पूर्ण करविला ॥ १४० ॥ शालि वाहन शके सोळाशे । आणीक वरुते दोन वर्षे । रौद्रनाम संवत्सरास । चैत्रमास पौर्णिमा तिथी ॥ ४१ ॥ रविवारी माध्यानकाळी । शिवाजी राजाने जडतनु ठेविली । आत्म जोती मिळोन गेली । पिटली टाळी साधु वृंदी ॥ ४२ ॥ तये काळी स्वामीसी । क्लेश जाहला फार मानसी । भक्तवत्छल दयाराशी । काय तयासी वर्णु ते ॥ ४३ ॥ कृपेचे लक्षण कैसे ते । सांगितले ऐका तुम्ही श्रोते । येकाग्र करुनि स्थीर चित्ते । परिसा समस्त संक्षेप ते ॥ ४३ ॥ रामदासस्वामीचे मातेने । नवस केला देवीशी जाण । सुवर्णाचे पुष्प करून । करावा समर्पण मातापुरि ॥ ४४ ॥ रायगडी तीच शक्ति । स्थापिले ऐसे जाणोनि चित्ती । स्वामी गेले दर्शना प्रति । अर्पावया प्रिति नवसाते ॥ ४५ ॥ तयेकाळी जवाहीर । भवानीवरी असे फार । पुष्प वाहवया निर्धार । जागा साचार नसे कोठे ॥ ४६ ॥ मग बिजवरा अंबेने । काढुनि टाकिला स्वकरे जाण । रामदास स्वामीचे हातीचे सुमन । घ्यावय

देवीने ते काढिं ॥ ४७ ॥ ते दिवसा पासोनि तत्वता । बिजवरा नाही देवी वरुता । पुष्पे वाहती तेथे सर्वथा । आचापी पाहाता ते स्थळी ॥४८॥ असो अंबिकेने प्रसन्न होऊन । माग म्हणता स्वामीसी जाण । शिवाजीचे कर कल्याण । हेचि पूर्ण मागीतले ॥ ४९ ॥ येवढा प्रेमा सत्‌शिष्याचा । भक्तवत्सल सद्गुरुराचा । शेषादिकाचि शिणली वाचा । प्रताप तयाचा वर्णिता पै ॥ १५० ॥ असंख्य प्राणी उद्धरून । समाधिस्त जाहले स्वामी जाण । ते करिता श्रोतीये श्रवण । कामनापूर्ण सकळ होतसे पै ॥५१॥ कृष्णेपासूनि पंचक्रोश । सज्जनगड पश्चमेस । सह्याद्रिचा विभाग विलसे । पर्वत असे प्रसिद्ध तो ॥ ५२ ॥ तयेस्थळीं श्रीरामदास । विसर्जन केले जड देहास । तयांतील सारांश । अर्थ विशेष सांगु पै ॥ ५३ ॥ रामायण शिवोदेश शिवगितायां ॥ ६ ॥ तीर्थे चांडाळ रोहेना । ये दिवानष्टचेतनः । परित्यज्यं देहमिमं ज्ञानदेव विमुच्यते ॥ १ ॥ वानरअंश सकळ सत । रामदास अवतार श्रीहनुमंत । समाधि आसन पर्वत । श्रेष्ठ सर्वांत म्हणुनि ॥ ५४ ॥ उंचस्थानी गुरु-बैसती । खाली असता शिष्य शोभती । याळागी घडली सहजी युक्ति । समाधि पर्वति ध्यावया ॥ ५५ ॥ नातरि ते परळी । परात्पर जाणिजे मळीं । येताद्विषयी सहस्त्र दळी । वस्ती केली गुरुराये ॥ ५६ ॥ अज्ञानासि शास्त्र विरुद्ध । वेद गर्जति प्रसिद्ध । ज्ञानीयासी सर्व शुद्ध । देवसित्थ पर्वत म्हणोनि ॥ ५७ ॥ वेदांतमते सकळ ब्रह्म । परि ते ठाउके साधुसि वर्म । इतर जीवा पडला भ्रम । नेणूनि धर्म स्वानुभव ॥ ५८ ॥ असो समाधी काळीं लीला घडली । ऐकावे ते श्रोतीये सकळी । साधुवृंदे सकळ पातली । निर्याण वेळी स्वामीचे ॥ ५९ ॥ कल्याणादि शिष्य सारे । जवळि कीर्तन होतसे गजर । रामदासस्वामी दिगंबर । होवो निर्भर बैसले ॥ १६० ॥ श्रीरामध्यानी लीन होता । क्लेश वाटते जाहले समस्ता । सगूण मूर्ति जातसे आतां । काय सर्वथा करणे मग ॥ ६१ ॥ सद्गद होऊनि कल्याण । हात जोडिले म्लान वदने । नेत्री वाहतसे जीवन । अवलोकन केले ते ॥ ६२ ॥ म्हणति जाणे येणे सुमळ

जनक जननि कुळदैवत । उपासना श्री रघुनाथ । संतश्रोते नमियले ॥ ४ ॥ भक्त मंजरि हे माळिका । प्रेमरज्जु साजिरा निका ॥ वाग् इंद्रियें गुंफोनि देखा । वैकुंठ नायका अर्पितसे ॥ ५ ॥ अवधान देता एकाग्रवृत्ति । तात्काळ वरि सायोज्य मुक्ति ॥ श्रीकृष्ण जय चरित्राप्रति । यथामति वर्णिजेल ॥ ६ ॥ भक्ति माहात्म अनुभव घेणें । यदर्थि स्वये नारायण ॥ संत स्वरूपा धारण करून । जगदोध्धारण करितसे ॥ ७ ॥ नातरि देव आणि भक्त । अभेद स्वरूप ते निश्चित । परि लीला प्रेम अद्भुत । गुरुशिष्य होत पैं ॥ ८ ॥ ज्ञानेश्वर नामे श्री भगवान् । अवतार घेतला पृथ्वी जाण अच्यार्य उपासना करून कथन । भक्ति ज्ञान स्थापियेले ॥ ९ ॥ पुन्हा होउनि येकनाथ । श्रीगुरु सेवा केली बहुत । जनार्दन स्वामि माहासमर्थ । सद्गुरुनाथ जयाचा ॥ १० ॥ दत्तात्रयाचि भेटि होता । प्रसाद लाधला पूर्ण तत्वता ॥ येकादश स्कंद भागवता । टीका सर्वथा जाहालीते ॥११॥ शुद्ध भाव पाहोनि जाण । पाणि वाहिले श्रीकृष्णानें ॥ उगाळुनि दावें चंदन । करिता देवार्चन येकनाथा ॥ १२ ॥ इत्यादिक सकळ कथा । ठाउक्या आहेति समस्ता । पुढें आख्यान वर्णिजे आता । साकल्य श्रोता ते परिसावें ॥ १३ ॥ प्रतिष्ठान क्षेत्रि नाथजिनि । अवतारलेला समाप्त करूनि । वास केला निर्गुण भूवनि । पारिमनि इच्छा राहिली ॥ १४ ॥ श्रीकृष्णासि जाऊनि शरण । प्रेमानुभाव घ्यावा पूर्ण । सद्गुरुभक्ति परम गहन । करावि जाण पुनः पुना ॥ १५ ॥ येतद्विषयी श्री येकनाथ । अवतार घेतला भूमंडळात । तेचि ऐका श्रोते मात । सावध चित्ते करूनि ॥ १६ ॥ जेवि स्त्री पुरुष आत्मा येक । परि न घडे व कळी सुख । परस्परें मिळता देख । घडे निके समाधान ॥१७॥ तैसेचि येथें पाहाता काहि । येकनाथ कृष्णासि द्वैत नाहि । परीभक्ति चिहि नवाई । होणे पाहिपै गुरुशिष्य ॥ १८॥ असो नाथजी आणि श्रीकृष्ण । अवतार जाले कोठे जाण । तेचि होईल आता कथन । अनुक्रमें पूर्ण यथोक्त ॥१९॥ अदौ श्री गुरुकृष्ण स्वामि । जनन तयाचे कोणते भुमि । तेचि

श्रवण करा तुम्हि । अंतरयामि प्रेमेसि ॥ २० ॥ कृष्णातिरि वाड्डक्षेत्र । रामलिंग स्थान जेथें पवित्र । पुराण प्रसिद्द निवति नेत्र । दर्शन मात्रें करूनि ॥ २१ ॥ तये स्थाळि ग्राम लेखक । यजुर्वेदि पुण्य श्लोक । तपोनिष्ठ पूर्ण भाउक । वेद पाठक विप्रेंद्र ॥ २२ ॥ तयाचिये उदरि जाण । कृष्ण स्वामिसि जाहाले जनन । प्रताप सूर्य दैदिप्य-मान । तेज ज्ञान जयाचे ॥ २३ ॥ अजानबाहु आकर्ण दृष्टि । सुहास्य वदन मूर्ति गोमटी । लावण्य खाणि उपमा श्रृष्टि । नसे पृष्टि पृष्यांचे ॥ २४ ॥ दिवसो दिवस बाळलिळा । विचित्र करितो घनसावळा । सुख होतसे पाहाता डोळा । भोगिति सोहळा मायबाप ॥ २५ ॥ सातवे वर्षि मौजि बंधन । ब्रह्मचर्य वरिले श्रीकृष्णे । वैराग्य आंगि बाणले पूर्ण । करिति भ्रमण तिर्थांतरा ॥२६॥ योगा माजि बहु प्रीति । शिव उपासना सहज स्थिति । माहादेव क्षेत्र देखोनि चिति । जाहाली वृत्ति आनंदमय ॥ २७ ॥ शांतलिंग नामे करून । जंगम स्वरूप गिरिजारमण । प्रत्यक्षता प्रगटि करणे । दिधले दर्शन श्रीकृष्णासि ॥ २८ ॥ रुद्राक्ष भूपणे जटाभार । विभूति लेपन व्याघ्रांबर । शंखपाणि कौपिन सुंदर । ज्ञानविच्यार त्रिनैन तो ॥ २९ ॥ भवमान्य उत्तम कांति । देवालयांत पाहिली मूर्ति । दर्शन होता श्रीकृष्ण वृत्ति । जहाली चिति तन्मयता ॥ ३० ॥ अलिंगन देता परस्परे । येकत्र जाहाले हरिहर । जेवि ककु प्रति कृष्णानीर । प्रितिसंगम साच्यार तयापरि ॥ ३१ ॥ शांतलिंग सद्गुरु-नाथ । कृष्णें नमन केलें.तयातें । प्रश्न अदरिला अनुमहार्थ । जोडुनि हात अनन्य ॥ ३२ ॥ मग उपदेश करिता त्याचि क्षणांत । श्रीकृष्ण जाहले सामधिस्त । मंत्र सांगुनि निजकर्णातें । सस्वरूपातें मेळविलें ॥३३॥ दिपी दीप येकवटता । अद्वय प्रकाश सहजि आइता । येकात्मता पावलिसता । सहजी समता अद्वैत ते ॥ ३४ ॥ दश द्रष्टा आणि दर्शन । विरूनि गेली त्रिपुटि जाण । अंतर्बाह्य सोहं स्फुर्ण । उघडले नैन ज्ञानदृष्टि ॥ ३५ ॥ व्यष्टि समष्टि मायाब्रह्म । अन्वय व्यतिरेक

सरला भ्रम । आपला आपण आत्माराम । लाधले प्रेम श्रीगुरुकृपें ॥३६॥ ऐसा होता स्वस्वरूपानुभव । तन्मय जाहले श्रीकृष्ण देव । सद्गुरुपदि जडला भाव । जाहाले सेवे तत्पर ते ॥३७॥ मग काहि काळें करून । निर्याण आरंभिले शांतलिंगानें । भोवते मिळाले शिष्यगण । जाहाले कारण ते ऐका ॥ ३८ ॥ म्हणति उदईक प्रदोषासि । जाणे आम्हा कैलासि । अवतार लीळा समाप्तिसि । जड तनुसि विसर्जितो ॥ ३९ ॥ ऐसे सांगोनि सर्वांप्रति । शांत शिष्यासि आज्ञा करिति । काशिहुनि सत्वर गति । अस्तमानाप्रति यावया ॥ ४० ॥ यात्रा गाहाण ब्राह्मणापासि । लेहुनी दिधले पत्रिकेसि । दोन शत रुपये देउनि तयासि । आणावे पत्रासि सोडवुनि ॥ ४१ ॥ ऐशा प्रकारे आज्ञापिता । संकट पडले शिष्या समस्ता । श्रीकृष्ण स्वामिकडे पाहावा। जोडुनि हाता उभे ठाकले ॥ ४२ ॥ आज्ञा वंदुनि सद्गुरुचरणि । मस्तक ठेविला प्रीति करूनि । पत्रिका द्रव्य घेउनि । केलि करणि अभिनव ॥ ४३ ॥ माहादेव क्षेत्रि विस्तिर्ण तळे । यंत्राकार परम सखोळ । अष्टौ दिशा दिग्पाळ । स्थापन पूर्विल जेथें पै ॥ ४४ ॥ ईशानेसि ईश्वर दैवत । हें वर्म जाणिनले कृष्णनाथें । शांतलिंग स्मरूनि चित्ते । शिरले डोहात त्या स्थानि ॥ ४५ ॥ ब्रम्हवृंदें पाहुनि ऐसे । दुरोक्ति बोलति कृष्णस्वामिस । म्हणति मुकला प्राणास । येईल गुरूस राग म्हणुनि ॥ ४६ ॥ ईकडे कृष्णे काय केले । तळ्यात शिरोनि काशित निघाले । श्रीमनकर्णिकेचे घाटि प्रगटले। तेचि वेळे क्षणामाजि ॥ ४७ ॥ दामाजिचि रसद जैसि । पोहचवि यवनासि ऋषिकेशि । तयापरि विप्रसदनासि । ज्ञानराशि पोहचले ॥ ४८ ॥ पत्रिका द्रव्य अर्पोनि । पावति मागति कैवल्यदानि । मिति पाहाता विप्रनयनि । आश्चर्य मानि मनांत ॥ ४९ ॥ तीन महिने चालता पंथ । काशि क्षेत्रासि मानव येत । तेरिख दिसति आजिचि निश्चित । काय मात नकळेहि ॥ ५० ॥ श्रीकृष्ण पदि ठेउनि डोई । विप्रे प्रश्न केला पाहि । बोळल सांगा मज काहि । वृत्ति पाई लीन करा ॥ ५१ ॥ ऐसे वदताचि तो

ब्राह्मण । कृपादृष्टि केला पावन । आपण काशित बुडि माहन । निघाले जाण माहादेवी ॥ ५२ ॥ कृष्ण तळ्यांत पूर्ववत । प्रवेश केला तेथेचि त्वरित । बाहिर आले श्रीकृष्णनाथ । अश्चिर्य मानित सर्वत्र ॥ ५३ ॥ शांतर्लिंग स्वामिजवळी । येवोनि पत्रिका समर्पिली । संतोषली गुरु माउली । केलि साउलि कृपेचि ॥ ५४ ॥ कृतार्थ जाहालासि ऐसे वदोन । सांगितले पुढील कारण । येकनाथ पुन्हां जन्मले जाण । उपदेश करणे तयासि ॥ ५५ ॥ श्री शाते पूर्ण प्रसाद । कृष्ण स्वामिसि केला श्रुत्य । मिळाले सिद्ध सनकादिक॥५६॥ तो सोहळा अनुपम्य । विमानि कोंदिले असे व्योम । पुष्पवृष्टि केली प्रेमें । अमरोत्तमें ते कालि ॥ ५७ ॥ जाहाला वाद्याचा येकचि गजर । शिवगण करिति जय जय कार । पुजेसि पातले रमावर । मुख्य देवेंद्र अदि करूनि ॥ ५८ ॥ असो समस्त शिष्य माहादेवी । समाधि रचिली अपूर्व बरवी । श्रीकृष्ण स्वामि महानुभवि । तारिति भवि सर्वांते ॥ ५९ ॥ योगाभ्यासि सदा रत । सद्गुरुचरणि रंगले चित्त । जगदाभास कैचा तेथें । स्वरूप शांत सबाह्य जया ॥ ६० ॥ समाधि पूजन करावया । श्रीकृष्ण राहिले तया ठाया । नवविध भजनि रंगलि काया । सद्गुरुपाया सदा रत ॥ ६१ ॥ जे जे प्राणि शरण येति । कृपेनें तया उध्दरति । अनाधिकारि मरले शाति । पावन होति दर्शनें ॥ ६२ ॥ काहि दिवसानंतर स्वामि । येते जाहले वाड्ग्रामि । वास्तव्य करूनि स्वआश्रमि । भजनप्रेमि निमग्न ॥ ६३ ॥ कुकाजि पाटील वडगांविचा । योगभ्रष्ट तो जन्मांतरिचा । अध्यात्म विषई छंद जयाचा । नेम जयाचा अखंड ॥ ६४ ॥ पारि श्रीगुरु कृपेवीण । सहसा न घडे समाधान । कुळ दैवत प्राचीन । ज्योतिर्लिंग तयानें अराधिला ॥ ६५ ॥ दक्षण केदार रत्नागिरि । तयाचि धरिली जेणे वारि । अनुताप जाहला अंतारे । आत्मशिखरी विनटावया ॥ ६६ ॥ येकादश यात्रा करिता जाण । कृपा आलि देवासि पूर्ण । भेट दिधली कुकर्जा लागुन । ज्योतिर्लींगाने प्रत्यक्ष ॥ ६७ ॥ सांगितले मुख्य कारण । कृष्ण स्वामिसि

जावे शरण । तेथें होईल आत्मज्ञान । समाधान पावसि ॥ ६८ ॥ ऐसे बोलोनि खळेश्वर । अंतर्ध्यान पावले निर्धार । कुकुजि पाटिल तदनंतर। आले सत्वर वाह्यासि ॥ ६९ ॥ कृष्णास्वामिसि तनुमनधन । जीवित केले समग्र अर्पण । आत्मानुभव लाधला पूर्ण । अज्ञान दैन गेले पै ॥७०॥ गुरुवार येता आनंदेसि । भजन करित यावे वाहुक्षेत्रासि । पुज्योपचार द्रव्य-राशि । सद्गुरुसि अर्पितसे ॥ ७२ ॥ बहुत दिवस ऐसे अर्चण । कुकजी पाटिले केले तयाने । सेवटि आले वार्धिक्यपण । शरिर क्षिण जाले असे ॥ ७३ ॥ तये काळि नेम राहाता । वियोग जाहाला श्रीगुरुनाथा । पाटिला चैन न पडे चित्ता । युगासमता घटिकाते ॥ ७४ ॥ पुत्राहाति विनंति । पत्र लिहिले विज्ञाप्ति । पाहाता निघावें सत्वर गति । ऐसे युक्ति लेखन पै ॥७५॥ शुद्ध भक्ति ते रुक्मीणि । भाव तो चि सुदेव जनि। पत्रिका देखताचि निज नैनि । श्रीकृष्णजी मनि समजले ॥ ७६ ॥ रामलिंगासि करूनि नमन । वटग्रामासि आले जाण । कुकजी पाटील आनंदाने । केले अर्चन तेणे पै ॥ ७७ ॥ म्लानवदन जोडुनि कर । पसरिले जेणे स्वामिसि पदर । पाई ठेउनि दृढ शरीर । नेत्राने श्रवतसे ॥ ७८ ॥ म्हणे माहराज अंतकालि । उपेक्षु नको गुरुमाउली । मज अनाथा करि साउली । राहावे स्थळि या ग्रामि ॥ ७९ ॥ जाणुनि अंतर सत्शीष्याचे । कळवळले मन कृष्णस्वामिचे । वचन दिधले तयासि साचे । राहिलो याचे म्हणति तया ॥ ८० ॥ शिष्य भक्ति कृष्णस्वामि । वास्तव्य केले वट ग्रामि । कुकजी पाटील शेवाधर्मि । तिष्ठति नेमि अहर्निशि ॥ ८१ ॥ भाविक ब्राह्मण तेथिल ज्योतिषी । नवलपुण्या तयाचि राशि । प्रत्यहि जावे त्याचे गृहासि । नैवेद्यासि श्रीकृष्णे ॥ ८२ ॥ योगाभ्यासि सदानिमग्न । ज्ञानेश्वरी करीति पठण ॥ पंढरिसि जावे प्रिति करून । वैकुंठ जीवन भेटावया ॥ ८४ ॥ ऐशा रिति वटग्रामि । ब्रह्मचर्य वर्तति धर्मि ॥ पवित्र स्थान धन्यभूमि । वास नेहमी कृष्ण स्वामिचा ॥८५॥ कुकजी पाटील पुण्यश्लोक । भक्ति ज्याचि अलौकिक ।

वश्य केला गोपिनायक । भव दुःख कैचे तया ॥ ८६ ॥ मग काहि एक दिवसानि ॥ कुकजि पावला निर्गुण सदनीं । तयाचे पुत्र सुलक्षणि । पित्याहुनि अधिक ते ॥८७॥ जेवि कमाल संत कबीराचा । जनकाहुनि आगळा साचा । लोकत्रै प्रताप जयाचा । संत वाचा गाति पै ॥८८॥ तैसेचि जाणा कुकजीसुत । सद्गुरु चरणि प्रेम अद्भुत ॥ बापासम आचरति वृत्त । अनन्यूत श्रीकृष्णपदीं ॥ ८९ ॥ येक विध भक्ति जाउनि शरण । साधिले जेणे निजात्म ज्ञान । दास्यत्व करिति निशिदिन । नाहि चिंतन दुजे पै ॥ ९० ॥ सर्वकाळी स्वामिजवळि । तिष्ठति जोडुनि बद्धांजुळि ॥ जे जे पाहिजे त्या त्या वेळी । देति सकळ पदार्थासि ॥९१॥ परिसद्गुरु श्रीकृष्ण । इच्छिति जावया ग्राम सोडुन ॥ तये काळि सा-शिष्याने । योजिनले जाण गुंतावया ॥ ९२ ॥ म्हणाति स्वामिया यकटे आपण । गुरुमाता असावि अह्मालागुन । निजदासाचा मनोरथ पूर्ण । सद्गुरूनें पूर्ण करावा ॥ ९३ ॥ ऐशिया परि करुणा भाकिती । वारंवार प्रार्थना करिति । परि श्रीकृष्ण निवारिति । सुता म्हणति कुकजिच्या ॥९४॥ म्हणती गृहस्ताश्रमि कैचे सुख । न पडे स्वस्त निमिष्य येक । माया जाळि गुंतले लोक । नाहि बीवे स्वरूपाचा ॥ ९५ ॥ स्त्रि हे प्रत्यक्ष पाहाता बेडि । दुर्लभ आयुष्य व्यर्थ दवडि । रात्रं दिवस सदा वोढि । नाहि घडि विश्रांति ॥ ९६ ॥ अनिवार काम दुर्धर । मोहित जाहले सकळ नर । जन्म मृत्यु वेरझार । कदा संसार चुकेना ॥ ९७ ॥ असो जग प्रवृत्तिसि । नाहि करणे अम्हा त्यासि । सांगति ऐसें कुकजी सुतासि । ज्ञानराशि श्रीकृष्ण ॥ ९८ ॥ तये काळीं अकस्मात । वस्तिसि आला विप्र पांथस्त । वटग्रामि कुटुंबसहित । तृतीय प्रहरात सहजि तो ॥ ९९ ॥ कुकजी पाटिल तयाचे कुमर । प्रश्न करिति तया निर्धार । ग्राम तुमचा कोण साचार । कंम्या उपपर दिसता हे ॥ १०० ॥ लग्न कर्तव्य असेल जरि । वर योजना आहे मरी । द्रव्यईच्छा काहि अंतरि । असेल तरि सांगावे ॥ १ ॥ बोहेकर वृतिवंत । कुळकर्णि श्रीकृष्ण नाथ । यजुर्वेद त्याचा निश्चित ।

गोत्र विलसत काश्यप ते ॥ २ ॥ गुरुस्थान आमुचे जाणा। ऐसे मुचविता त्या ब्राह्मणा। उत्पन्न जहाली वीलक्षण कल्पना। समूळ जाणा श्रोतिते ॥ ३ ॥ अर्थातुर जाहले मन। फरितो म्हणे कन्या लग्न। पाच शत द्रव्य देतो जाण। कन्या देईन तव स्वामिते ॥ ४ ॥ ऐसे विप्र तो बोलता। आनंद जाहला कुकजी सुता। द्रव्य देउनि तया तत्वता। केले घटितार्था विवाहासि ॥ ५ ॥ श्रीकृष्णस्वामिसि अग्रह करुनि। पदर पसारिला समस्तानि। मीठि घालुनि दृढचरणि। बळत्कार नेहुनि पै केला ॥ ६ ॥ उत्तम दिवस पाहोनि तिथी। मंडप घातला परम युक्ति। लग्न सोहळा शिष्य भक्ति। उत्कृष्ट जगति पै जाहला ॥ ७ ॥ कृष्णपानि जन्मांतरिचि। योगभ्रष्ट ती असे साचि। संकेत मार्गे तये सतिचि। सांगु पूर्वीचि सकळ कथा ॥ ८ ॥ येकनाथ गृहि ज्यामतिसि। नापीक येतसे जो नेमेसि। तयाचि कन्या पुण्यराशि। भजन विलासि निमग्न ते ॥ ९ ॥ म्हणे नोवरा देवाचि करीन। दुराग्रह ऐसा धरिला पूर्ण। षण्मास केलि उपोषणे। भक्षुनि पर्णे अकस्मात ॥ ११० ॥ तये काळि श्री भगवान। दिधले तयेसि रात्रौ स्वप्न। म्हणे मी श्रीखंड या नामे कृष्ण। वाहातसे जीवन नाथगृहि॥ ११॥ मग ती पानवध्यासि येवोनि बाई। श्रीकृष्णपदि ठेउनि डोई। संकल्प होता जो का ह्रदई। तोचि पाई निवेदिला ॥१२॥ द्वापारिचि चंद्रावळि। भोगिला जिने वनमाळि ॥ चतुर्युगिच्या जन्मावळि। वर्णिता भाळि लावेल कथा ॥ १३ ॥ असो माहाराज म्हणति राहा युगिच। गुप्त रूपी मि असे साच। फळ हे प्राप्त अनुष्ठानाचे॥ १४ ॥ ऐसे सांगता तपने। आयुष्य सारिले श्रीकृष्ण ध्याने। मागुति केला जन्म धारण। स्वज्ञातीत पूर्ण नाविक गृहि ॥ १५ ॥ तो हा योग सिद्धिसि गेला। माळ घातलि कृष्ण स्वामिला। पुण्योदये बोध आला। संगम जाहला तो ऐका ॥ १६ ॥ कुटुंब घेवोनि तो कंन्यापुत्र। वारिक गेला होता तो यात्रे। तैथे मूळही पुण्य पवित्र। चुकालि स्वतंत्र समोच्चई ॥ १७ ॥ अकस्मात्र गंगातिरि। विप्र पाहुनि लहान कुमारि। घरासि आणुनि

तये झडकरि । समजाविले वैखरी रूदन करिता ॥ १८ ॥ कन्ये सारिखे पालन करून । मर्यादेने ठेविलि जाण । शोध करिता बहु ठीकाण । मायबाप पूर्ण न उमगति ॥ १९ ॥ नंतर द्विज माहादेवासि । कुटुंब सहित आला यात्रेसि । तेथोनि येता मार्गासि । लागले वस्तिसि वटग्राम ॥ १२० ॥ पुढे विचार ऐसा झाला । ती मूल दिधली कृष्ण स्वामिला । विल संमंध सहजि घडला। पाहाता मला ऋणानबंध ॥ २१ ॥ सवेचि दोन संवत्सरानि । ऋतुस्नात जाहलि कृष्णपत्नी । सोहळा केला शिष्यवर्गानि । भक्ति करूनि सर्वत्रे ॥२२॥ षण्मासपर्यंत तये सतिने । भोगिला स्वामि सचिद्घन । संकल्प गेला सिद्धिसि पूर्ण । कारण जाहाले ते ऐका ॥ २३ ॥ सत्वशुद्ध नापिक जो का पिता । विरक्त असे तो सर्वथा । हिंडत हिंडत आला तीर्था । कृष्णासरिता स्नान करावया ॥२४॥ करवीर क्षेत्र रत्नागिरी । यात्रा करूनि सांग वारि । वस्तिसि आला दोन प्रहरि। वट ग्राम नगरि सहज तो ॥ २५ ॥ तव ते कृष्णभार्या उदक आणावयासि । जाता पाहिले तेणे दृष्टिसि । उचंबळला मोह मानसि । धरिलि पोटसि बापाने ॥२६॥ तये काळीं सर्वजन । पुशिति तया वर्तमान । आलासि कोठिल येथे कोण । बाई जाण गुरूपत्नि ॥ २८ ॥ ऐकोनि नाहावी विस्मय पावला । म्हणे ईने देव कोण पुजिला ॥ समूळवृत्तांत सांगितला । नमस्कार केला कन्येसि ॥ २९ ॥ कृष्णस्वामिसि निरउनि लेक । स्वदेशा गेला तो नापीक । खळ चांडाळ जे निंदक । करिती सकळ वल्गना ॥ १३० ॥ शिशुपाल निंदा करि जैसा । मतिमंद समोच्चय मिळाला तैसा । दुरोक्ति बोलति योगेशा । श्रीकृष्ण परेशा स्वामिते ॥ ३१ ॥ माहाराज निवात स्वस्थ मने । स्वस्वरूपि ज्या अनुसंधाने । पद्म पत्र जाळि जाण । अलिप्त पूर्ण तयापरि ॥ ३२ ॥ धिल्लरोदाकि बिंबता सूर्य । पवित्राचि असे तो निर्धार । ना तरि शुद्ध सदागाय । अमंगळ होय केवि ते ॥ ३३ ॥ कींबहुना ते गंगाजळ । अखंडित वाहे निर्मळ । स्नान करीत खळचांडाळ । नाहि विटाळ तीर्थासि ॥ ३४ ॥ अग्निवायु आणि

मक्षिका । धन धान्य पंथ नौका । तैसाचि पूर्ण योगिनिका । शुचिर्भूत देखा सर्वदाहि ॥ ३५ ॥ सदा स्वरूपि जो सावध । पातक पुण्य तयाचे दग्ध । शुकादिक बोलति प्रसिद्ध । स्वरूपि सिद्ध जे जाहले ॥ ३६ ॥ असो बहु सांगणे कीर्ति । अत्यंत पवित्र श्रीकृष्णमूर्ति । प्रायश्चित्त घ्यावे तया म्हणती । ब्राह्मण समस्त मीळोनि ॥ ३७ ॥ जयाचे चरणि उम्दव गंगे । साधुरूपे तो श्रीरंग । जनबुद्धिचे नाना तरंग । बोलति विरंग स्वामिते ॥ ३८ ॥ तये काळि श्रीकृष्ण योगि । उत्तर करिति सर्वांलागि । शुद्ध होउनि आम्हालागि । करणे जगि कायते ॥ ३९ ॥ प्रथम स्थळ करूनि पातिसि । ठेविते जाहाले जैसि दासि । अनुग्रह देउनि तयेसि । स्वस्वरूपासि मेळविले ॥ १४० ॥ संग त्याग करूनि आपण । गुंफेत वास करिति कृष्ण । योगाभ्यास ज्याचा पूर्ण । पाप पुण्य कैचे तया ॥ ४१ ॥ ब्रह्मानंदि रंगले चित्त । समूळ गेले द्वैताद्वैत । अंतर्बाह्य जैसा आदित्य । तैसा सत्य श्रीकृष्ण ॥ ४२ ॥ शिवस्मरणि सदा रत । जीवित्व किमपि नसे तेथें । शांतलिंग सद्गुरुनाथ । केलि सनाथ पूर्ण कृपा ॥ ४३ ॥ पुढील अध्याई जयराम कथन । श्रोति करावे आवडि श्रवण । कृष्ण स्वामिसि येता शरण । अनुग्रह पूर्ण होईल तयासि ॥ ४४ ॥ सिद्धाचि उभा समचरणि । ग्रंथ करविता कोदंडपाणि । राजारामि वदवी वाणी । आत्मज्ञानि श्रीरघुवीर ॥ ४५ ॥ भक्तमंजरिमाळा ग्रंथ । श्रवणेचि पुरति मनोरथ । श्रीकृष्ण जयराम चरित्राते । प्रथमोध्याय समाप्त जाला ॥ १४६ ॥ सीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ ७ ॥ अनुक्रमे अध्याय ॥ १२ ॥

## अध्याय १२ वा

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयजयाजि सद्गुरुनाथा । आदि पुरुषा शिवा शांता । सच्चिदानंदा त्रिगुणरहिता । सिद्धनाथा

श्रीमुर्ति ॥ १ ॥ सकळ गणाचा जो का ईश । याळागिं नामें श्री गणेश । हंस स्वरूप स्वयंप्रकाश । नमन तयास आत्यादरें ॥२॥ मूळमाया ते आद्य स्फूर्ण । वागेश्वरि जाणिजे खूण । अंतरबाह्य परिपूर्ण । उद्भव जेथुनि ॐकारा ॥ ३ ॥ प्रकृति पुरुष अद्वैत । जनक जननी कुळदैवत । उपासना श्री रघुनाथ । संत श्रोते नामियेळे ॥ ४ ॥ भक्तमंजरि हे माळिका । प्रेम रज्जु साजिरा निका । वाग इंद्रियें गुंफोनि देखा । वैकुंठ नायका अर्पितसे ॥ ५ ॥ अवधान देतां येकाग्रवृत्ति । तत्काळ वरि सायोज्य मुक्ति । श्रीकृष्ण जयराम चरित्राप्रति । यथामति वर्णिजेळ ॥ ६ ॥ भक्तिमाहात्म अनुभव घेणें । यदार्थि स्वयें नारायण । संतस्वरूपा धारण करून । जगदोत्धारण करीतसे ॥ ७ ॥ नातरि देव आणि भक्त । अभेद स्वरूप निश्चित । परि लीळा भेद अद्भुत । गुरु शिष्य होत पै ॥ ८ ॥ ज्ञानेश्वर नामें श्री भगवान् । अवतार घेतळा पृथ्वि जाण । आचार्य उपासना करून कथन । भक्तिज्ञान स्थापियेळे ॥ ९ ॥ पुन्हा होऊनि येकनाथ । श्रीगुरुसेवा केळी बहुत । जनार्दन स्वामी माहा समर्थ । सद्गुरुनाथ जयाचा ॥१०॥ दत्तात्रायचि भेटि होता । प्रसाद ळाधळा पूर्ण तत्वता । येकादश स्कंद भागवता । टीका सर्वथा जाहाळी ते ॥ ११ ॥ शुद्ध भाव पाहोनि जाण । पाणि वाहिळे श्रीकृष्णानें । उगाळुनि धामें चंदन । करितां देवार्चन येकनाथ ॥ १२ ॥ इत्यादिक सकळ कथा । ठाउक्या आहेति समस्ता । पुढें आख्यान वर्णिजे आता । सावध श्रोता तें परिसावें॥१३॥प्रतिष्ठान क्षत्रि नाथजिनि।अवतारळीळा समाप्त करूनि। वास केळा निर्गुण भूवनि । परि मनि इछा राहिळी॥१४॥ श्रीकृष्णासि जाऊनि शरण । प्रेमानुभव घ्यावा पूर्ण । सद्गुरुभक्ति परम गहन । करावी जाण पुनः पुना ॥ १५ ॥ येतद्विषयीं श्रीयेकनाथें । अवतार घेतळा भूमंडळांत । ते चि अैका श्रोते मात । सावध चित्तें करूनि ॥ १६ ॥ जेवि त्रिपुरुष आत्मा येक । परि न घडे येकळी सुख । परस्परें मिळतां देख । घडे निके समाधान ॥ १७ ॥ तैसें चि येथें पाहाता कांहिं । येकनाथ

कृष्णासि द्वैत नाहीं । परि भक्तिचि हि नवाई । होणें पाहि पै गुरुशिष्य ॥ १८ ॥ असो नायजी आणि श्रीकृष्ण । अवतार जाले कोठें जाण । ते चि होईल आतां कथन । अनुक्रमें पूर्ण यथोक्त ॥ १९ ॥ आदौ श्रीगुरु कृष्ण स्वामि । जनक तयाचे कोणते भूमि । तें चि श्रवण करा तुम्हि । अंतरयामिं प्रेमेंहि ॥ २० ॥ कृष्णातीरिं वाहु क्षेत्र । रामलिंग स्थान जेथें पवित्र । पुराण प्रसिद्ध निवति नेत्र । दर्शनमात्रें करुनि ॥ २१ ॥ तये स्थळीं ग्रामलेखक । यजुर्वेदि पुण्यश्लोक । तपोनिष्ठ पूर्ण भाउक । वेद पाठक विप्रेंद्र ॥ २२ ॥ तयाचिये उदरीं जाण । कृष्णस्वामिसि जाहालें जनन । प्रताप सूर्य दैदिप्यमान । तेज ज्ञान जयाचें ॥ २३॥ आजानबाहु आकर्ण दृष्टि । सु हास्यवदन मूर्ति गोमटी। लावण्यखाणि उपमा सृष्टिनसे पृष्टि पृथ्वीचे ॥ २४॥ दिवसो दिवस बाळ्लीला। विचित्र करितो घन सावळा । सुख होतसे पाहातां डोळा । भोगिती सोहळा मायबाप ॥ २५॥ सातवे वर्षि मौंजिबंधन । ब्रह्मचर्य धरिलें श्रीकृष्णें। वैराग्य आंगिं बाणलें पूर्ण । करिति भ्रमण तिर्थांतरा ॥ २६॥ योगा माजि बहु प्रीति । शिवउपासना सहज स्थिति । माहादेव क्षेत्र देखोनि चित्तिं । जाहाली वृत्ती आनंदमय ॥ २७ ॥ शांतलिंग नामें करून । जंगम स्वरूप गिरिजारमण । प्रत्यक्षता प्रगटिकरणें । दिधलें दर्शन श्रीकृष्णासि ॥ २८ ॥ रुद्राक्ष भूषण जटा भार । विभूतिलेपन व्याघ्रांबर। शंखपाणि कौपिन सुंदर । ज्ञानविचार त्रिनैन तो ॥ २९॥ भव माल्य उत्तम कांति । देवाळयांत पाहिलि मूर्ति । दर्शन होतां श्रीकृष्णवृत्ति। जहाली चिति तन्मयता ॥ ३०॥ आलिंगन देतां परस्परें । येकत्र जाहले हरिहर । जेवि ककुप्रति कृष्णानीर । प्रितिसंगम साच्यार तयापरि ॥ ३१ ॥ शांतलिंग सद्गुरुनाथ । कृष्णें नमन केलें तयाते । प्रश्न आदरिला अनुग्रहार्थ । जोडुनि हात अनन्य ॥ ३२ ॥ मग उपदेश करितां त्या चि क्षणांत । श्रीकृष्ण जाहले समाधिस्त । मंत्र सांगुनि निजकर्णाते । सत्स्वरूपाते मेळविले ॥ ३३ ॥ दीपीं दीप येकवटता । अद्वय प्रकाश सहजि आईता । येकात्मता पावलि सत्ता । सहजी समता अद्वैत ते ॥ ३४ ॥

दृश्य द्रष्टा आणि दर्शन । विरूनि गेली त्रिपुटि जाण । अंतर्बाह्य सोहं स्फूर्ण । उघडले नैन ज्ञानदृष्टि ॥ ३५ ॥ व्यष्टि समष्टि माया ब्रह्म । अन्वय व्यतिरेक सरला भ्रम । आपला आपण आत्माराम । लाधले प्रेम श्रीगुरुकृपें ॥ ३६ ॥ ऐसा होतां स्वरूपानुभव । तन्मय जाहले श्रीकृष्णदेव । सद्गुरुपदिं जडला भाव । जाहाले सेवेंत तत्पर ते ॥ ३७ ॥ मग कां हिं काळें करून । निर्याण आरंभिलें शांतलिंगानें । मोवते मिळाले शिष्यगण । जाहाले कारण ते ऐका ॥ ३८ ॥ म्हणति उदईक प्रदोषासि । जाणे आम्हा कैलासीं । अवतार लीला समाप्तिसि । जड तनुसि विसर्जिता ॥ ३९ ॥ ऐसें सांगोनि सर्वांप्रति । शात शिष्यासि आज्ञा करिति । काशीहूनि सत्वरगति । अस्तमानाप्राति यावया ॥ ४० ॥ यात्रा गाहाण ब्राह्मणापासि । लेहुनि दिधलें पत्रिकेसि । दोन शत रुपये देऊनि तयासि । अणावे पत्रासि सोडउनि ॥ ४१ ॥ ऐशा प्रकारें आज्ञापिता । संकट पडलें शिष्या समस्ता । श्रीकृष्ण स्वामिकडे पाहाता । जोडुनि हाता उभे ठाकले ॥ ४२ ॥ आज्ञा वंदुनि सद्गुरुचरणि । मस्तक ठेविला प्रीति करूनि । पत्रिका द्रव्य घेउनि । केली करणि अभिनव ॥ ४३ ॥ माहादेव क्षेत्रीं विस्तीर्ण तळे । यंत्राकार परम सखोल । अष्टौ दिशा दिग्पाळ । स्थापन पूर्विल जेथ पै ॥ ४४ ॥ ईशान्येसि ईश्वर दैवत । हे वर्म जाणीनले कृष्णनाथें । शांतलिंग स्मरूनि चित्तें । शिरले डोहात त्या स्थानिं ॥ ४५ ॥ भक्तवृंदे पाहुनि ऐसें । दुरोक्ति बोलति कृष्णस्वामिस । म्हणति मुकला प्राणास । येईल गुरुस राग म्हणुनि ॥ ४६ ॥ इकडे कृष्णें काय केलें । तळ्यांत शिरोनि काशींत निघाले । श्री मनकार्णीचे घाटि पातले । ते चि वेळे क्षणामाजि ॥ ४७ ॥ दामाजिचि रसद जैसि । पोहचवि यवनासि ऋषिकेशि । तयापरि विप्र सदनासि । ज्ञानराशी पोंहचले ॥ ४८ ॥ पत्रिका द्रव्य अर्पोनि । पावति मागति कैवल्यदानि । मिति पाहाता विप्रनयनिं । आश्चिर्य मानि मनात ॥ ४९ ॥ तीन महिने चालतां पंथ । काशि क्षेत्रासि मानव येत ।

तेरिख दिसति अजिचि निश्चित । काय मात न कळे हीं ॥ ५० ॥ श्रीकृष्णपदि ठेऊनि डोई । विप्र प्रश्न केला पाहि । बोळख सांगा मज कांहीं । वृत्ति पाईं लीन करा ॥ ५१ ॥ ऐसे वदतांचि तो ब्राह्मण । कृपादृष्टि केला पावन । आपण काशींत बुडि मारुन । निघाले जाण माहादेवी ॥ ५२ ॥ कृष्ण तळ्यांत पूर्ववत । प्रवेश केला तेथें त्वरित । बाहिर आले श्रीकृष्णनाथ । आश्चिर्य मानिती सर्वत्र ॥ ५३ ॥ शांतलिंग स्वामि जवळि । येवोनि पत्रिका समर्पिली । संतोषली गुरुमाउली । केली साउलि कृपेची ॥ ५४ ॥ कृतार्थ जाहालासि ऐसें वदोन । सांगितलें पुढील कारण । येकनाथ पुन्हा जन्मले जाण । उपदेश करणें तयासि ॥ ५५ ॥ श्रीशांतें पूर्ण प्रसाद । कृष्णस्वामिसि केला शुध्द । मिळाले सिद्ध सनकादिक ॥ ५६ ॥ * तो सोहळा अनुपम्य । विमानिं कोंदले असे व्योम । पुष्प वृष्टि केली प्रेमें । अमरोत्तमें ते काळिं । ॥ ५७ ॥ जाहाला वाद्याचा येक चि गजर । शिवगण करिति जयजयकार । पूजेसि पातले रमावर । मुख्य देवेंद्र आदिकरुनि ॥ ५८ ॥ असो समस्त शिष्य माहादेवी । समाधि रचिली अपूर्व बरवी । श्रीकृष्णस्वामि माहानुभवि । तारिति भविं सर्वांते ॥ ५९ ॥ योगाभ्यासिं सदा रत । सद्गुरुचरणिं रंगले चित । जगदाभास कैचा तेथ । स्वरूप शांत सबाह्य जया ॥ ६० ॥ समाधि पूजन करावया । श्रीकृष्ण राहिले तया ठाया । नवविध भजनिं रंगळि काया । सद्गुरुपाया सदा रत ॥ ६१ ॥ जे जे प्राणी शरण येति । कृपेनें तया उधरिति । अनाधिकारि भरले ज्ञाति । पावन होति दर्शनें ॥ ६२ ॥ कांहिं दिवसानंतर स्वामि । येते जाहले बाहुग्रामिं । वास्तव्य करूनि स्वआश्रमिं । भजन प्रेमिं निमग्न ॥ ६३ ॥ कुकाजि पाटील वडगाविंचा । योगभ्रष्ट तो जन्मांतरिचा । अध्यात्मविषईं छंद जयाचा । नेम जयाचा अखंड ॥ ६४ ॥ परि श्रीगुरुकृपेवीण । सहसा न घडे समाधान । कुळदैवत प्राचिन । ज्योतिर्लिंग तयानें आराधिला ॥६५॥

* प्रतीत च तीन चरणें आहेत.

दक्षण केदार रत्नागिरि । तयाचि धरिलि जेणें वारि । अनुताप जाहला अंतरिं । आत्म शिखरिं विनटावया ॥ ६६ ॥ येकादश यात्रा करितां जाण । कृपा आलि देवासि पूर्ण । भेट दिधली कुकजी लागुन । ज्योतिर्लिंगानें प्रत्यक्ष ॥ ६७ ॥ सांगितले मुख्य कारण । कृष्ण स्वामिसी जावें शरण । तेथें होईल आत्मज्ञान । समाधान पावसि ॥ ६८ ॥ ऐसें बोलोनि खळेश्वर । अंतरधान पावले निर्धार । कुकजि पाटिल तदनंतर । आले सत्वर वाह्यासि ॥ ६९ ॥ कृष्णापास्वामिसि तनुमनधन । जीवित्व केलें समग्र अर्पण । आत्मानुभव लाधला पूर्ण । अज्ञान दैन गेलें पै ॥ ७० ॥ गुरुवार येतां आनंदेसि । भजन करित यावे वाइ क्षेत्रासि । पूजोपच्यार द्रवराशि । सद्गुरुसि अर्पितसे ॥७२*॥ वहुत दिवस ऐसें अर्चन । कुकजी पाटिले केले तयानें । सेवटिं आले वार्धिक्यपण । शरिर क्षीण जाले असे ॥ ७३ ॥ तये कालिं नेम राहातां । वियोग जाहला श्रीगुरुनाथा । पाटिला चैन न पडे चित्ता । युगासमता घटिका ते ॥ ७४ ॥ पुत्रा हातिं विनंति । पत्र लिहिले विज्ञाप्ति । पाहतां निघावे सत्वरगति । ऐसें युक्ति लेखन पै ॥ ७५ ॥ शुद्ध भक्ति ते रुक्मीणि । माव तो चि सुदेव जनिं । पत्रिका देखतां निज नैनिं । श्रीकृष्णजी मनिं समजले ॥ ७६ ॥ रामालिंगासि करुनि नमन । वट ग्रामासि आले जाण । कुकजी पाटील आनंदानें । केलें अर्चन तेणें पै ॥ ७७ ॥ म्लानवदन जोडुनि कर । पसरिले जेणें स्वामिसि पदर । पाईं ठेउनि दृढ शरीर । नेत्रा नीर श्रवतसे ॥ ७८ ॥ म्हणे माहराज अंतकालीं । उपेक्षूं नको गुरुमाउली । मज अनाथा करि साउली । राहावे स्थळि या ग्रामि ॥७९॥ जाणुनि अंतर सत्शिष्याचें । कळवळलें मन कृष्ण स्वामिचें । वचन दिधलें तयासि साचें । राहिलो वाचे म्हणति तया ॥ ८० ॥ शिष्य-भक्ति कृष्णस्वामि । वास्तव्य केले वटग्रामिं । कुकजी पाटील सेवाधर्मि । तिष्ठति नेमि अहर्निशीं ॥ ८१ ॥ भाविक ब्राह्मण तेथिल वयोतिथि । नवल पुण्या तयाचि राशि । प्रत्यहिं जावें त्याचे गृहासि । नैवेद्यासि

* प्रतीत व ७१ वा अंक अथवा ओवी नाहीं.

श्रीकृष्णें ॥ ८२ ॥ योगाभ्यासिं सदा निमग्न। ज्ञानेश्वरि करीति पठण। पंढरिसि जावे प्रीति करून। वैकुंठ जीवन भेटावया ॥ ८४⊛ ॥ ऐशा रिति वटग्रामि। ब्रह्मचर्य वर्तति धर्मि। पवित्रस्थान धन्य भूमि। वास नेहमि कृष्ण स्वामिचा ॥ ८५ ॥ कुकजी पाटील पुण्यश्लोक। भक्ति जयाचि अलोलीक। वश्य केला गोपिनायक। भवदुःख कैंचे तया ॥ ८६ ॥ मग कांहिं एक दिवसानिं। कुकजी पावला निर्गण सदनि। तयाचे पुत्र सुलक्षणि। पिताहुनि अधिक ते ॥ ८७ ॥ जेंवि कमाल संत कबीराचा। जनकाहुनि आगळा साचा। लोकत्रै प्रताप जयाचा। संत वाचा गाति पै ॥ ८८ ॥ तैसे चि जाणा कुकजी सुत। सद्गुरुचरणि प्रेम अद्भुत। बापासम आचरति वृत्त। अनन्यूत श्रीकृष्ण पदीं ॥ ८९ ॥ येकविध भक्ति जाउनि शरण। साधिलें जेणें निजात्मज्ञान। दास्यत्व करिति निशिदिन। नाहिं चिंतन दुजे पै ॥ ९० ॥ सर्वकाळीं स्वामिजवळि। तिष्ठति जोडुनि बद्धांजुळी। जे जे पाहिजे त्या त्या वेळिं। देति सकाळि पदार्थासि ॥ ९१ ॥ परि सद्गुरु श्रीकृष्ण। इछिति जावया ग्राम सोडून। तये काळिं त्या शिष्यानें। योजिनले जाण गुंतावया ॥ ९२ ॥ म्हणति स्वामिया येकटे आपण। गुरुमाता असावि आम्हा लागुन। निजदासाचा मनोरथ पूर्ण। सद्गुरुनें पूर्ण करावा ॥ ९३ ॥ ऐशियापरि करुणा भाकिति। वारंवार प्रार्थना करिति। परि श्रीकृष्ण निवारिति। सुता म्हणति कुकाजिच्या ॥ ९४ ॥ म्हणति गृहस्थाश्रमि कैंचे सुख। न पडे स्वस्त निमिष्य येक। मायाजाळीं गुंतले लोक। नाहि ठाव स्वरूपाचा ॥ ९५ ॥ स्त्री हि प्रत्यक्ष पाहतां वेडि। दुर्लभ आयुष्य व्यर्थ दवडि। रात्रंदिवस सदा वोढि। नाहिं घडि विश्रांति ॥ ९६ ॥ अनिवार काम दुर्धर। मोहित जाहले सकळ नर। जन्म मृत्यु येरझार। कदा संसार चुकेना ॥ ९७ ॥ असो जग प्रवृत्तिसि। नाहिं करणें आम्हा लग्नासि। सांगति ऐसे कुकजी सुतासि। ज्ञानरासि श्रीकृष्ण ॥ ९८ ॥ तये काळिं अकस्मात। वास्तिसि भाला विप्र पांथस्त। वटग्रामि कुटुंब-

⊛ ८३ हा अंक च नाहीं.

सहित । तृतीय प्रहरांत सहजि तो ॥ ९९ ॥ कुकजी पाटील तयाचे कुमर । प्रश्न करिति तया निर्धार । ग्राम तुमचा कोण साचार । कन्या उपवर दिसताहे ॥ १०० ॥ लग्न कर्तव्य असेल जरि । वर योजना आहे बरि । द्रव्य इच्छा कांहीं अंतरिं । असेल तरि सांगावें ॥ १ ॥ बाहेकर वृत्तिवंत । कुळकर्णि श्रीकृष्णनाथ । यजुर्वेद त्याचा निश्चित । गोत्र विलसत काश्यप ते ॥ २ ॥ गुरुस्थान अमुचे जाणा । असे सुचविता त्या ब्राह्मणा । उत्पन्न जाह्ला वीलक्षण कल्पना । समूळ जाणा श्रोति ते ॥ ३ ॥ अर्थातुर जाह्लें मन । करितो म्हणे कन्या लग्न । पाचशत द्रव्य देतां जाण । कन्या देईन तव स्वामिते ॥ ४ ॥ ऐसे विप्र तो बोलता । आनंद जाह्ला कुकजी सुता । द्रव्य देउनि तया तत्वता । केले घटितार्थी विवाहासि ॥५॥ श्रीकृष्ण स्वामीसि आग्रह करूनि । पदर पसरिला समस्तानि । मीठि घालुनि दृढचरणिं । वत्ळाकार नेहुनि पै केला ॥६॥ उत्तम दिवस पाहोनि तिथी । मंडप घातिला परमयुक्ति । लग्न सोहळा शिष्य भक्ति । उत्कृष्ट जगति पै झाला ॥ ७ ॥ कृष्णपत्नि जन्मांतरिचि । योगभ्रष्ट ती असे साचि । संकेत मार्गें तये सतिचि । सांगू पूर्विचि सकळ कथा ॥ ८ ॥ येकनाथगृहिं हज्यामतिसि । नापीक येतसे जो नेमेसि । तयाचि कन्या पुण्यराशि । भजनविळासि निमग्न ते ॥ ९ ॥ म्हणे नोवरा देव चि करीन । दुराग्रह ऐसा धरिला पूर्ण । षण्मास केलि उपोषणें । भक्षूनि पर्णें अकस्मात ॥ ११० ॥ तये काळिं श्रीभगवान । दिधले तयेसि रात्रौ स्वप्न । म्हणे मी श्रीखंड्या नामें कृष्ण । वाहातसे जीवन नाथगृहिं ॥ ११ ॥ मग ति पानवध्यासि येवोनि बाई । श्रीकृष्णपदिं ठेउनि डोई । संकल्प होता जो का हृदई । तो चि पाईं निवेदिला ॥ १२ ॥ द्वापारिचि चद्रावळि । मोगिला जिनें वनमाळि । चतुर्युगिच्या जन्मावळि । वर्णिता भलि लांबेल कथा ॥ १३ ॥ असो महाराज म्हणति राहा उगि च । गुप्तरूपी मि असे साच । फळ हे प्राप्त अनुष्टानाचे ॥ १४ ॥ * ऐसें सांगतां तनये । आयुष्य सारिले

* प्रतींत तीन च चरणें आहेत.

श्रीकृष्णध्यानें । मागुति केला जन्म धारण । स्वज्ञातीत पूर्ण नापिक-गृहिं ॥ १५ ॥ तो हा योग सिद्धिसि गेला । माळ घातिली कृष्ण स्वामिला । पुण्योदयें बोध आला । संगम जाहला तो ऐका ॥ १६ ॥ कुटुंब घेवोनि तो कन्यापुत्र । बारिक गेला होता तो यात्रे । तेथे मूल ही पुण्यपवित्र । चुकली स्वतंत्र समोचई ॥ १७ ॥ अकस्मात गंगातीरिं । विप्रें पाहुनि लाहान कुमारि । घरासि आणुनि तये झडकरिं । समजाविले वैखरी रुदन करिता ॥ १८ ॥ कन्ये सारिखे पालन करून । मर्यादेनें ठेविलि जाण । शोध कारितां बहु ठिकाण । मायबाप पूर्ण न उमगति ॥ १९ ॥ नंतर द्विज तो माहादेवासि । कुटुंबसहित आला यात्रेसि । तेथोनि येतां मार्गासि । लागले वस्तिसि वटग्राम ॥ १२० ॥ पुढें विचार ऐसा जाला । ती मूल दिधली कृष्णस्वामिला । पूर्विल संमंध सहजि घडला । पाहातां भला ऋणानुबंधें ॥ २१ ॥ सर्वे चि दोन संवत्सरानि । ऋतुस्नात जाहली कृष्णपत्नि । सोहळा केला शिष्य वर्गानि । भक्ति करूनि सर्वत्रे ॥ २२ ॥ पणमासपर्यंत तये सतिने । भोगिला स्वामि सच्चिद्घन । संकल्प गेला सिद्धिसि पूर्ण । कारण जाहले ते ऐका ॥ २३ ॥ सत्व शुद्ध नापिक जो कां पिता । विरक्त असतो सर्वथा । हिंडत हिंडत आला तीर्था । कृष्णासरिता स्नान करावया ॥ २४ ॥ करवीर क्षेत्र रत्नागिरी । यात्रा करूनि सांग वरि । वस्तिसि आला दोन प्रहरिं । वटग्राम नगरि सहज तो ॥ २५ ॥ तव ते कृष्णभार्या उदक आणावयासि । जातां पाहिले तेणें दृष्टिसि । उचंबळला मोह मानसिं । धरिलि पोटासि चापानें ॥ २६ ॥ तये काळि सर्व जन । पुशिति तया वर्तमान । आलासि येथें कोठिल कोण । बाई जाण गुरुपत्नि ॥ २८ ॥ ऐकोनि नाहावी विस्मय पावला । म्हणे इनें देव कोण पुजिला । समूळ वृत्तांत सांगितला । नमस्कार केला कन्येसि ॥ २९ ॥ कृष्ण स्वामिसि निरउनि लेक । स्वदेशा गेला तो नापीक । खळ चांडाळ जे निंदक । करिति सकळ वल्गना ॥ १३० ॥ शिशुपाळ निंदा करि जैसा । मतिमंद समोचय मिळाला तैसा । दुरोक्ति बोलति योगेशा ।

श्रीकृष्णपरेशा स्वामिते ॥ ३१ ॥ माहाराज निवांत स्वस्थमनें । स्वस्वरूपिं ज्या अनुसंधानें । पद्मपत्र जळिं जाण । अलिप्त पूर्ण तयापरि ॥ ३२ ॥ थिल्लरोदकिं बिंबता सूर्य । पवित्र चि असे तो निर्धार । नातरि शुद्ध सदा गाय । अमंगळ होय केविं ते ॥ ३३ ॥ किंबहुना ते गंगाजळ । अखंडित वाहे निर्मळ ॥ स्नान करोत खळ चांडाळ । नाहिं विटाळ तीर्थासि ॥ ३४ ॥ अग्नि वायु आणि मक्षिका । धन धान्य पंथ नौका । तैसा चि पूर्ण योगि निका । शुचिर्भूत देखा सर्वदाहि ॥ ३५ ॥ सदा स्वरूपी जो सावध । पातकपुण्य तयाचे दग्ध । शुकादिक बोलति प्रसिद्ध । स्वरूपीं सिद्ध जे जाहाले ॥ ३६ ॥ असो बहु सांगणें कीति । अत्यंत पवित्र श्रीकृष्ण मूर्ति । प्रायश्चित घ्यावे तया म्हणति । ब्राह्मण समस्ति मिळोनि ॥ ३७ ॥ जयाचे चरणिं उद्भव गंगे । साधुरूपें तो श्रीरंग । जनबुद्धिचे नाना तरंग । बोलति विरंग स्वामिते ॥ ३८ ॥ तये काळिं श्रीकृष्ण योगि । उत्तर करिति सर्वांलागि । शुद्द होउनि अम्हालागि । करणें जगिं काय ते ॥ ३९ ॥ पृथक स्थळ करूनि पत्निसि । ठेविते जाहाले जैसि दासि । अनुग्रह देउनि तयेसि । स्वरूपासि मेळविले ॥ १४० ॥ संग त्याग करुनि आपण । गुंफेंत वास करिति कृष्ण । योगाभ्यास ज्याचा पूर्ण । पाप पुण्य कैचें तया ॥४१॥ महानंदिं रंगले चित्त । समूळ गेले द्वैताद्वैत । अंतर्बाह्य जैसा आदित्य । तैसा सत्य श्रीकृष्ण ॥ ४२ ॥ शिवस्मरणिं सदा रत । जीवित्व किमपि नसे तेथें । शांतलिंग सद्गुरु नाथ । केलि सनाथ पूर्ण कृपा ॥ ४३ ॥ पुढील अध्याई जयरामकथन । श्रोतीं करावे आठवि श्रवण । कृष्ण स्वामिसि येतां शरण । अनुग्रह पूर्ण होईल तयासि ॥ ४४ ॥ सिद्ध चि उमा वासरमणि । ग्रंथ करविता कोदंड पाणि । राजारामिं मदवी पाणि । आत्मज्ञानि श्रीरघुवीर ॥ ४५ ॥ भक्तमंजरीमाला ग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । श्रीकृष्ण जयराम चरित्राते । प्रथमोध्याय समाप्त जाला ॥४६॥ अनुक्रमें अध्याय १२ वा ॥

## अध्याय १३ वा

॥ श्रीगणेशायमः ॥ श्रीराम समर्थ ॥ जय सद्गुरु आत्मयारामा। परात्पर ब्रह्म निर्गुणा। भक्तिप्रिय रुक्मिणी रमणा। पंढरीजीवना श्रीरघुपति ॥१॥ माया ब्रह्म तू चि सारा। पिंड ब्रह्मांड अवघा पसारा। सर्वी अलिप्त निर्विकारा। निराधारा परिपूर्णा ॥२॥ जीव शिव क्षराक्षर। प्रकृतिपुरुष येक निर्धार। देव भक्त परि साचार। स्वात्मविच्यारसुख भोगावया ॥३॥ तैसा स्वामी श्रीएकनाथ। ज्ञानेश विष्णु तो निश्चित। कृष्णापा श्रीखंड्या पाणि वाहत। कोण विचरत नाथगृहीं ॥ ४ ॥ असो ती खूण बोलं जातां। मना होतसे तादात्म्यता। मौनता वरी लिहितां ग्रंथा। न घडे पाहतां वाच्यांश ॥ ५ ॥ त्याचा त्यासि स्वानुभव। गुरुपुत्र जाणती हे वैभव। वहिर्मुखें उगेचि राहवे। गोष्टी वैभव श्रवण करुनि ॥ ६ ॥ जगद्गुरु श्रीकृष्ण कैवल्यदानी। विश्वात्मा तो निराभिमानी। दास्यत्व केले भक्ति पाहोनि। येकनाथ सदनीं न कळतां ॥ ७ ॥ तेणें नायासि खेद जाहला। पुन्हा मागुति जन्म धरिला। अतःकर्णि हेतु राहिला। भजावयाला श्री कृष्णाते ॥ ८ ॥ ते चि आतां सांगूं कथन। श्रोतिं करावे येकाग्र मन। कात्राबाज मांडवगण। पुण्य स्थान नगर ते ॥ ९ ॥ देशलेखक तेथील तपोनिष्ठ। ऋग्वेदी ब्राह्मण परम श्रेष्ठ। द्विज उपासना भिक्षा स्पष्ट। नामनिष्ठ ते चि तया ॥ १० ॥ भिकाजी पंत बोलति जन। भार्या जयाची सुलक्षण। कृष्णाबाई नाम जाण। स्त्रीपुरुष पूर्ण अनुष्ठानी ॥११॥ जाणोनि तयाचा शुध भावार्थ। पोटासीं आले श्री येकनाथ। मातेसि डोहाळे जाहले प्राप्त। ऐका श्रोतें तें नवल ॥ १२ ॥ तुळसीमंजिऱ्या वाटूनि प्याव्या। संतमंडळी घरासि आणावी। संतुष्ट करावि यथोक्त॥१३॥* सार्वकाळ समाधिस्त। येकांतीं बैसावे ध्यान कारित। अन्नसेवन करी किंचित्। तन्मय चित्त सर्वदा॥१४॥ प्रपंचमान सांडिली रीति। घाबरा झाला तेणें पति। म्हणे इचीं भ्रमली मति। कोण शक्ति नवसावी ॥ १५ ॥ तये काळीं कुळदेवता। स्वप्नीं

* मुळांतच ३ चरणें आहेत.

सांगे भिकाजीपंता । उदरीं संभव श्रीयेकनाथा । डोहळे पाहतां तयेचे ॥ १६ ॥ ऐसा होतां चि दृष्टांत । सांगीतळा सकळीकातें । घराशि आले ग्रामस्त । पुसति समस्त देशळेखका ॥ १७ ॥ भिकाजीपंत आनंदानें । निवेदन करिते जाले स्वप्न । सवेंचि नऊ मास भरले पूर्ण । जाहली जाण प्रसूत ते ॥ १८ ॥ भा तें सुख सांगतां वाचे । उन्मन होतसे ज्या मनाचे । येकानाथा अवतार जाहला साचा । मूर्ति तैसी च सुलक्षणी ॥ १९ ॥ साजिरें ध्यान उत्तम कांति । अवयव तैसें चि पाहतां निगुति । श्रावणमास श्रीकृष्णवैजयंति । उत्तम तिथि जन्मकाळ ॥ २० ॥ जन्मकाळ समईं भिकाजीपंतें । उछाह केला असे बहुत । नानाविध ब्राह्मणातें । दानें देत असंख्यें ॥ २१ ॥ गुढिया तोरणें अन्नदानें । जेवविले अठरा वर्णं । सिध्दांतकर्तें ज्योतिषि जाण । मिळाले पूर्ण पाहावया ॥ २२ ॥ नाम ठेविलें त्रयोदशादिनीं । जयराम ऐसें सुलक्षणी । अर्थ तयाचा ऐका कर्णि । परम जनीं सुखकारक ॥ २३ ॥ योगी रमती ज्या पदास । येकनाथ स्वरूप तें अविनाश । सर्वांहुनि जे उत्कर्ष । जयराम विशेष नाम तें ॥ २४ ॥ सूर्यबिंब उदया पासुनी । चढतां प्रकाशति किरणीं । वैराग्य उत्पन्न जयराममनिं । जाहले जनीं तयापरि ॥ २५ ॥ ऐशापरि पंच वर्षे । होती जयराम स्वामीस । नंतर प्रयाण वैकुंठास । भिकाजीपंता सायोज्यता ॥ २६ ॥ जैसे फळ पाकाशि येतां । पुष्प गळे तें सर्वथा । तैसा विच्यार दिसे पाहतां । दुजी समता नसे पैं ॥ २७ ॥ जया उदरिं मूर्तिमंत । अवतार घेतळा येकनाथें । विमानीं बैसोनि भिकाजिपंत । गेले निश्चित निजधामा ॥ २८ ॥ पुढें सर्वे चि येक महिन्यातें । जयराम म्हणति मातेसि जाण । पंढरपुरासी जावें निघोन । भगवत्दर्शन घ्यावया ॥२९॥ नाशिवंत संसार पाहतां सकळ । कासया बैससि झाकोनि डोळे । हातो-हातीं ग्रासितो काळ । आयुष्य सकळ उष्वळाहि ॥ ३० ॥ पुत्रोपदेश ऐकोनि जननी । सावध जाहली अंतःकर्णि । पंढरीसि येवोनि प्रीति-करूनी । चक्रपाणि नमियेला ॥ ३१ ॥ जयराम स्वामीस पाहतां डोळा ।

प्रेमें दाटला घनसावळा । आलिंगन दिधलें या बाळा । अंकीं घेतला उचलोनी ॥ ३२ ॥ उत्तम तीथी पाहूनि मुहूर्त । व्रतबंध करविला द्विजा हातें । रात्रौ जावोनि स्वयं तेथें । सकळ साहित्य करविलें ॥३३॥ महाद्वारीं उपनैन । जयराम स्वामीचें जाहलें जाण । मिळाले तेथें ऋषीगण । इंद्रादि करून दैवतें ॥ ३४ ॥ समारंभ तो अत्यद्भुत । राहि रुक्मिणि भिकाळ घालित । येकसरा वाद्यें वाजत । ध्वनी अनुहात नानापरि ॥ ३५ ॥ जैसे ब्राम्हदेव तीर्थें करून । येतां मावंदें केलें जगजीवनें । तयापरि मुंजीबंधन । रघुनंदन करीतसे ॥ ३६ ॥ धन्य भाग्य जयराम स्वामीचें । ग्रंथीं न करवें लेखन साचें । देव जयाचे कीर्तनीं नाचे । काय वाचे वानूं ॥ ३७ ॥ क्षणयेक न पाहतां जयराम डोळा । वेडा होय घनसावळा । कोण उतरि वेळो वेळा । ती वेल्हाळ रुक्मिणि ॥ ३८ ॥ रात्रंदिवस राउळांत । जयराम स्वामी वास करित । ब्रह्मचर्य विराजित । शुध्दी सौंदर्य शोभत ज्या आंगीं ॥ ३९ ॥ वेदाध्ययन शास्त्राभ्यास । प्राप्त जाहला अनायासें । निरूपणीं रंगले मानस । भजन विशेष सर्वदा ॥ ४० ॥ पुढें कांहीं काळें करून । मातेसि जाहलें त्या निर्याण । तये काळीं जगजीवन । आले धावोनि उत्साहीं ॥ ४१ ॥ कृष्णाबाईचे येऊनि जवळी । उभे ठाकले श्री घनमाळि । ज्योति घेतली मुखकमळीं । तात्काळिं प्राण निघतां ॥४२॥ मग तो आनंद सांगणें किती । भगवत्स्वरूप जाहली सति । उत्तर-विधि शास्त्र रीति । जयराम करिति सकळीक ॥ ४३ ॥ कोणे येके दिवसीं गुरुवारिं । कीर्तन करिति गरुड पारिं । संत मिळाले त्या अवसरिं । प्रश्न वैखरी केला तो ॥ ४४ ॥ सांप्रदाय कोण गुरु । कैसा आत्मसाक्षात्कारु । सगुण निर्गुण पाहतां विचारु । अनुभव धरूं कैसा तो ॥ ४५ ॥ ऐशा प्रकारें स्वरूपस्थिति । सांगा म्हणतां सकळ संतीं । चित्तासि जाहली उपरति । मुरडली वृत्ति माघारीं ॥ ४६ ॥ येकनाथ अवतार जयराम । तेथें कासया पाहिजे श्रम । परि जगीं दाविलें वर्म । साधनक्रम विशेष म्हणुनि ॥ ४७ ॥ याळागि चित्तीं विचार केला । प्रयाण केलें

सप्तशृंगाळा । गुरुरूपिणी मुळमायेळा । सप्तमचक्राळी देखियले ॥४८॥ दिनत्रय तेथें कारितां वास । अंबा भेटली स्वयंप्रकाश । अमृतवाटि प्राशनास । दीधली स्वामीस आणोनि ॥ ४९ ॥ प्रसाद घेवोनि जयराममूर्ति । निघते जाहले सत्वर गति । जोगाईचे अंब्याप्रति । सहजास्थिति पोहोचले ॥ ५० ॥ पूर्ववत येवोनि अंबिकेनें । प्रत्यक्ष प्रघटोनि दिधलें दर्शन । सत्राविचे पीयूषपान । जाहलें जाण त्या स्थानीं ॥५१॥ परि आत्म साक्षात्कार । वेगळा चि असे तो विच्यार। सत्स्वरूप निर्विकार । सर्वांतर होणें पै ॥ ५१ ॥ येतद्विपईं देवी आगि । प्रार्थना केली असे सलगी । तये वेळीं सर्वज्ञ जगीं । बोळ्ली स्वांगी देवी ते ॥ ५३ ॥ म्हणे जयरामा पंढरीसि जावे । येकांतिं अनुष्ठान तुषां करावें । तेणें कार्य सहजी व्हावें । अैसें स्वभावें असे पै ॥ ५४ ॥ आज्ञा वंदुनि सत्वरगति । जयराम आले पंढरीप्रति । गोपाळपुरि येकांति । बैसली मूर्ति तपश्चर्ये ॥ ५४ ॥ तये काळीं अत्रीतनय । प्रगट जाले दत्तात्रय । पठाणी वेश धरूनि पाहे । खटाटोप आहे सांगाते ॥ ५६ ॥ बकरें कोंबडें रेडा हांडि । विचित्र घेतली संगें रंडी । जयराम स्वामीस दाविलि प्रौढी । अती आवडि भयंकर ते ॥ ५७ ॥ पाल दिधलें येवोनि जवाळे । अद्भूतलीला तेथें मांडिली । आदि मायेशि आज्ञा केली । हांडि भली सिकराया ॥ ५८ ॥ अवश्य म्हणोनि त्या बाईनें । सुरी घेतली परम तीक्ष्ण । आंडज घातले पात्रीं कापुन । हांडि तेणें न भरति ॥ ५९ ॥ मग बकरें तें ही तात्काळ वधिलें । मडक्यामाजि समग्र घातलें । तयापरिते असे राहिले । सेखिं मारिले रेड्यासि ॥६०॥ तरी ते हांडि अपूर्ण तैसि । रंडी सांगे पठाणासी । मळंग बोलती स्त्रियेसि । आसमंत भागासि कोणी पाहा ॥ ६१ ॥ जयराम स्वामीजवळे ब्राह्मण । आणीक होते तपास्वि जाण । तयानिं केलें पळायन । अैसें कारण प्रवर्तता ॥ ६२ ॥ माहाराज आसना-वरि । येकटे राहिले निर्धारिं । जाणिलें थर्म अंतरि । दत्त चतुरि अजा गुरु हे ॥ ६३ ॥ मागील अवतारीं जनार्दनें । करविलें होतें श्रीदर्शन ।

तैस चि येथ दिसतें जाण । भय पावणें कायसा ॥ ६४ ॥ निश्चय करोनि अंतर्यामीं । निर्भय असती जयरामस्वामी । शस्त्र घेवोनि हस्तपर्शी । तव ती शर्मी धाविन्नली ॥ ६५ ॥ आनंदयुक्त जयरामें । मस्तक केलें पुढें प्रेमें । याईशि म्हणती आपुला धर्म । सिध्द परम करणें वेगीं ॥ ६६ ॥ निर्धार पाहोनि स्वामीचा । लोप जाहला याइस्याचा । दत्तात्रय श्री भेटला साचा । पंढरीचा जगद्गुरु ॥ ६७ ॥ जयरामाशी माग म्हणति । कोणती इच्छा आहे चित्ति । ऐसें बोलतां श्रीमूर्ति । काय वदती माहाराज ॥ ६८ ॥ आत्मप्राप्तीवांण कांहिं । लोकत्रइं सार नाहीं । हे चि वांछी विठाबाई । आणीक हृदयीं नाहीं ते ॥ ६९ ॥ स्वर्ग मोक्ष ऋध्धी सीध्धि । हे तों माईक सकळ उपाधी । श्रीगुरुसेवा आत्मसिध्धि । देणें त्रिशुध्धि हें चि पै ॥ ७० ॥ जयरामस्वामी प्रति भगवान । सांगति तेव्हां कृपेकरून । श्रीकृष्ण स्वामिसीच जाण । जावें शरण तयासि ॥ ७१ ॥ पंढरीपासोनि पश्चिमेस । दाहा योजने वटग्राम असे । तेथें आहे पूर्ण योगेश । आत्मविलास आमुचा पै ॥ ७२ ॥ पाहतां सीघ्र तात्काळिक । देईल तुजला निजात्मसुख । ऐसें बोधितां जयराम देख । निघाले निके पंढरीहुनि ॥ ७३ ॥ इकडे श्रीकृष्ण मनीं समजले । जयराम स्वरूप येकनाथ जाहले । मार्गामाजि आडवे आले । येताती मळे भेटावया ॥ ७४ ॥ द्वादश घटिका येतां दिन । जयराम आले वटग्रामासि जाण । श्रीकृष्ण स्वामीसि पाहतां नैनें । जाहले मन सद्गद ते ॥ ७५ ॥ गाईसि देखोनि वत्स जैसें । की माता भेटली तान्हयास । चंद्रदर्शनी चकोरास । जैसा हर्ष तयासि ॥७६॥ नातरि मयुरें घन पाहतां । आनंद होतसे तया चित्ता । किंवा मत्छासि उदक मिळतां । सुख सर्वथा तैसें तें ॥ ७७ ॥ किंवहुना मधुवनि । ध्रुवासि भेटले नारदमुनि । जयराम स्वामिस अंतःकर्णि । तैसी कर्णि जाली ते ॥ ७८ ॥ अष्टभाव अंगीं दाटले । दंडप्राय भूमीसि पडले । श्रीकृष्णानि आलंगिले । उचलोनि धरिले स्वामीते ॥ ७९ ॥ म्हणति चला गुंफेशि आतां । कृतकार्य समजलें चित्ता । श्रीसांमा जवळि तत्वता ।

आले सर्वथा उभयमूर्ति ॥ ८० ॥ जयराम स्वामीनीं विनय भावें । प्रार्थियला श्रीगुरुदेव । म्हणाति स्वरूपीं मेळवावें । देणें अनुभव दासाते ॥८१॥ ऐशी माकितां निजकरुणा । कृपा आली सद्गुरु कृष्णा । आरंभिला विधि तात्काळ जाणा । स्वसुख मना पावावया ॥ ८२ ॥ जयराम स्वामीनीं यथायुक्त । अर्चियला श्रीगुरुनाथ । साष्टांगेंसि प्रणिपात । करुनि समस्त प्रदक्षिणा आदि ॥८३॥ गुरुपुजन पाहावयासि । नारद पातले ते वेळेसि । श्रीकृष्णतीर्थ पावावयासि । सुरवरासि हर्ष बहु ॥८४॥ देवालया सन्निध टाकें । प्राचीन होतें उगेंच उदक । तेथें जाउनि कृष्णे कौतुक । चरणांगुष्ट निके भिजविला ॥ ८५ ॥ तया तीर्थासि सकळिकांनि । पावन नाम ठेविलें जनि । सेवन केलें प्रीती करूनि । देवगणीं सर्वत्र ॥ ८६ ॥ उत्पन्न गंगा चरणीं जाहली । ते हे श्रीकृष्ण गुरु माउलि । संतरूपें अवतरली । उत्धराया भली दीन जना ॥ ८७ ॥ असो सांप्रदाय क्रमेंकरून । जयराम उपदेशिला जाण । कृपाकर ठेवितां मस्तकीं पूर्ण । लागली घन समाधि ॥ ८८ ॥ कर्पूर दीप येकवटला । किं दारूसि स्फुलिंग भेटला । नातरी अंधार पळाला । उदयाचळीं रवि येतां ॥ ८९ ॥ जयराम हृदयांतरीं । निर्धारिं पूर्णता पावली परि । द्वैताद्वैत कैंचि उरी । स्वरूपांबरिं निमग्न ते ॥ ९० ॥ आधीं च अवतार महासमर्थ । जयराम नामें श्रीयेकनाथ । सद्गुरुकृपा निश्चितार्थ । उपमा जगांत नसे तया ॥ ९१ ॥ येकवीस दिवस पर्यंत । जयराम स्वामि समाधिस्त । तो आनंद वाचे हाते । कोण सांगे ते या जना ॥ ९२ ॥ असो आणिक नवल कथन । श्रोते ऐका चित्त देऊन । रहिमपुरिं येक ब्राह्मण । नामाभिधान येकनाथ ॥ ९३ ॥ नाथाचे अवतार समाप्तीसि । उपदेश जाहला या द्विजासि । आस्ता राहिली परी मानसी । आत्मसुखाशि पुसावया ॥ ९४ ॥ ऐशा विचारें आराधन । बैसला करीतसे अनुष्ठान । येकनाथ स्वामीनि तया लागून । रात्रौ स्वप्न दीधले ते ॥९५॥ जयराम नामेंकरून । अवतार घेईन अमुक दिवसानें । श्रीकृष्ण सेवा कराया जाण । जन्म घेणें आम्हाशि ॥ ९६ ॥ कृष्णातिराशि येतां

पाहि । सांगू तुजला ज्ञान साई । बोध करितां ऐशा ठाईं । जाहला देहीं जागृत विप्र ॥ ९७ ॥ निजध्यास तो लागला । द्विज भोजित दिवस बैसला । तव तो सुदीन प्राप्त जाहला । ब्राह्मण आला वटग्रामा ॥ ९८ ॥ श्रीकृष्ण स्वामींसी वर्तमान । सांगितले सविस्तर जाण । अनन्यभावें नमन करून । दाखवा म्हणे जयराममूर्ति ॥ ९९ ॥ तात्काळ सद्गुरु कृष्ण । जयराम समाधी विसर्जुन । सुचविले शिष्य आला म्हणूनी । भाव धरुनि पूर्विचा तो ॥ १०० ॥ श्रीजयरामें पाहूनि तया । उत्पन्न जाहली प्रीति हृदया । विप्रें नमन केलें पाया । अनन्य ठाया प्रेम भरित ॥ १०१ ॥ मग तो संवाद गुरुशिष्याचा । उचंबळला स्वानंदाचा । नये वर्णितां ग्रंथिं वाचा । जेथें मनाचा तर्क न चले ॥२॥ निःसंशय होवोनि द्विज । पूर्णता पातली तया सहज । यथा सांग करूनि पूजेन । वंदिले चोजे जयरामा ॥ ३ ॥ मग कांहीं दिवस राहून तेथें । करितां जाहला गुरुसेवेत । वार्धिक्य जाणोनि सद्गुरुनाथें । आज्ञा देत ब्राह्मणासि ॥ ४ ॥ सस्वरूपीं असतां सावध । श्रीगुरुसेवन तें चि प्रसिद्ध । वियोग नसे कदा शुद्ध । स्मरतां पद अहिर्निशि ॥५॥ ऐशा प्रकारें जयराम स्वामिनीं । बोधिले तया विप्रा लागूनी । आज्ञा वंदुनि आपल्या सदनीं । गेला निघोनि रहिमतपुरा ॥६॥ नंतर श्रीगुरुकृष्णस्वामि । सत्शिष्य जयराम वटग्रामि । उभयमूर्ति ईहि भूमि । जगनिष्कर्मि करिति त्या ॥ ७ ॥ शरण येति जे जे प्राणि । ठेविता तये मस्तकीं पाणि । मुक्ति वरि तया लागुनि । असतां जनि खळ दुष्ट ॥ ८ ॥ येकनाथ अवतार जयराम । भूमंडळामाजि भक्त निःशिम । नये वर्णितां ज्याचें प्रेम । अनोपम्य भुवन त्रै ॥ ९ ॥ जयाचें दास्यत्व पाहातां । विस्मय होय गोरक्ष दाता । शुकादिक तुकिति माथा । श्री हनुमंता नवल मनि ॥ ११० ॥ शौचकूप स्वयें धुतले । पंकि पात्राते प्राशियेले । इतर काय सांगिजेल । आवडि नवल जनार्दन पदिं ॥ १११ ॥ सफळ संपचि सेवेठाईं । आयुष्य वेचिलें श्रीगुरुपाईं । तो हा अवतार जाहला महिं । जयराम पाहि श्री येकोबा ॥ ११२ ॥ मग तेथें काय पाहाणें । भक्ती

वैराग्य ष्याचें ज्ञान । अखंडाकार अर्पिलें मन । अंतःकर्ण तत्पर ते ॥ १३ ॥ सद्गुरुकृष्णाविणे कांहिं । दैवत जया दुजें नाहिं । दिवानिशीं आहेठाईं । वृत्ति पाईं तन्मय ते ॥ १४ ॥ येकनाथगृहिं जये वेळे । देवाजिनीं पाणि वाहिलें । कृष्णापा ऐसें पाचारिले । नाम पडलें तें चिपै ॥ १५ ॥ म्हणुनि श्रीगुरुकृष्णासि आपानाम । पूर्वाभ्यास बोलति जयराम । सर्वकाळ मानसिं प्रेम । आज्ञोक्ति धर्म सेवावया ॥ १६ ॥ जयरामा वांचोनि क्षणभरि । चैन न पडे श्रीकृष्ण अंतरि । आपा आपा निरंतरि । वदति वैखरि जयराम ॥ १७ ॥ असो उभयता येक स्वरूप । लहरि सिंधु समूळ आप । प्रभा आणि पाहतां दीप । द्वैतारोप न घडे त्या ॥ १८ ॥ परि भक्तिवाट वाढवावया । गुरुशिष्य होणें देवराया । शर्करा गोडि निवडितां ठाया । अभेद काया ईंद्रियासि ॥ १९ ॥ ऐशा प्रकारें जयरामकृष्णि । ऐक्य जालें श्रीगुरुभजनि । सेवा करिति प्रितिकरूनि । नाहिं मनिं देव दुजा ॥ २० ॥ तो अकस्मात वटग्रामिं । जगद्गुरु जो गोसावि । जयास शोभे आचार्यपदवी । शंकर अनुभवि ते आले ॥ २१ ॥ ग्रामीं दुर्जन होति कोणिह । तयाते हर्ष जाहला मनिं । शंकराचार्या जवळि जाउनि । छळण जनिं आरंभिलें ॥ २१ ॥ म्हणति भ्रष्ट दोघे जण । आमुचे गांवि आहेत ब्राह्मण । तयाते शिक्षा करा आपण । येवढें सांगणें गुरुवर्या ॥ २२ ॥ नापिक कन्येसि जेणें वरिलें । प्रायश्चित नाहिं घेतलें । जग सर्व विटाळलें । उपदेशिले द्विज सारे ॥ २३ ॥ अपराधि ते ऐशापरि । आहेत सध्या या नगरिं । महापातकी अनाच्यारि । नरनारि भक्तिसि त्या ॥ २४ ॥ ऐकोनि ऐसें शंकाराचार्यासि । कोप आला फार मानसिं । धाडिते जाहले शिष्यासि । उभयतासि आणा म्हणति ॥ २५ ॥ तात्काळ जावोनि ब्राह्मणें । सुचविलें सकळ वर्तमान । जयराम स्वामि आणि श्रीकृष्ण । आचार्या येवोनि नमस्कारिले ॥ २६ ॥ तये काळिं जगद्गुरुनि । कोप करितां गुरुशिष्या मनिं । यज्ञोपवितें समर्पोनि । निघोनि गेले गुफेसि ॥ २७ ॥ इतुकें कृत्य होतांचि पाहि । नवल

वर्तलें ऐका तेंहि । गुप्त जाह्लीं जानवें ठाईं । सर्व ह्रदईं चिंतातुर ॥ २८ ॥ आचार्यांचे समागमिचे । ब्राह्मण सकळ वडगाविचे । निस्तेज जाह्ले विप्र साचे । तर्क कवणाचे न चलति ॥ २९ ॥ दुर्जी घालिता अभिमंत्रून । तींहि जाति अदृश्य होऊनि । स्नानसंध्या कैचें भोजन । बैसले जाण तटस्थ ॥ १३० ॥ जैसा गोकुळिं श्रीकृष्णानें । नृत्य आरंभिलें प्रितिकरून । तये वेळिं सकळ जन । करिति नर्तन चराचरिं ॥ ३१ ॥ कृष्णे झाकितां निजडोळे । गोपिगोपाळ जन आंधळे । श्रवणिं घालितां करांगुळें । बधीर सकळ प्राणि ते ॥ ३२ ॥ तैसि च येथें गोष्ट घडलि । विप्रमंडाळि चकित जालि । अभिमान सांडुनि शरण गेले । कृष्णमाऊलि जयरामा ॥ ३३ ॥ सोळासहस्र भोगुनि नारी । जो कां म्हणवि ब्रह्मचारि । तो हा अवतार पृथ्वीवरी । देहधारि जगद्गुरु ॥ ३४ ॥ जयाचे वर्णितां ज्यारकर्म । प्राणि पावति निजधाम । तयासि म्हणति भ्रष्ट अधम । नाडिले परम ते हितां ॥३५॥ असो शंकराचार्य आणि ब्राह्मण । कृपा भाकिति दीनवदन । कृष्णस्वामिचे वंदिले चरण । पदर पसरोनि सर्वांनीं ॥ ३६ ॥ म्हणति ब्राह्मण्य आम्हासि द्यावे । यज्ञोपवित आपण घालावे । दृष्टिसि दिसतां मानव । प्रत्यक्ष देव ईश्वर तुम्ही ॥ ३७ ॥ न जाणोनि केलें छळण । तेणें गेलें ब्राह्मणपण । जानवीं घालितां अभिमंत्रून । गुप्त जाण तीं होति ॥ ३८ ॥ स्नान संध्या राहिलि सकळ । उपोषणानें फिरति डोळे । दयासिंधु स्वामि केवळ । अपराध घडले बहुत पैं ॥ ३९ ॥ ऐसे स्तवितां विप्रानिं । कळवळा कृष्ण मनिं । यज्ञोपवितें गुरुशिष्यानिं । घातलें जाण उभयतां ॥ १४० ॥ येन्हवीं काय जानव्या रहित । श्रीकृष्णस्वामि जयराम होते । त्रिगुण जाणुनि स्वरूपीं रत । यज्ञोपवीत तेंचि पैं ॥ ४१ ॥ ज्ञान गंगेंत सदा स्नान । जेथें दृश्याचें जालें आचमन । लाविंयेलें गोपिचंदन । इंद्रियें करून येकात्मता ॥४२॥ मायाब्रह्म लक्षुनि संधि । संध्या सारली ते चि संधि । आत्मया सूर्य अर्घ्य साधी । त्रिकाळ विधि सहजि तो ॥ ४३ ॥ नादानुसंधान

संधान अखंड जप । कैचा तेथें संकल्प विकल्प । एकवीस हजार साहाशे माप । अक्षे सोहं ध्वनि ॥ ४४ ॥ जीव शिव एक जाहले । ते चि पर्वणि तर्पण केलें । हृदयासनिं पूजियेले । आत्मया भले सर्वा-भूति ॥ ४५ ॥ ज्ञानाग्निमाजि पाहि । होमियले विषय ते हि । आतिथ्य करणें सर्वदा हि । सर्व ठाइं निरंतर ॥ ४६ ॥ सस्वरूपीं सदा निमग्न । नित्य तृप्ति ते भोजन । श्रीकृष्ण स्वामि जयराम पूर्ण । षट्कर्मि निमग्न सर्वदा ॥ ४७ ॥ असो शास्त्ररीत्या जनाकारणें । जानवें घातलें कृष्णमूर्तिनें । शंकराचार्य आणि ब्राह्मण । आनंदले जाण सर्वत्र ॥ ४८ ॥ पुढें कथा चमत्कार । परिसोत सकळ नारीनर । भाव धरितां कामना पुरे । श्रवण मात्रें करूनी ॥ ४९ ॥ सिद्ध कृपा राजारामि । ग्रंथ करविता तो चि स्वामि । जो का उभा हृदय धामिं । विठ्ठल नेहमीं विटेवरी ॥ १५० ॥ भक्तमंजिरीमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । श्रीकृष्ण जयराम चरित्रातें । अध्याय हो द्वितीय हा ॥ १५१ ॥ श्रीरामार्पणमस्तु । अनुक्रमें अध्याय १३ वा ॥

---

## अध्याय १४ वा

नमो सद्गुरु निजआत्मसिद्धा । जयराम कृष्ण पुराण प्रसिद्धा । पंढरिनिवासा जगद्वंद्या । सकळ आद्या श्रीमूर्ति ॥ १ ॥ पिंड ब्रह्मांड व्यापुनि ठेला । दश अंगुळें असे उरला । भाव पुंडलीकें उभा केला । अनुभव देखिला गुरुपुत्रें ॥ २ ॥ तूर्या उन्मनी ते राही रुक्मिणि । सदा कीर्तन सोहं ध्वनि । वैराग्य विचार सन्मुख नैनि । गरूड आणि हनुमंत ॥ ३ ॥ आत्मवेत्ते साधु संत । दर्शन तयासि असे नित्य । वाळुवंट ते चिन्मय सत्य । सत्रावी तीर्थ चंद्रभागा ॥ ४ ॥ समानभूति समचरण । चराचारें व्यापक पूर्ण । साजिरे ध्यान सुलक्षण । वर्णि कोण तया सुखा ॥ ५ ॥ असो तया निजात्म पादिं । नमन माझें सर्वा त्रिशुद्दि । भक्त कथेसि चेतवि बुद्धि । दयानिधि श्रीगुरु ॥ ६ ॥ सिंव्हावलोकन कथा मागिल । कृष्ण स्वामिंसि माझणें छळिले । मागुति विप्र शरण

गेले । पाया लागले सकळीक ॥ ७ ॥ पुढें कीर्ति उत्कृष्ट जाहालि । जनयात्रा फार मिळालि । म्हणति असतां अघोर कलि । अवतारलि कृष्णमायें ॥ ८ ॥ मानवरूप दिसते पारि । संतरूपें हा श्रीहरि । जेणें यज्ञोपवीत करितां दुरि । जानवि सारि गोळिति ॥ ९ ॥ फाकतां ऐसि जगिं मात । जयरामासि वदति कृष्णनाथ । आतां होणें अम्हासि गुप्त । वियोग चित्ति न धरि तूं ॥ १० ॥ तये काळीं जयरामस्वामि । शोकें दाटले अंतर्यामि । श्रीकृष्ण म्हणति किंचित भूमि । होतसे मी आड येथें ॥ ११ ॥ मग पृथ्वी अंतरगत । बैसते जाहले सद्गुरुनाथ । प्राणायाम करूनि जिवंत । समाधिस्त पै जाहले ॥ १२ ॥ शके पंधराशे साठ माघ मास । संवत्सरा नाम परिधावी असे। आदित्यवार उत्तम दिवस । पौर्णिमेस शुद्ध तिथि ॥ १३ ॥ यजुर्वेदि श्रीकृष्ण । आदित्य पुराणीं असे वचन । संतरूपें अवतरणें। यालागि करणें वेदिऽस्या ॥ १४ ॥ गाध्यांदिनि शाखेठाईं । कृष्णस्वामि जन्मले पाहि । तो चि समय जाणुनि ह्रदईं । घेतला देहिं समाति ॥१५॥ दोन प्रहर अभिजित वेळा । माध्यान्हासि सूर्य आला । तये वेळिं योग साधिला । निर्गुणाला मिळावया ॥ १६ ॥ ते काळिंचा उछाह वर्णितां । मना होतसे तादात्म्यता । शिवादिक ऐकोनि वार्ता । आले सर्वथा वटग्रामीं ॥ १७ ॥ पूजेसि पातले सनकादिक । व्यास वसिष्ठ स्वामि शुक । नारद नाचति कौतुकें । ब्रह्मसुख वर्णोनि ॥ १८ ॥ असो सद्गुरु श्रीकृष्णानि । आसन घालोनि आडधरणिं । सहस्र दळिं स्थिरावोनि । निर्गुण सदनि पावले ॥ १९ ॥ वृंदावन स्थापोनि बरवें । सेवा करिति जयराम भावें । पुढें अपूर्व ते ऐकावें । धरूनि भाव येकात्मता ॥ २० ॥ हरिबाई निस्सीम भक्तिचि । अनुग्रहीत शिष्यिणि कृष्णस्वामिचि । वार्ता अवतार समाप्तिचि । आली सान्नि ऐकोनि ॥ २१ ॥ म्हणे मजला न देतां दर्शन । कैसे केलें निज प्रयाण । ऐसा अपराध घडला कोण । अंतरले चरण मज दिना ॥ २२ ॥ जयरामपदिं घालोनि मिठि । शोकाकुळ

होतसे कष्टि। निश्चय केला न होतां भेटि। उठाउठि प्राण देईन ॥२३॥ वृंदावना भोवति पाहि। गडबडा लोळत असे महिं। वृत्ति वेधलि श्रीगुरुपाईं। भान नाहिं देहाचे ॥ २४ ॥ समजाविति समस्त जन। न होय परि समाधान। म्हणे मजसि बोलेल कृष्ण। तरि च धरणें देहासि ॥ २५ ॥ सद्गुरुकृपा नसतां पाहि। व्यर्थ जिणें मग कांहिं। ऐशा प्रकारें दीन त्रेई। त्या ठाईं बैसलीसे ॥ २६ ॥ जैसे का आत्मा-स्वामिनि। निश्चय धरूनि चितास्थानिं। पद गाईले करुणा भाकुनि। पूर्वार्धे करूनि तीन कडवीं ॥ २७ ॥ समाधीतुनि तये कालिं। बोलति जाहली गुरुमाउली। चिद्गगनिं गर्जोनि बोलि। केली साउलि श्रीरंगें ॥२८॥ तैसा चि येथें विच्यार घडला। जयराम स्वामिसि दृष्टांत पडला। चिरा उघडुनि हरिबाईला। करायिला दर्शन ते ॥ २९ ॥ जैसे ज्ञानेश्वर येकनाथासि। सुचवि समाधि उवडावयासि। आजान वृक्षाचे मुळि गळ्यासि। काढावयासि गुंतली ते ॥ ३० ॥ तयापरि येथें जाहले। श्रीकृष्ण स्वामि हृदईं द्रवले। हरिबाईसि दर्शन दिधलें। समजाविलें प्रिति करूनि ॥ ३१ ॥ म्हणति सबाह्य मी चि असे। वाया चि करिसि मिथ्या क्लेश। रिता ठाव कांहिं नसे। पूर्णत्व विलसे चराचरिं ॥ ३२ ॥ आकाशामाजी जेवि पाहि। ढग येति अनेक ते हि। नासावया वेळ नाहिं। तैसी गति देहाते ॥ ३३ ॥ किंवा उदकीं तरंग। नानाविध भासति चांग। तैसा आत्मया शरीर संग। न्हावया संग उशिर कैचा ॥ ३४ ॥ जाणें येणें सकळ भ्रांति। अखंडाकार स्वरूप स्थिति। कायवा उगि भ्रमली मति। वियोग चित्ति न धरि तूं ॥ ३५ ॥ वस्त्र जीर्ण होतां जैसें। त्याग करणें कायेसि तैसें। स्मरतां जवळि सिद्ध असे। चिदाकाश तयापरि ॥ ३६ ॥ ऐसे बोधितां श्रीकृष्णमूर्ति। हरीबाईसि आनंद चित्ति। आज्ञा घेउनि सत्वर गति। नमन प्रिति करितसे ॥ ३७ ॥ पूर्ववत् जयराम स्वामिनि। चिरा लावुनि मागुतेनि। हरिबाई नमन करूनि। गेलि स्थानिं आपुल्या त्या ॥ ३८ ॥ सद्गुरुचरणिं निजध्यास। तेणें पावली निजपदास।

धन्य अवतार कृष्ण योगेश । जाहला विशेष कलीमाजि ॥ ३९ ॥ जयरामनामें श्री येकनाथ । प्रकट जाले या चि अर्थे । करावया गुरुभक्तिते । जन्म घेत पुन्हः पुन्हा ॥ ४० ॥ समाधिचे करोनि पूजन । प्रत्यहिं करावें तेथें कीर्तन । सेवाधर्म अनुष्ठान । हे चि पूर्ण वृत्त पै ॥ ४१ ॥ रात्र दिवस तो चि धंदा । ध्यान करित बसणें सदा । वैराग्य भाग्य थोर संपदा । नाहिं आपदा द्वैताचि ॥ ४२ ॥ धन्य तयाचें अर्चन। वेदाध्ययन भिक्षाटण। सर्वाभूतिं अन्नदान। मुखिं चिंतन नामाचें ॥४३॥ सद्गुरु कृष्णाविण काहिं । देवत ज्यासि दुजें नाहिं । समाधिरत बैसले ठांईं । तन्मय पाहि क्षणक्षणा ॥ ४४ जे जे प्राणि दर्शना येति। त्रिविध ताप तयाचे शमति । तात्काळ होय उपरति । आत्मस्थिति बरि तया ॥४५॥ कैसा हि कोण्हि भेटीसि येता । समाधान करणें तत्वता । पूर्ण करावें मनोरथा । असेल चित्ता ईछा ते ॥४६॥ येकनाथ अवतार जाहला क्षितिं । जयरामनामें हा निश्चिति । जगत्रै फाकली कीर्ति । पाहावया येति सकळिक ॥४७॥ तव माईणि माहालात अविंद पठाण । अति उन्मत जयाचें आचरण । जयरामस्वामिचे माहत्म तेणें । केलें श्रवण जनमुखें ॥ ४८ ॥ म्हणे आणवावा ऐसा पुरुष । चित्ति लागला निजध्यास । जयाते जग स्तवितसे। काय असे सामर्थ्य पै ॥४९॥ चित्ति धरूनि छळक भाव । पत्रिका लिहिली बहु गौरवें । पाठविले सेवक बरवे । जयराम गौरवें आणावया ॥ ५० ॥ लोक येवोनि वडगावासि । अवलोकिले माहराजासि । तव लोटति समाधिपासि । खराव्यासि घेउनि ॥ ५१ ॥ कौपिन परिधान जटाभार । शुकासारिखे ध्यान साजिरे । पत्रिका टाकिलि तयासमोर । चला सत्वर म्हणति पै ॥ ५२ ॥ जयराम होते तैसे चि निघाले । तया यवना जवळि पातले । पठाणानें आश्चिर्य केले । चाकाटले मन तयाचे ॥ ५३ ॥ काहिंच येथें सामर्थ्य नसतां । जन बोलते अवघे वृथा । छळण अरंभिलें मूर्खे तत्वता । नाहिं सर्वथा विवेक ज्या ॥५४॥ मास घालोनि भरिले ताट । वस्त्र झाकिले मस्ते घुंवट।

स्वामिपुढें आणुनि स्पष्ट। काम नष्ट बोले तो ॥ ५५ ॥ न सांगतां पदार्थ आतिला। भ्रष्ट करीन विप्रा तुजला। कान फुंकोन वेडे जगाला। बहुता केला उपदेश ॥ ५६ जैसा खळ दुःशासन । द्रौपदिसि गांजि दुरोक्ति करून। तैसे निष्ठुर करितां भाषण। हास्यवदन केलें पै ॥ ५७ ॥ म्हणति यवना काय बोलसि । आप आपणासि नोळखिसि। सांगतां आतिल पदार्थासि । काय देसि आम्हाते ॥ ५८ ॥ जयाचे सत्ते पंचभूतें। राहाटति आपुल्या स्वधर्मातें । तो हा अवतार येकनाथ। जयराम सत्य नामे करूनि ॥ ५९ ॥ जयापासिं तिष्ठति सिद्धि। ते पाहाति ते दिव्यौपधि। दुजा पदार्थ न दिसे कधि। आत्मा त्रिशुद्धि चहुंकडे ॥ ६० ॥ तेथें अविंद पामर पठाण। परिक्षा अरंभिली मूर्खे तेणें। स्वामी बोलति ज्यासिविनि सुमने। आहेति जाण ताटांत पै ॥६१॥ तात्काळ पात्र उघडुनि पाहतां। पुष्पें जाहली ती तत्वता। यवनें चरणिं ठेविला माथा। लागला पंथा भक्तिचे ॥ ६२ ॥ अनन्य भावें शरण येता। अविंद पावला सार्थकता। जैसा वाल्मिक करुणा भाकिता। पावन सर्वथा जाहला तो ॥ ६३ ॥ असो ऐसे प्राणि करति। उद्धरिले तेणें जगतिं। उदय जाहला ज्ञान गभस्ति। अज्ञान भ्रांति निवारावया ॥ ६४ ॥ पुढें कांहिं दिवसानि। काशिस गेले मोक्षदानि। तेथें नवल केलि करणि। श्रोतिं श्रवणिं अवधारा ॥ ६५॥ अनंत देव ब्राह्मण। चुतुःशास्त्रि कर्मठ जाण। आराध्य जयाचे निजकृष्ण। येकविध पूर्ण उपासक ॥ ६६ ॥ उछाह करणें जन्म अष्टमिचा। परंपरा नेम तयाचा। प्रताप ऐकोनि जयरामस्वामिचा। वेधला साच मनोभाव ॥ ६७ ॥ म्हणति महाराज श्रींचा दिवस। सांग करणें आपणास। चार दिवस करुनि वास। न्याहाया सिद्धिस समारंभ ॥ ६८ ॥ कीर्तन विधि श्रवणासि। हेतु समस्त शिष्ट मानसिं। यास्तव प्रार्थना पायासि। केलि स्वामिसि अनन्य ॥ ६९ ॥ अनंत भटजींचें जाणुनि प्रेम। मान्य केले श्रीजयरामें। जन्मकाळ करावा नेम। कीर्तन धर्म अरंभिला ॥ ७० ॥

कादिक्षेत्रचे आत्मवेत्ते । माइन पंडित बैसले श्रोते । कथा करिति जयराम समर्थ । पाहणें तेथें काय मग ॥७१॥ श्लेषार्थ संकेत प्रश्नोत्तरें । आशंका निरसन शास्त्राधारें । आनंदा बहर परस्परें । संवाद थोर वर्णि-येति ॥ ७२ ॥ मध्यरात्र होति जाहली । जन्मकाळिचि वेळा आलि । जयराम स्वामिनि आठविली । हृदई मलि श्रीमूर्ति ॥ ७३ ॥ साजिरे ध्यान सुलक्षण । आकर्ण दृष्टि हस्यवदन । वाळवीळा साजीरि पूर्ण । वाचे मौन वर्णिता ते ॥ ७४ ॥ चिंतन करिता मनामाजि । श्रीकृष्ण प्रगटले तेथें सहजिं । देहभान गेलें सकळ समाजिं । देव राजी निजभक्ता ॥७५॥ चित्रवत बैसलि अवघी सभा । जयरामकथेचि ऐसि शोभा । सबाह्य कोंदली जेथें प्रभा । व्यापिलें नभा ज्या तेजें ॥ ७६ ॥ मुहूर्तमात्र हा विलास । स्मृति आली मग सर्वांस । श्रोते सावध होउनि कथेस । अवधानास अनुसरले ॥७७॥ जयराम स्वामिनीं प्रगटवीला हरि । उचलोनि घेतला खांदियावरि । कीर्तन रस वदे वैखरि । प्रेम नेत्रीं वाहातसे ॥७८॥ तव ईतकीयांत अनंतदेवें । दृष्टि देखिला वासुदेव । ऐका श्रोते समूळ भाव । कथा गौरव गोष्टि ते ॥ ७९ ॥ जयराम स्वामिचे स्कंदावरि । बैसले होते जे पूतनारि । बाल्यस्वरूप कुंचि शिरिं । चिन्हें साजीरि अंगि तिं ॥ ८० ॥ तयाकडे अकस्मात । पाहते जाहले भटजी अनंत । विपरीत बुद्धि आलि मनांत । बुडाले चित्त संशयनदीं ॥ ८१ ॥ श्रीमंत मानराचे मूळ । अनंत देवासि ऐसे भासले । जयराम स्वामिनिं खांदिं घेतले । हेचि वाटले तयाते ॥ ८२ ॥ आर्जव थोराचे संतासि । कासया करणें निस्पृहासि । कीर्तन करिता बाळकासि । खेळ्पासि उचित नव्हे ॥ ८३ ॥ संदेह ऐसा येता जाला । भगवान नाहिं वोळखिला । भ्रांति पडली असे बुबुळा । अनंत भटाला ते समई ॥ ८४ ॥ श्रोत्यासि म्हणे तो ब्राह्मण । जयराम स्वामिसि करा प्रश्न । कथेंत मूल घेउन नाचणें । अयोग्य जाण हे सर्वथा ॥ ८५ ॥ समक्ष बोलता भीड वाटे । आपण सर्वत्र सांगा स्पष्ट । कीर्तनरस सांडुनि मीष्ट । आर्जव नष्ट कासया ॥ ८६ ॥ अनंत देवें आतां ऐसें ।

सर्वत्रासि आलें हसें । स्कंदिं अर्भक नसतां कैसें । जयराम स्वामिस सुचवावें ॥ ८७ ॥ समस्तानि ऐशापरि । साक्ष देतां विप्रअंतरिं । पश्चात्ताप जाहला भारि । केळो बोहरि विपयासि ॥ ८८ ॥ तात्काळ पूर्ण जाहलें वैराग्य । अष्टौभाव व्यापिलें आंत । जयराम स्वामिसि साष्टांग । नमन निसंग केलें पै ॥ ८९ ॥ सदढ धरुनि चरण कमळा । अभिषेक केला । म्हणे श्रीकृष्ण प्रत्यक्ष देखिला । पाहे डोळा भरुनि पै ॥ ९० ॥ आतां स्वामिया कृपा करणें । अनुग्रह थावा निजपूर्ण । मज अनाथा पदरिं घेणें । हें चि मागणें गुरुवर्या ॥ ९१ ॥ दीनवदन ऐशापरि । अनंत देव लोळति पायावरि । जयराम स्वामीनिं दोहिकरिं । धरिलें शरिर उचलोनि ॥ ९२ ॥ कीर्तन समाप्त होतां चि जाण । उपदेश घ्यावया मांडिलें पूजन । अनंत देव प्रितिकरून । पाय धुवोनि घेतलें तीर्थ ॥ ९३ ॥ यथाविधि शास्त्ररिति । सांग केलें अर्चन निगुति । प्रार्थना करुनि अनन्यभक्ति । स्वरूप स्थिति दावा म्हणे ॥ ९४ ॥ बोले स्वामिया कृष्णाविणे । दृष्टि न पडो पदार्थ आन । येवढें मागतो कृपादान । समाधान तरि च पै ॥ ९५ ॥ जयराम स्वामी कृपा समुद्र । विप्रवाक्य तेथें उदेला चंद्र । मग तेथें सहजीं भद्र । जेवि कर्पेद्र सुखार्णवि ॥९६॥ तात्काळ मंत्र सांगोनि कर्णिं । श्रीकृष्ण स्वरूप दाविलें नैनिं । पंचम अवस्था बाणोनि । निमग्न मनिं अनंत भटजी ॥९७ ॥ सहज समाधि अद्वय स्थिति । अखंडाकार स्वयं ज्योति । अंतरबाह्य व्यापिलि मूर्ति । जाहालि वृत्ति तन्मय ते ॥९८॥ अवस्था त्रै अगाधु । प्राप्त जाहला निज आत्मबोधु । दृश्यादृश्य सरला भेदु । भरला आनंद हृदईं त्या ॥ ९९ ॥ मग दिनत्रय राहतां तेथें । उछाह जाहला सहजी समाप्त । जयरामस्वामि बदिकाश्रमातें । गेले समर्थ काशिहुनि ॥ १०० ॥ अपूर्व स्थान पाहून । चित्तासि वाटलें समाधान । राहते जाहले कांहिं दिन । तीर्थ सेवन करावया ॥ १ ॥ तत्र तेथें एक ब्राह्मण । काशीपंत ज्याचें नामाभिधान । न्हावया आत्म प्राप्ति पूर्ण । अनुष्ठान करितसे ॥ २ ॥ तयासि प्रत्यक्ष दर्शन ।

देता जाहला नारायण । ते चि सुंदर ऐका कथन । श्रोते सज्ञान सकळिक ॥ ३ ॥ मूर्ति प्रगटोन चतुर्भुज । प्रसन्न जाहले गरुडध्वज । बोलति स्वयें माहाराज । लक्ष्मी भाज त्याचि ते ॥ ४ ॥ जयराम नामें श्रीयेकनाथें । अवतार जाहला सुनिश्चीत । ते चि साधु आले येथें । शरण त्वरित जावें तुवा ॥ ५ ॥ होईल सहजीं आत्मज्ञान । पावसी निश्चळ समाधान । त्रिविध ताप होति शमन । धरिता चरण श्रीगुरुचे ॥ ६ ॥ वरप्रदान देउन ऐसें । अदृश्य जाहले जगन्निवास । काळोपंत अति उल्हासें । आले तीर्थासि जवळि त्या ॥ ७ ॥ तव तेथें जयराम समर्थ । आसन घालुनि बैसले स्वस्थ । स्नानसंधेमाजि निवांत । तन्मय चित्त जाहलेसे ॥ ८ ॥ इडा पिंगळा करूनि ग्रास । शिखुम्ना भेद स्वयं प्रकाश । सहस्रदळिं चिदविलास । प्राणायामास साधियेलें ॥ ९ ॥ ब्रह्मरंध्रिं वृत्ति लीन । स्वरूपाकार जाहलें मन । नसे चि कांहिं देहभान । इंद्रियें पूर्ण येकवटलीं ॥ १० ॥ ऐशा प्रकारें प्रातःकाळिं । तीर्थावरि मूर्ति पाहिली । सूर्याभिमुख होति बैसली । गुरुमाउली जयराम ॥ ११ ॥ काळोपंतें जाउनि तेथें । नमन केलें सद्गुरुपदातें । पाहावया सामर्थ्यातें । छळणाते आरंभिलें ॥ १२ ॥ द्वापारयुगिचा गोपाळ । संगें जयाच्या श्रीकृष्ण खेळे । तो चि विप्र हा प्रांजळ । बहुत काळ सलगिचा ॥ १३ ॥ तो स्वभाव अंगिं पहिला । चेष्टा मनिं असति भरल्या । जयरामासि दावि लीला । टाकिता जाहला तीर्थांत ॥ १४ ॥ माहराज स्वस्थ उदकावरि । पूर्ववत बैसले निर्धारिं । चित्त विराले स्वरूपांबरिं । नाहिं अंतरिं विक्षेपता ॥ १५ ॥ जळामध्यें जयराम । तळ्यांत शोभे जैसें पद्म । काळोपंतें देखोनि प्रेम । अनुताप परम जाहला तया ॥ १६ ॥ घळघळा नेत्रिं अश्रु वाहति । अष्टौ भाव दाटले चित्तिं । मांवावली असे वृत्ति । नसे स्थिति सावध ते ॥ १७ ॥ अक्षोभ पाणि भरलें तळें । उदक पाहतां भोंवति खोलें । आंत जावया शक्ति न चले । नव जाय काढिले स्वामिते ॥ १८ ॥ मग युक्ति काळोपंतें । आरंभिली ती ऐका श्रोते । नमनविधि प्रायश्चित । मांडला त्वरित तेथें पै ॥ १९ ॥ साष्टां-

गेसि नमस्कार । घालिता जाहला तो द्विजवर । तव दिवस आला सवा प्रहर । देह्यावर आले जयराम ॥१२०॥ पाहात जळांत आसना सहित । आपण बैसले आहेत स्वस्थ । पुढें नमस्कार असे घालित । देखिला निश्चित विप्र तो ॥२१॥ म्हणति असता तीर्थतटाकीं । कोण्हि टाकीले आम्हासि उदकीं । अंतरिं भावना जाणिलि निकी । कन्य शेरिं नमन कर्याचें ॥ २२ ॥ मग जैशापरि भूमिवरून । चालताति सकळ जन । तयापरि जयराम जाण । जळावरूनि चालत आले ॥ २३ ॥ काळोपंतें लवलाहि । धांवत येवानि लागले पाईं । सद्ट चरणीं ठेविलि डोई । जाहला हृदईं अनुताप ॥ २४ ॥ नेत्रोदकें पदारविंदा । स्नान घातिलें प्रेमें सदा । क्षमा करावे श्री अपराधा । ऐसें पदा विनवीतसे ॥ २५ ॥ जयरामस्वामिनिं अभयहस्तें । कुरवाळिला तो द्विज निश्चित । निजकुमर पाहुनि श्रीरामाते । कृपा भरते तयापरि ॥ २६ ॥ काळोबानिं वृत्तात पहिला । निवेदन केला श्रीचरणाला । दयासिंधु उचंबळला । प्रसन्न जाहला सद्गुरु ॥ २७ ॥ मग तात्कालिक द्विजें तेणें । आरंभिले स्वामि पूजन । समर्पुनि हृदयासन । केलें स्थापन श्रीगुरुपदा ॥ २८ ॥ अर्घ्य पाद्य ते अद्वय । आचमन जाहलें भेदत्रय । स्नानविधि निःसंशय । वसन अद्वय साजिरें ॥ २९ ॥ उपवस्त्र यज्ञोपवीत । गंधाक्षता सुमनें बहुत । सुगंधमाळा घातिली गळ्यांत । तुळसि शोभत वैजयंति ॥ १३० ॥ वासनेचा जाळून धूप । सोहंभावें लाविला दीप । स्वात्मसुख ते अमूप । नैवेद्य षडप ते चि पै ॥ ३१ ॥ त्रयोदश गुणि तांबुल दिला । सर्वात्मता तो रंगोनि ठेला । आत्मनिवेदन गुरुपदाला । श्रीफळाला समर्पिले ॥ ३२ ॥ प्रत्यग ज्योति निरांजन । मंत्रपुष्प ते चि पूर्ण । प्रदक्षणा सहजी नमन । ते चि उन्मन परमात्मा ॥ ३३ ॥ ऐशा प्रकारें पूजन होता । प्रसाद लाधला काळोपंता । मंत्रोपदेश जाहला निरूता । शुद्ध पाहता अनुकंपें ॥ ३४ ॥ श्रवणिं बीज जे पेरिलें । नैनिं तात्काळ ते उगवले । अंतर्बाह्य पुंजाळले । तेज भरलें चहुंकडे ॥ ३५ ॥ प्रळयोदकीं जयापरि । नदि नदा कैचे

उरि । द्वैताद्वैत ते कुसरि । जाहली सरि तैसि ते ॥ ३६ ॥ सकळ काळाचा होउनि काळ । पिंड ब्रह्मांड ग्रासिले सकळ । काळोपंत जाहले निश्चळ । स्वरूप प्रांजळ स्वतसिद्ध ॥ ३७ ॥ धन्य सद्गुरु श्री जयराम । धन्य शिष्य तो विप्रोत्तम । जन्मांतरिंचा गोपाळ नेम । जाणिलें प्रेम स्वामिनि ॥ ३८ ॥ नाम ठेविले ते चि प्रिति । गोपाळस्वामि तो निश्चिति । जेथोनि पंथ चालिला क्षिति । कृष्णमूर्ति जयरामाचा ॥ ३९ ॥ रामदास स्वामिचा शिष्य कल्याण । तैसा चि गोपाळ हा निधान । जयाचे वर्णिता महिमान । वाचेसि होणें विश्रांति ॥ १४० ॥ गुरू भक्ताचि वानितां कीर्ति । सकळ सुखें वोळंगति । ते चि पुढे ऐका श्रोति । येकाग्र वृत्ति करोनि ॥ ४१ ॥ सिध स्वामि माहसमर्थ । दास तयाचा मी अंकीत । आज्ञोक्तिचा होतसे ग्रंथ । कृपा यथार्थ श्रीगुरूचि ॥४२॥ जगदोद्धारार्थ पंढरिसि । उभा ठाकला जो हृषिकेशि । ध्यावयाते पूजेसि । साहित्यासि स्वयें जाला ॥ ४३ ॥ राजारामी हे चि आतां । मागणें तुम्हा सकळ संता । सिद्ध होउनि हृदईं कथा । आठवा समस्ता आपुल्या पै ॥४४॥ भक्तमंजरीमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । श्रीकृष्णजयरामचरित्राते । अध्याय समास तृतीय हा ॥ १४४ ॥ अनुक्रमें आध्याय ॥ १४ ॥

॥ अध्याय १५ वा ॥

श्री गणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जयाजी पुराणपुरुषा । रज अव्यया अविनाशा । अत्मयारामा स्वयंप्रकाशा । श्रीसिद्धेशा ्रुरुमूर्ति ॥ १ ॥ तुझिये सत्तें सर्व चाले । भूताभूत असे व्याले । सेखि ाइंचे ठाईं संचलें । झालें गेलें नसे चि पै ॥ २ ॥ प्रत्यक्ष हा जड ्ह । चेष्टवितसा लघलाहे । विचरति व्यापारा इंद्रियें । धर्म पाहे ापुलाले ॥ ३ ॥ दृष्टि असोनि मांस बोळा । आत सांठवला ब्रह्मांड-ोळा । श्रवणि ऐकावया चि कळा । स्वाद भला जिव्हेते ॥ ४ ॥

घ्राण घेतसे गंधि । स्पर्श विषयोत्यके संधि । मना मनपणाचि वृद्धि । सिद्धि कर्मे इंद्रियासि ॥ ५ ॥ असो रोमरंध्रिं सकळकळा । तुझ्याच असति जी गोपाळा । भोग भोगोनि निराळा । राहसि भला आत्मया तूं ॥ ६ ॥ चूंबक सन्निध लोहचळे । तेवि त्वदाश्रयें ब्रह्मांड चाले । खेळ खेळोनि वेघळे । राघव दयाळ आपण ते ॥ ७ ॥ वाढवावया निजभक्ति । भक्तस्वरूपा धरोनि श्रीपति । नटोनि आपआपणाप्रति । सर्व जगति उद्धरि तसा ॥ ८ ॥ भक्तिचें रूप न कळे कवणा । धकली वाणि पावलि मौना । तें सुख करावया गणना । सहस्र वदना विस्मयो ॥ ९ ॥ निवृत्तींत वर्ते साधु जन । तयासि तेथें प्रवेश जाण । भक्ति गृहिं नांदति पूर्ण । वाणीं कोण स्वसुख ते ॥ १० ॥ धन्य धन्य तयाचा महिमा । जीवा न्हेति स्वसुखधामा । जयाचे गुण वर्णितां प्रेमा । सर्वोत्तमा आनंद पै ॥ ११ ॥ ऐसे समर्थ ते संत । चरित्र तयाचें ऐका श्रोते । जेणें करितां सकळ अर्थ । होति प्राप्त प्राणिया ॥ १२ ॥ मागिल अध्याईं इतिहास । जयरामें उपदेशिला काळोबा शिष्य । नाम ठेविलें गोपाळ तयास । जन्मांतर जाणुनि ॥ १३ ॥ मग बद्रिकाश्रमीं कांहिं दिवस । करिते जाहले उभयता वास । तेथुनि मागुति वटग्रामास । धरिले पंथास यावया ॥ १४ ॥ मार्गामाजि येता पाहि । वस्तिस राहिले काशिस ठाईं । क्रमोनि तेथें दीन त्रई । निघाले पाहि गुरुशिष्य ॥ १५ ॥ जे जे भेटति वाटेसि प्राणि । मुक्ति होतसे तया दर्शनिं । ठाईं ठाईं तीर्थें करूनि । संतभजनिं तोषवीत ॥ १६ ॥ ऐशा प्रकारें चालता पंथ । मार्गि लागला सात पुज्याचा पर्वत । नवल वर्तलें तेथें कैसें । सकळ श्रोते तें ऐका ॥ १७ ॥ जयराम स्वामिची स्थिति पाहातां । क्षणक्षणा होय तादात्म्यता । अखंडाकार पाचवी अवस्था । नाम सर्वथा तये उन्मनि ॥ १८ ॥ कांहिं तुर्या कांहिं उन्मनि । संत वर्तति ऐसे जनिं । जयराम हृदईं निशिदिनिं । बहुत उन्मनि भोगितसे ॥ १९ ॥ वारंवार तेणें समाधि । विरोनि जातसे स्वरूपीं बुद्धि । देहभान नसे शुद्धि । आत्मसिद्धि सहजी ते ॥ २० ॥ पूर्ण योगि

ऐसे समर्थ । जयराम स्वामि शिष्यासहीत । येते जाहले फिरत फिरत । उत्तम पर्वत तये स्थानीं ॥ २१ ॥ सुशितळ छाया वृक्ष पवित्र । अश्वथ पाहूनि विस्तीर्ण नेत्रें । चमत्कारिक दिसति पत्रें । दाटि विचित्र पर्णांचि ॥ २२ ॥ तया पिंपळासि टेकोन । बैसले समर्थ जयराम जाण । सहज समाधि घेरिलें तेणें । देहस्मृति पूर्ण नसे पै ॥ २३ ॥ सच्छिष्य गोपाळ जवळि असतां । ब्रम्हराक्षस देखिला वृक्षावरुता । तयासि म्हणति बोल आतां । आहेसि सर्वथा कोण येथें ॥ २४ ॥ साबरि मंत्र समस्त । गोपाळ स्वामिसि असे विदित । बोलवावया पिशाचाते । अंगि सामर्थ्य जयाच्या ॥ २५ ॥ तात्काळ समंध आज्ञा वंदून । उतरला खालीं झाडावरून । गोपाळजीस लोटांगण । केलें वंदन साष्टांगें ॥२६॥ दीनवदनें जोडुनि कर । उभा ठाकला पिश्याच समोर । दर्शन मात्रें जाहला स्मर । जन्मांतर सकळ कांहिं ॥२७॥ कथिलें सकळ पूर्विल दोष । शरण आला ब्रह्मराक्षस । म्हणे मजला मुक्तिपदास । मेळवा निःशेष झडकरि ॥२८॥ येक्या कीर्तनाचें पुण्य देतां । पावन होईन मी सर्वथा । ऐसा समंध जाहला बोलता । गोपाळसंता तत्समईं ॥ २९ ॥ तव इतुकियांत जयराम समर्थ । सावध होउनि जाणिलें चित्तें । प्रश्न केला गोपाळजीतें । होतासि बोलत कवणासि ॥ ३० ॥ आज्ञा वंदूनि गोपाळ शिष्यानें । जाहलें समग्र केलें कथन । म्हणे पिश्याच आहे दारुण । ब्रह्मराक्षस पुरुष जाणे पै ॥ ३१ ॥ तयाचें भाषण कळतें मजला । चेटकी विद्या ठाउकी मला । म्हणतो समंध पावनगतिला । देता पुण्याला कीर्तनाचे ॥ ३२॥ हास्य करूनि जयराम समर्थ । काय बोलिलें गोपाळ-स्वामिते । म्हणति ऐसिया लघुकार्यातें । देणें किमर्थ कीर्तनाश्रय ॥३३॥ जैसें धोवया किंचित बोट । कुंभ उलंडि मूर्ख उद्भट । नातरि फीरंग काढिली उनाट । चिराया सगट शाखेसि ॥ ३४ ॥ तैसे ब्रह्मराक्षस उद्धरणें । खर्च करावें कीर्तनपुण्य । कांहिं काज नसे जाण । सकृत भजनें तरेल तो ॥ ३५॥ अवश्य म्हणोनि गोपाळस्वामिनि । येक-वेळ भजनाचें सोडिलें पाणि । ब्रह्मराक्षस तेणें करूनि । उद्धरोनि

गेला तो ॥ ३६ ॥ ऐसे महात्म नामाचें । शिव स्मरति म्हणुनि वाचे । दुर्धर प्रारब्ध या जीवाचे । पाप गुरुचे न शिवाति ॥ ३७ ॥ प्रत्यक्ष उदकीं पाषाण तरले । प्राणी बुडती या बहु जळे । हे चि आश्चिर्य वाटतें सकळ । उपाय न कळे असतो पै ॥ ३८ ॥ वाल्मिकादि पातकी गहन । नामस्मरणें जाहले पावन । तेथ सामान्य दुरीत जाण । हुताशन कर्पुराचें ॥ ३९ ॥ असो जयराम स्वामिचा गोपाळ शिष्य । उद्धरिला तेणें ब्रह्मराक्षस । ब्रम्हांड कोंदले कीर्तिघोष । परि गुरुस नावडे ॥४०॥ मार्गी चालता गोपाळजीला।जयराम समर्थे प्रश्न केला । साबरि विद्या कोठुनि तुजला । कोण भेटला मंत्रवादि ॥४१॥ आपण साबडे विष्णुभक्त । येथें कासया चेटकीपंथ । येक स्मरावा श्रीभगवंत । तेणें समस्त काम पुरति ॥ ४२ ॥ आत्मप्रातिविर्णे धर्म । ते तो जाण मिथ्या भ्रम । जेणें अंतरे आत्माराम । नागवण परम उघड ती ॥४३॥ दुर्लभ जन्म मानवाचा । तो हि शाश्वत नेम कैचा । दुर्धर चपेटा काळाचा । अयुष्याचा घोट भरि ॥ ४४ ॥ म्हणुनि शाहणिये आयुर्दायासि । वेचूं नये आडमार्गासि । शरण जावें सद्गुरुसि । निजसुखासि साधावया ॥ ४५ ॥ आपुलें कल्याण अपुले हाति । ऐसि च आहे व्यासोक्ति । भगवद्गीतेंत भगवंति । अर्जुनाप्रति निरोपिलें ॥४६॥ याळागिं स्वहित करणें तुजला । तरि सोडि पंचाक्षरिपणाला । ऐसा प्रकारें बोध केला । गोपाळजीला जयरामें ॥ ४७ ॥ आज्ञा वंदुनि गोपाळ शिष्यानिं । स्वामीचरणिं सोडिलें पाणि । साबरि विद्या टाकुनि । आत्मदानिं विनटला ॥ ४८ ॥ अखंडाकार सद्गुरुपदिं । रंगोनि गेली जयाचि बुद्धि । आपिं आप त्रिशुद्धि । स्वरूप सिद्धि सहजी ते ॥ ४९ ॥ ऐशापरि आनंदातें । जयराम स्वामि गोपाळ भक्त । उत्तरमानस करूनि तीर्थ । आले त्वरित मठासि ॥ ५० ॥ नंतर विधि मांवदें कराया । आरंभ केला तया ठाया । सकळ संता आणावया । युक्त अन्वया पत्रें लिहिली स्वामिनिं ॥ ५१ ॥ साधुवृंदिं ऐकोनि वार्ता । हर्ष जाहला तया चित्ता । जयरामस्वामी करूनि तीर्था । आले

तत्वता म्हणुनि ॥ ५२ ॥ पत्रिका पाहुनी आनंदयुक्त । वडगावासि आले संत । नामें तयांचि ऐका श्रोते । जाती दुरितें श्रवणें चि ॥५३॥ रामदासस्वामि आणि कल्याण । रंगमूर्ति आत्मा निधान । गाणपत्य स्वामि निरंजन । तुकाराम पूर्ण माहासाधु ॥ ५४ ॥ केशवस्वामि आनंदमूर्ति । शिवरामस्वामीचि विख्यात कीर्ति । वामन परम पंडित जगतीं । ज्याचि गति अगाध पैं ॥ ५५ ॥ अनेक संत इत्यादि । मिळाली सकळ वैष्णवमांदि । मावंदे सोहळा तीर्थविधि । जाहला त्रिशुद्धि यथोक्त ॥ ५६ ॥ पुढें आपाढि सर्वे चि आली । पंढरपुरास यात्रा निघालि । तये काळीं लीळा जाहली । ऐका मळी श्रोति ते ॥ ५७ ॥ जयरामस्वामि शिष्यसहित । आणिक संत साधु महंत । पंढरीस प्रेमभरित । आले नाचत आनंदेंसि ॥ ५८ ॥ चिपळ्या विणे झळकति पताका । टाळ दमामे गर्जति देखा । घोष होतसे करताळिका । मध्यें सखा जयराम ॥ ५९ ॥ ऐशा प्रकारें चालता जाण । पंढरि राहिली येक योजन । तो विटेवरि जगजीवन । निघाले जाण त्वरेंनें ॥ ६० ॥ संगे घेउनि गरुडादिक । सामोरे पातले वैकुंठ नायक । मग ते स्वसुख अलौलीक । ग्रंथीं लेखन वर्णवेना ॥ ६१ ॥ ध्यान प्रगट जाहलें जेव्हां । देहस्मृति कैच्या तेव्हां । जयरामस्वामी श्रीवासुदेवा । अभेद सर्वा आलींगन ॥ ६२ ॥ अद्यापि तया स्थानातें । नमस्कार घालिति जन तेथें । जयराम स्वामींसि पंढरीनाथें । भेटले अनंत त्या जागिं ॥ ६३ ॥ देवभक्ताचा संवाद लिहितां । मनासि होय तादात्म्यता । गुरुपुत्रासि अनुभव येता । उघड ग्रंथा करिता नये ॥ ६४ ॥ असो भगवान दासांकित । घेउनि गेले निजक्षेत्रातें । जयराम स्वामिसी येकांत । केला निश्चित श्रीविठ्ठलें ॥ ६५ ॥ मग जयराम कीर्तनासि । उभे ठाकले वाळुवंटासि । तये वेळि ऋषिकेशि । चोज मानसिं करितसे ॥ ६६ ॥ पौर्णिमेसि होतां काला । सकळ संता निरोप जाला । समागमें घनसावळा । घालवीत गेला श्रीहरि ॥ ६७ ॥

जयरामस्वामी वडगावासि । येते जाहले स्वस्थानासि । सद्गुरुभजनीं अहिर्निशि । चिद्विलासि करिती ते ॥ ६८ ॥ जे जे प्राणि शरण येति । स्वात्मसुख तया देति । अनाधिकारि मळते याति । पावन होति ज्या कृपें ॥ ६९ ॥ कैसा हि प्राणि भेटिसि येता । समाधान करणें तया तत्वता । पूर्ण करावे मनोरथा । निजआत्मता देउनि ॥ ७० ॥ अन्नदानि जयरामा । ब्राह्मण भोजनि बहु प्रेमा । भिक्षा मागोनि निजनेमा । न ढळे धर्मो दया भूति ॥७१॥ भिकार भणंग अनेक ज्ञाति । इच्छाभोजन तयाप्रति । अपरान्हकाळ असो राति । करावे तृप्ति तयासि ॥ ७२ ॥ रिद्धि सिद्धि तिष्टति जेथें । उणें असेल काय तेथें । जयाचा सखा रुक्मीणिकांत । स्वयें अनंत जाणा तो ॥ ७३ ॥ ऐसे समर्थ जयराम स्वामि । वास्तव्य करिति वडग्रामि । तव आलि गोकुळ अष्टमि । उछाहा नेमि आरंभिले ॥ ७४ ॥ पत्रें धाडिली संस्थानासि । चाफळ ब्रह्मनाळ निगडिसि । इत्यादिक सकळ संतासि । पत्रिकेंसि पाठविले ॥ ७५ ॥ सज्जनवृंदें येवोनि सर्व । गजरि केले । अनेक या । आले वैष्णव सकळिक ॥ ७६ ॥ शृंगारिलें सकळ नगर । गुढिया तोरणें अपार । अनुहतध्वनि होतसे गजर । बांधिले मखर अनोपम्य ॥ ७७ ॥ देह-चतुष्ट्य स्तंभ शुद्ध । इंद्रिय खिडक्या नवविध प्रसिद्ध । दशवें द्वारि अनुभव सिद्ध । निर्द्वंद्व तेथें पै ॥ ७८ ॥ चतुर्दळ षटदळ दशदळ । दैवतें स्थापिलीं प्राजळ । द्वादश षोडष दळ केवळ । ज्ञानि प्रेमळ जाणति पै ॥ ७९ ॥ सहस्रदळिं श्रीकृष्ण । अद्भुत तेज तेथिचें जाण । प्राणप्रतिष्ठा केली पूर्ण । ब्रह्मरंध्र स्थान धन्य ते ॥ ८० ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति । जाळ्या मखरासि ज्या शोभति । तुर्या चवथि ज्ञान दीप्ति । अनुभव स्थिती प्रभावाळि ॥ ८१ ॥ विचारात्मक स्वयप्रकाश । जडोनि ठेले जेथें असे । दुसरेपण काहि न दिसे । सहजो विलसे एकत्व ॥ ८२ ॥ ऐशा प्रकारें मखर स्वयंभ । चिन्मय भुवनि अति शोभे । उपमा नसे जेथिल प्रभे । आटले नभ सोहंध्वनि ॥ ८३ ॥

अष्टधा प्रकृति विरल्या जेथें । आठवा अवतार जाहला तेथें । अष्टमी दिवसिं श्रीकृष्ण नाथ । अष्टमस्त गर्भ देवकीचा ॥ ८४ ॥ शुद्धमनें तया अठवा । मवसिंधु तेणेंचि अटवा । अक्षौ ठेवा भावपदिं ॥ ८५ ॥ सर्वा भूतिं ज्या वासुदेव । तो चि जाणिजे वसुदेव । जन्मले तेथें देवाधिदेव । आत्मा सर्व श्रीकृष्ण ॥ ८६ ॥ अंतर्बाह्य देव च की । ते चि जननि हे देवकी । तया उदरिं जाणुनि निकि । भावना सुखी हरि राहिला ॥ ८७ ॥ समजोन ऐसे यशवदा । सहजी वृत्ति ते येशवदा । काय उणें मग आनंदा । नंद सदा होईजे तो ॥ ८८ ॥ गोकुळ म्हणिजे इंद्रिय कुळिं । प्रगट जाहले श्री वनमाळि । अहंकारकंसाचि करूनि धुळि । रक्षिली सकाळि साधुवृंदें ॥ ८९ ॥ पूत नव्हे ती पूतना । विषयजनित जै वासना । निर्दाळुनि तयेसि जाणा । विषयलक्षणा विष शोषिले ॥ ९० ॥ कामक्रोधादि दैत्या यया । निवटुनिया जगत्रया । धर्मस्थापन करावया । अवतार ठाया भुमंडळिं ॥ ९१ ॥ स्वात्मधर्मे स्थापुनि । विजई जाहले चक्रपाणि । नाहुं धालुनि गाति गार्णि । ऐशा वदनिं श्रुतिवाया ॥ ९२ ॥ जो जो चित्तासि भास जाहला । तो तो अवघा आपण संचला । सुलिन दशे लागला डोळा । हारिनिजविला आत्मशेजे ॥ ९३ ॥ असो अध्यात्म पद्धति । श्रोते कथा श्रवणार्थि । म्हणुनि आवरलि येथें माति । नाहिं तरि स्थिति हे चि बरी ॥ ९४ ॥ गतगोष्टिसि ऐकोनि । आयुष्य सारिति व्यर्थ जनिं । श्रीकृष्ण असतां ह्रदहासनिं । नाडले प्राणि आत्महिता ॥ ९५ ॥ जो जो सुगंध येतसे जाण । तो तो धावति कस्तुरि ह्रणें । तयापरि भुलले जन । माहात्म ऐकोनि धावति ॥ ९६ ॥ यालागिं ऐसें न करावें । आपण कोण हे जाणावे । सद्गुरुसि शरण जावें । तरि च तरावें मवजल हा ॥ ९७ ॥ आतां सांगणें ते किति । श्रीकृष्ण जन्म जाहला क्षिति । शर्करा सुंठघडे वाटिति । आनंदें गाति संत वृंदें ॥ ९८ ॥ हळदि कुंकुमें घरोघरिं । ब्राह्मण भोजन होतसे भारि । मिळते जाहले वर्ण च्यारि । जेविति सारि रात्रदिन ॥ ९९ ॥ गोपाळकाला मग मांडिला । ते तो अनिवर्च-

निय सोहळा । कैलासाहुनि पातला । पाहावयाला श्रीशंभु ॥ १०० ॥ सनकादिक नारदमुनि । उतरले देव स्वर्गिंहुनि । तेज फाकले न माये गगनिं । देखति नयनिं सकळिक ॥१०१॥ विद्युल्लता सारिख्या पाहि । पताका मिरविति ठाईं ठाईं । दुमदुमली सकळ महि । आनंद पाईं न समाये ॥ २ ॥ जयराम स्वामि महा समर्थ । जो कां अवतार श्री येकनाथ । काय सांगणें तयाचे कथे । गोकुळासम तें स्थान पाहि ॥ ३ ॥ प्रसाद दिधला सर्वत्रासि । उठील जाहले उत्तर दिसि । नंतर पातले स्वस्थानासि । आपुल्या देशिं सकाळिक ॥ ४ ॥ प्रति वर्षि श्रीकृष्ण जयंति । वटग्रामिं च चमत्कार होति । जन सर्व अद्यापि पाहति । उद्धरति, गुरुकृपें ॥ ५ ॥ माघ शुद्ध पौर्णिमे दिवसिं । कृष्णस्वामिचे पुण्य तिथिसि । संत आले प्रसादासि । नाहिं तयासि गणति पै ॥ ६ ॥ तेव्हां रंगनाथ स्वामिचा घोडा मेला । जयराम स्वामिनिं तो उठविला । सार्यंत वृत्तांत तो लिहिला । चरित्रिं रंगमूर्तीचे मळा ॥ ७ ॥ सांगता कथा ऐशा किति । नपुरे मति लिहितां ग्रंथिं । धन्य अवतार जाहला क्षिति । जयराम नामोक्ति येकोबा ॥ ८ ॥ गुरुभक्तिचा उभवोनि ध्वज । जगदोद्धार केला सहज । श्रुतिसार काढुनि निज । ग्रंथ सतेज रचिला तो ॥ ९ ॥ पूर्वावतारिं भागवत का । तेथें अपरोक्ष अनुभविति नामें नौका । भवनदींत घातली देखा । पैल तटाका जीव उतरति ॥११०॥ पदें अभंग करूनि जाण । भावें पूजिला सद्गुरुकृष्ण । आरंभिलें मग प्रयाण । अवतार पूर्ण संपावया ॥ ११ ॥ निर्याण पीठ करूनि सिद्ध । पाचारिले वृंदें । गोपाळ शिष्य तो प्रसिद्ध । बोधि शुद्ध निजप्रिति ॥ १२ ॥ प्रसादमाळा तया देउनि । जड तनु ठेविलि मेदिनि । तये काळीं सुरवरानी । वृष्टि सुमनीं केली पै ॥ १३ ॥ जाहला वाद्यांचा येक चि गजर । देव करिति जयजयकार । नादें कोंदलें अंबर । कोण विच्यार वर्णिल तो ॥ १४ ॥ जयराम स्वामिचे समाधिसि । कोणता समय कोण तिथिसि । प्रयाण केलें वैकुंठासि । ऐका मानसिं तें सर्व ॥ १५ ॥ चौऱ्याणव शके पंधराशे । संवत्सर नाम

पराधावी असे । तीथि एकादशी भाद्रपद मास । गुरुवार दिवस कृष्णपक्ष ॥१६॥ प्रातःकाळ समई जाणा । सन्निध श्रीकृष्ण वृंदावना । समर्पिले सद्गुरुचरणा । करूनि स्मरणा जड तनुसि ॥ १७ ॥ जयराम कृष्णा काय भेद । माईक दृश्य वपुसमंध । जाणें येणें कैचें द्वंद्व । अकाश सिद्ध जयापरि ॥ १८ ॥ उदकामाजि तरंग उठति । पुन्हा मागुति लीन होती । अवतार लीळा तैसि संति । स्वरूप स्थिति अभेद ॥ १९ ॥ असो शास्त्ररित्या उत्तर विधान । गोपाळ शिष्यें केलें जाण । स्थापीयलें वृंदावन । श्रीकृष्णस्वामि सन्निद्ध ॥ १२० ॥ अहिर्णिशि सेवे ठाई । गोपाळ स्वामि तिष्टति पाईं । भजन पूजा सर्वदा हि । सदा ह्रदई येकाग्रता ॥ २१ ॥ ब्रह्मचर्य विषई विद्यमान । जयराम स्वामि सारिखे जाण । प्रत्यहिं करावें अनुष्ठान । वदे वदनें गुरु स्थिति ॥ २२ ॥ शुद्ध भिक्षा मागुनि बरवि । अतिथि दिनें जेववावि । जयाते शोभे संस्थान पदवि । ज्ञान रवि प्रगटला ॥ २३ ॥ जे जे प्राणि शरण येति । अनुभव तया शीघ्र देति । वाढविली श्री गुरुभक्ति । गोपाळ जगतिं धन्य शिष्य ॥ २४ ॥ पूर्ववत कृष्णजन्म । पुण्यतिथि करिति प्रेम । गुरुभक्तामाजि निःसिम । गोपाळ परम निजज्ञाता ॥ २५ ॥ मछिंद्राचा गोरक्ष जाण । कीं रंगमूर्तीचा जनार्दन । तयापरि गोपाळ पूर्ण । अंतःकरण श्रीगुरुपदिं ॥ २६ ॥ भागिरथिचें उदक आणुनि । घालावें स्नान वृंदावनिं । ऐशि वांछा धरुनि मनिं । गेले निघोनि काशिसी ॥ २७ ॥ अनंत भटजी तेथील । परिचय तयाचा पूर्विल । गुरुबंधु जेष्ठ आपुले । म्हणुनि राहिले तया गृहिं ॥ २८ ॥ यात्राविधि करूनि सांग । संस्थानासि निघाले मग । तो गोपाळजीचे तापलें अंग । नवज्वर सांग पातला ॥ २९ ॥ अंतकाळसमय आला । शिष्यसमोचय भोवता मिळाला । गोपाळस्वामिसि प्रश्न केला । भटजी मला अनंतदेवें ॥१३०॥ काय हेतु तुमचे मनिं । सांगा समस्ता आम्हा लागुनि । तपे काळिं गोपाळजीनिं । ह्रदद वदनिं निवेदिलें ॥ ३१ ॥ म्हणति जाउनि वटग्रामासि । देह पाडावा स्वामिचरणासि । इतुकि ईच्छा

आहे मानसिं । हें चि सकळासि सांगणें ॥ ३२ ॥ ऐसें ऐकोनि सर्व-त्राते । आश्चिर्य वाटले अनंतदेवाते । बोलते जाहले वेदवेत्ते । गोपाळाते ते समई ॥ ३३ ॥ काशित मरावें म्हणुनि । अवतारादिक वांछिति मनिं । अनायासें ऐशिया स्थानिं । प्राप्त जनिं मृत्युसमय ॥३४॥ याहुनि अधिक गुरुपासिं । काय आहे वडगावासि । ऐसें सांगतां गोपाळजिसि । उत्तर तयासि देति ते ॥३५॥ काशिक्षेत्र कोट्यावधि । श्रीगुरुचे चरणसंधि । न जाणति मंदबुद्धि । आत्मसिध्दि त्या कैचि ॥ ३६ ॥ नाना तीर्थि जाउनि न्हाला । अथवा प्रयागिं देह बुडविला । ज्ञानाविणें वाया गेला । आत्मा कळला नाहिं चि तो ॥ ३७ ॥ सद्गुरुविणे जो जो धर्म । ते तो मिथ्या वाउगा भ्रम । नाडिला प्राणि वृथानेमें । न कळतां प्रेम आपणाते ॥ ३८ ॥ व्रतें दानें यज्ञादिक । करिति मूर्ख ते डांभिक । न जाणोनि स्वात्मसुख । भवदुःख भोगिति पै ॥ ३९ ॥ शुकादिक ब्रम्हवेत्ते । सांगति वेदिं हा सिद्धांत । पूर्वपक्ष शास्त्रमतें । स्विकारित अज्ञान ते ॥ १४० ॥ गोपाळस्वामि ऐसें वदतां । पश्चाताप जाहला समस्ता । समाधान फावलें चित्ता । अनंता भटजी शास्त्रज्ञासि ॥ ४१ ॥ जयरामस्वामिचि सर्वत्रांनिं । प्रार्थना करूनि क्षेत्रस्थानिं । विभुति अनंत भटजी हातुनि । लाविली आणुनि गोपाळजीते ॥ ४२ ॥ तेणें ज्वर तात्काळ गेला । गोपाळस्वामिसि आनंद जाहला । काशिकराचा निरोप घेतला । वडगावाला आले ते ॥ ४३ ॥ भाद्रपद वद्य येकादशिस । जयराम पुण्यतिथी मुख्य दिवस । भागिर्थि उदक समाधिस । समर्पि विशेष निजभावें ॥ ४४ ॥ रथोत्छाह्य करूनि सांग । स्वरूपीं लीन जाहलें मन । संवत्सर कोणता योग । उत्तम प्रसंग तो ऐका ॥ ४५ ॥ शालीवाहन शके सोळाशे । आणिक वरति द्वादश । सवत्सरानाम प्रमोद असे । आश्विनमास तो जाण ॥ ४६ ॥ कृष्णपक्ष येकादशि । पूजन करूनि समाधिसि । गोपाळस्वामिनिं देहासि । श्रीगुरुसि अर्पियले ॥ ४७ ॥ दिव्य ज्योती मुखांतुनि । निघति जाहली ततक्षणीं । प्रवेश केला वृंदावनिं । पाहिलें नैयानिं सकाळिकें

॥४८॥ गुरुभक्ताचा ऐसा महिमा । वर्णावयाचि जाहली सीमा । बोलीजे तितुकी उणि प्रेमा । परिप्रेमा अहेतु ॥ ४९ ॥ यथामति केलें कथन। श्रीकृष्णजयरामचरित्र जाण । सशिष्य गोपाळ जयाचा पूर्ण । अनुक्रमें पुढें तैसा ॥१५०॥ परंपरा चालिला पंथ । नमन साष्टांग तया पदाते । मागणें सकळ संताते । गुरुदास्या ते युगायुगीं ॥ ५१ ॥ जन्मांतरिंचा निजठेवा । कृपा आली सद्गुरुदेवा । तेणें स्तवन साधुसेवा। प्राप्त सदैवा या जन्मि ॥ ५२ ॥ सिद्धस्वामिचि कृपा पूर्ण । राजारामीं जाहले प्रसन्न । श्रीकृष्ण जयराम अख्यान । केलें कथन दीनाह्यातीं ॥ ५३ ॥ भक्तमंजरीमाला ग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । श्रीकृष्ण जयराम चरित्राते । अध्याय होत चतुर्विध हा ॥ १५४ ॥ श्रीसद्गुरु पदांबुजार्पणमस्तु ॥ अध्ये ४ ॥ येकून ओव्या संख्या ॥ ५९४ श्रीगुरुनाथार्पणमस्तु ॥ अनुक्रमें अध्याय १५ ॥



## अध्याय १६ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु आत्मयारामा । परात्परा स्वसुखधामा । आद्वितीया अरूप अनामा । परब्रह्म श्रीमूर्ति ॥ १ ॥ ध्यान वर्णूं स्वामिया जरि । तर्का न स्पर्शवेते कुसरि । रिघु दृष्टांताचिये द्वारि । गौणता तरि वाटतसे ॥ २ ॥ पदार्थमात्र नाशिवंत । उगिच कासया याचा बरळत । जैसा असासि तैसिया पदाते । नमन तयाते साष्टांगें ॥ ३ ॥ येकात्मता अभेद भक्ति । मूळमाया सरस्वति । ते चि वंदन मंगळमूर्ति । पुरुषप्रकृति अद्वैत ॥ ४ ॥ अंतरबाह्य सीतापती । सिद्धनाथ तो भरला जगति । कृपाकटाक्षें चेतवी स्फूर्ति । वदवी युक्ति ग्रंथाते ॥ ५ ॥ भक्तमंजरीमाळीका । श्रवण करितां पाविजे सुखा । अर्पितसे श्री रघुनायका । केवळ दीपिका ज्ञानाचि ॥ ६ ॥ श्रोति असावे येकाग्रता । श्रीरंगनाथ आख्यान वर्णिजेल आतां । विठलराव धाकुटे भ्राता । बंधु उभयता सहित पै ॥ ७ ॥ भरतशत्रुघ्न माहा

समर्थ । पूर्ण प्रतापि भगवद्भक्त । तयासारिखे त्रिभुवनांत उपमा । जयाते न घडे कै ॥ ८ ॥ युगायुगि अवतार । देव घेतसे साचार । निर्गुण ब्रह्म ते साकार । जाले निर्धार भावासाठि ॥ ९ ॥ ऐसे सामर्थ्य कवणा अंगीं । निर्धर्म स्वरूप दाविले जगिं । सायोज्यसदना निज आत्मरंगि । निमग्न अभंगि पै जाहले ॥ १० ॥ मुक्ति वरि सहजस्थिति । आचरावया शुद्धभक्ति । अवतार जाहले उत्तम क्षिति । कथा श्रोति ते ऐका ॥११॥ कोणते स्थळि कोण ग्राम । शाखा वेद अनुक्रम । आचरण विधि योगधर्म । सांगिजेल नेम सविस्तर ॥ १२ ॥ पंढरिपासोनि नैऋत्यादिशे । च्यार योजने ग्रामविशेष । नाझरे नाम तयास । पवित्र देश ते भूमि ॥ १३ ॥ बोपाजीपंत आत्मनिष्ट । भार्या ते हि तैसि च स्पष्ट । बयाबाई अभिधान श्रेष्ठ । साध्वि वरिष्ट पतीव्रता ॥ १४ ॥ यजुर्वेदि शाखा थोर । वाजसनीय तो द्विजवर । देश लेखक परम उदार । वेदविच्यार गृहस्ताश्रमि ॥ १५ ॥ तयाचिये उदरिं जाण । भरतशत्रुघ्नासि जाले जनन । जाणुनिया पूर्वपुण्य । स्त्रीपुरुष पूर्ण अनुष्ठाति ॥ १६ ॥ किंबहुना बोपाजीपंत । ॐकार स्वरूप तो निभ्रांत । बयाबाई निश्चितार्थ । मूळमाया सत्य जाणिजे पै ॥ १७ ॥ गुणत्रयाचा संभव । ॐकार कुशिं जाहला संभाव । तो चि आतां समूळ भाव । स्वानुभवें श्रवण कीजे ॥ १८ ॥ बकार वकार ऐक्य वर्ण । यालागि ते चि नामाभिधान । ब्राह्मण स्वरूपें ॐकार पूर्ण । अवतरला जाण भूठाईं ॥ १९ ॥ तयापासाव प्रथमपुत्र । यादवराव जाहले सत्पात्र । जयासि पाहतां निवति नेत्र । कीर्ती स्वतंत्र पै ज्याचि ॥ २० ॥ मूर्तिमंत तो रजोगुण । प्रपंच केला सांग जेणे । अंतीं पावले निजात्म सदन । कृपेकरून सद्गुरुच्या ॥ २१ ॥ तयापाठीं श्रीरंगनाथ । सत्वांश विष्णु केवळ समर्थ । तमोगुण तीजा निश्चित । आल्या होत शिवापरि ॥ २२ ॥ असो आतां युक्तिप्रसर । देयभक्त येकनिर्धार । भरथशत्रुघ्नाचे अवतार । जाणिला विच्यार श्रीगुरुकृपे ॥ २३ ॥ स्वभाव अकृति तैसे चि वर्ण । आजानबाहु आकर्णनयन । उत्पन्नकाळिं उत्छाहपूर्ण पितीयानें बहु केला

पै ॥ ५६ ॥ मग सप्रेम नेत्रोदकें । अभिषेचला गुरुनायक । आचमन करविलें त्रिगुणात्मक । निज विवेक आत्मया ॥ ५७ ॥ निर्वासना वसन सुंदर । परिधान करविलें निर्विकार । हृदयासनिं श्रीगुरुवर । सर्वदा साचार बैसविले ॥ ५८ ॥ गंधाक्षता परिमळ पुष्प । इंद्रियकमळें अर्पिलीं अमुप । अहंसोहं धूप दीप । नैवेद्य अरूप जाणिवेचा ॥ ५९ ॥ तांबुल दक्षिणा श्रीफल । नृदेह जाला तेणें सफळ । मंगळ आरति सोज्वळ । परति प्रांजळ नव्हे स्थिती ॥ ६० ॥ मंत्र पुष्प प्रदक्षणा । नमनविधि तो चि जाणा ॥ जेथें पूज्य पूजकपणा । नुरे आचरणा सद्गुरुपदिं ॥६१॥ ऐशा प्रकारें नित्यपूजन । श्रीरंगमूर्ति करितसे जाण । आत्यास्वामि निमग्न पूर्ण । द्वैतभान कैंचे ते ॥ ६२ ॥ जन्मांतर जयाचे अंगस्वभाव । शिपाई वेश धारण करावे । शस्त्राभ्यास पाहतां बरवे । प्रतापि गौरव अतिशूर ॥६३॥ ध्यानें पाहतां देखणें प्रांजळ । सौंदर्य व्यापिलें नभमंडळ । केश मुक्तत्वाचे मोकळे । शोभति प्रांजळ जयाचे शिरिं ॥ ६४ ॥ नवविधात्मक मंदिल फेटा । बांधिला सदृढ मस्तकीं चोखटा । ज्ञानतुरा खोविला निटा । आत्मपैठापदिं जाहले ॥ ६५ ॥ दुशाल विरक्ति शोभे अंगा । घातिला शांतिचा अखंड झगा । निस्पृहता पायजमा अभंगा । भवभंगा साजतसे ॥ ६६ ॥ विवेक फीरंग दावेसि झळके । क्षमा वोढण पृष्टिभागी निके । समभाव बिंदाण तेचि देख ॥ तिरकमठा सुरेख धीराजितो ॥६७॥ पंचहत्यारें पंचमात्रा । ॐकारयुक्त ज्या पवित्रा । आयुधें शोभति निज अंगक्षेत्रा । पाहतां नेत्रा काळ कांपे ॥ ६८ ॥ राजयोगी ऐसे समर्थ । आत्या स्वामि श्रीरंगनाथ । भरतशत्रुघ्नाचे अवतार सत्य । वैष्णव नीयंते सकळकळा ॥ ६९ ॥ जनकजननी चि करूनि सेवा । संतोष तयासि बरवा । निज पुत्राचा विवाह करावा । छंद सर्वां हे चि पै ॥ ७० ॥ विठलराव धाकुटे आत्या । मानिले तेणे वचनार्था । ब्रह्मचर्यवृत्ते श्रीरंगनाथा । माळ सर्वथा घातिली ॥ ७१ ॥ जगदोद्धार करणें क्षितिं । हेतु फार जयाचे चितिं । यास्तव आज्ञा रंगमूर्ति । मागत भक्ति श्री गुरुसि ॥ ७२ ॥ विठ्ठलरायासि ठेउनि गृहिं । आपण हिंडति

सकळ मही । दर्शन होतां चि मिळति पाही । आत्मस्वठाई सकाळिक ॥ ७३ ॥ उत्तरमानस सकळ तीर्थे । करिते जाहले श्रीरंगनाथ । बद्रिकाश्रम पाहुनि चित्तें । स्थिर होते पै जाहले ॥ ७४ ॥ द्वादश वर्षे अनुष्ठान । तये स्थळीं केलें जाण । निराहार उपोषणें । योग पावणें सिद्धिसि ॥ ७५ ॥ आधिं च सुवर्ण बावनकाशि । वरि कोंदण तेजोराशि । समर्थ केलें निज अंगासि । नवल तयासि अधिक प्रभा ॥ ७६ ॥ तपश्चर्या तैसि तेथें । अवतारि समर्थ भगवद्भक्त । गुरुकृपेचे वरि सामर्थ्य । पूर्णता तेथें सहजी ते ॥ ७७ ॥ कोणियेक समई योगिराज । रंगमूर्ति श्रीमहाराज । हिमाळई असतां चोज । वर्तलें सहज तें ऐका ॥ ७८ ॥ अत्यंत हवा परम शिथिल । तेणें उठला कपाळशूळ । रंगमूर्तिसि घाबरे केले । चैन न पडे कदापी ॥ ७९ ॥ व्याघ्ररूपें तये काळिं । प्रगट जाहले श्रीवनमाळि । दंतिं धरोनि औषध मूळी । कृति केली ते ऐका ॥ ८० ॥ दीर्घ स्वरूप भयंकर । धारण केलें रमावरें । मुळी ठेविली येवोनि समोर । श्रीरघुवीरें रंगनाथ ॥ ८१ ॥ हास्य करोनि श्रीरंगनार्थे । व्याघ्रासि तेव्हां काय बोलत । नाशिवंत शरीर ऐशियाते । श्रमला अनंत कासया तुम्हि ॥ ८२ ॥ आम्हि तो आपुला देह । अर्पण केला हा निश्चय । औषध लावि किंवा काय । दुःखालय हे अशाश्वत ॥ ८३ ॥ ऐसें म्हणतां त्या अवसरिं । लाळ गाळिली पाषाणवरि । औषध मुळि धरूनि स्वकरिं । टगाळीली वरि व्याघ्रानें ॥८४॥ सव्यहस्तें पंचाननें । ओखद घेतले पंज्यांत भरून । रंगमूर्तिचे जवळ येऊन । केलें चर्चन कपाळासि ॥ ८५ ॥ व्याघ्रें करुनि इतुके कृत्य । तात्काळ धरिला जावया पंथ । पुच्छासि धरिलें श्रीरंगनार्थे । स्वहस्तें अतित्वरेनें ॥ ८६ ॥ म्हणति सोंग दावोनि ऐसे । जातसा कोठें जगन्निवास । जन्मोजन्मि आपुला दास । न सोडि तुम्हा सर्वथा ॥ ८७ ॥ भक्ताकित तये वेळा । चतुर्भुज जाहला सावळा । भेट दिधली रंगमूर्तिला । वर्णितां सुखाला अनोपम्य ॥ ८८ ॥ मग तो संवाद देवभक्ताचा । ग्रंथीं न करवे

लेखन त्याचा । विभाग होतो गुरु पुत्राचा । अनुभव तयाचा त्याजा तया ॥८९॥ असो देवभक्त मुळिचे येक । भिन्न भाविति तयासि नर्क । आपला आपण न करि विवेक । नाहिं सुख कदा तया ॥ ९० ॥ रंगमूर्तिसी श्रीभगवान । आलिंगन देति प्रेमें करून । सांगितले मुख्य कारण । जगदोद्धार करणें पै ॥ ९१ ॥ दक्षिणमानस करुनि आतां । जगासि लावणें अनुभवपंथा । ऐसें बोधिलें श्रीरंगनाथा । कृपावंता सर्वोत्तमें ॥ ९२ ॥ आज्ञा वंदोनि झडकरी । सोडिला तेव्हां हिमालयगिरि । येते जाहले भागानगरीं । लीलावतारी श्रीरंग ॥ ९३ ॥ ब्रह्मराक्षस उद्धारार्थ । तया शहरांत वाट पाहात । स्थळ विचारिलें ग्रामस्ताते । राहावयाते स्वामिनी ॥ ९४ ॥ दुर्बुद्धि ते कुटिळ जन । वाडा दाविला तोचि जाण । जेथें राहातसे समंध दारुण । भयंकर महान पिशाच तो ॥ ९५ ॥ तये स्थानिं श्रीरंगनाथें । बिराड लाविले शिष्य समवेत । पाचारिलें केशव स्वामिते । कीर्तनाते अति प्रितिं॥९६॥ रंगनाथ स्वामिचे ऐकता नाम । केशव स्वामिस दाटलें प्रेम । आणिक शिष्य पंडित परम । घेउनि निःसीम आले कथे ॥ ९७ ॥ समारंभ तो अत्याद्भुत । कीर्तन करिति श्रीरंगनाथ । केशव स्वामि जेथें श्रोते । संवाद तेथें कोण वर्णि ॥ ९८ ॥ कीर्तनरंग बहर होतसे । तव हाक फोडिली ब्रह्मराक्षसें । तेणें मूर्च्छा श्रोतियास । आलि सर्वास ततक्षणिं ॥ ९९ ॥ महान विक्राळ पिशाच गाढा । करकरा खातसे रगडोनि दाढा । सन्निध येवोनि स्वामि पुढा । पाहे निधडा चरणासि ॥ १०० ॥ तेणें तयासि होवोनि दृढज्ञान । जन्मांतराचें जाहले स्मरण । म्हणतसे मजला करा पावन । आलो शरण दयाळा ॥ १ ॥ केशव स्वामि श्रीरंगनाथ । उभयता मात्र सावध होते । इतर पडले मूर्च्छाग्रस्त । स्मरणरहित जाहली सभा ॥ २ ॥ रंगनाथस्वामिप्रति । केशव महाराज काय बोलति । न करा उसीर आतां निश्चिति । द्यावि मुक्ति ब्रह्मराक्षसा ॥ ३ ॥ तत्काळ उदक घेउनि करीं । प्रोक्षण केलें पिशाचावरि । ब्रह्मराक्षस तेव्हां गर्जना

करि । दीर्घ स्वरिं देह त्यागिला ॥ ४ ॥ मध्यरात्र तेव्हां अकस्मात । शब्द होता दचकले नगरस्त । काय अनर्थ न कळे मात । ऐसे बोलत परस्परें ॥ ५ ॥ ब्रह्मराक्षसा विमान येउनि । जाता जाहला वैकुंठ सदनिं । आरति केली मग कीर्तनिं । श्रोते उठउनि सर्वत्र ॥६॥ धन्य प्रताप रंगमूर्तिचा । उद्धार केला ब्रह्मराक्षसाचा । कीर्ति भूगोल भरला साचा । जन वाचा वदति यश ॥ ७ ॥ ब्राह्मण भोजन करुनि तेथें । रंगनाथ जाहले मार्गस्त । केशव स्वामि घालवीत । आले बोलत दूरवरि ॥ ८ ॥ उभयता भापण आत्मसुख । कोण वर्णि तेथिचा लेख । असो दक्षिणमानस करूनि निके । पुन्हा देख आले घरिं ॥ ९ ॥ मायबापासि श्रीरंगें । नमस्कार घातिला साष्टांग । मग तो आनंद वचनीं सांगे । ऐसा रंग नव्हे पै ॥ ११० ॥ उभयता देति आलिंगन । सुखाश्रु दाटले पूर्ण नैन । त्रिवर्ग बंधु येकत्र जाण । मिळाले पूर्ण सहजी ते ॥ ११ ॥ ग्रामांतिल सकळ लोक । पाहावया पातले कौतुक । दर्शनमात्रें जाहले सुख । भवदुःख कैचें त्या ॥ १२ ॥ वयावाई निबळोण । वारंवार उतरि जाण । बोपाजीपंत आनंदाने । राहिले भरून अत्यंत ॥ १३ ॥ परस्परें बंधुत्रय । प्रेमें दाटली तयाचि हृदयें । वर्तमान पुसिति सांकल्य । लवलाहे तये काळि ॥ १४ ॥ तीर्थावळिचि नामें गहन । रंगनाथ स्वामि करिति कथन । नाना क्षेत्रें नाना स्थानें । येकाहुनि येक अधिक ॥ १५ ॥ लिहितां होईल प्रसर । यालागीं केला नाहिं विस्तार । यादवरायें कारभार । यथोक्त साचार निवेदिला ॥१६॥ विठ्ठलराय धाकुटे बंधु । वैराग्याचा केवळ सिंधु । श्रीरंगचरणिं जयाचा वेधु । नाहिं द्वंद्व ज्यापासि ॥ १७ ॥ असो बोपाजिपंत पुत्रासहित । गृहस्थाश्रमिं असे वर्तत । यथासांग जयाचें वृत्त । ज्याचे सुकृत वर्णवेना ॥ १८ ॥ वेदाध्ययन अन्नदान । सर्वांभूतिं दया पूर्ण । कीर्तन घोष पुराण श्रवण । गृहिं जाण निरंतर ॥ १९ ॥ पूर्ण अवतार भरतशत्रुघ्नाचे । उत्पन्न जाहले जेथें साचे । रंगमूर्ति आत्या ज्याचे । पुत्र याचे म्हणति जगिं ॥ १२० ॥ ऐसे समर्थ भाग्यवंत । बोपाजीपंत

ते श्रीमंत । बयाबाईजननीते । सकळ वंदित सुरवरादि ॥ २१ ॥ रंगनाथस्वामि आख्यानिधान । जाहली उदरीं जिष्या रत्नें । कोण तयाचे अनुष्ठान । ग्रंथीं वर्णन न करवे ॥ २२ ॥ ब्रह्मनिष्ठ जेथें राहति । उत्तमदेश तो निश्चिति । मग मायबाप पवित्र किति । उपमा जगति नसे तया ॥ २३ ॥ संतती संपत्ती युक्त । देशपांडे बोपाजिपंत । नाझरे ग्रामिं नांदत । संसार होत धन्य तयाचा ॥ २४ ॥ पूर्ण प्रतापि निज-कुमर । आत्मनिष्ठ असता अत्यंत शूर । काम क्रोधादि षडविकार । जेणे सारे निर्दाळिले ॥ २५ ॥ तेथें प्रपंच कथा कायसि । रोजगार करिति अहर्निसीं । ततता कैचि इंद्रियासी । त्रिविध तापासि शमविले ॥२६॥ श्रीरंगमूर्ति आणि आत्या । निमग्न जाहले उभय परमार्था । प्रपंच ओझें घेतले माथा । म्हणति तत्वता यादव जया ॥ २७ ॥ बोपाजीपंत पाहुनि ऐसे । घेते जाहले मग संन्यास । विच्यारिले समस्तास । स्वपत्निस बाळकादि ॥ २८ ॥ ॐकाररूपिणि कृष्णा जेथें । धन्य क्षेत्र कऱ्हाटक ते । तेथें जाउनि पुत्रासहितें । आश्रम चतुर्थ संपादिला ॥ २९ ॥ प्रणव-रूपिणि कैसि कृष्णा । श्रोते करिते जाहले प्रश्ना । संक्षेपयुक्ति ते चि कथना । अनुक्रमें जाणा सांगिजेल ॥ १३० ॥ अकार उकार मकार । अर्ध मात्रा बिंदुॐकार । देवत्रय ते चि निर्धार । विष्णु रुद्र ब्रह्मा तो ॥३१॥ उदक रूपें येथें त्रिपुटि । ज्ञानि पाहति सदा दृष्टि । कुकुद्मति तो परमेष्टि । विष्णु सेवटिं कृष्णा ते ॥ ३२ ॥ वेण्या देवो महेश्वर । ऐसे बोलति ऋषिश्वर । प्रीति संगम सुर्धांवर । नसे साचार कोठें चि ॥ ३३ ॥ स्थूळ सूक्ष्म आणि कारण । देहत्रय तें चि निरसन । अर्धमात्रा जे कां स्फुरण । आश्रम जाण चतुर्थ तो ॥ ३४ ॥ निजानंद सहजीं तेथें । नाम ठेविलें सद्गुरुनाथें । निःसंशय स्वरूपिं स्थित । स्वामि सत्य निजानंद ॥३५॥ असो बोपाजीपंत जाहले यति । निजानंदनाम जयाप्रति । जेणें उपदेशिला श्रीरंगमूर्ति । अगाध कीर्ति तयाचि ॥३६॥ परंपरा ऐका श्रोते । श्रवण मात्रें जाय दुरित । प्रथम गुरु नारायण निश्चित । शिष्य देख तयाचे ॥३७॥ दत्तात्रयापासोनि जाण । सहजानंदासि जाहलें ज्ञान । तयाचा

प्रसाद लाघला पूर्ण । स्वामि सर्वज्ञ रामानंद ॥ ३८ ॥ रामानंदें शिष्य केला । अमलानंद तो उद्धरिला । तयापासोनि गंभीर जाहला । यति भला समर्थ तो ॥ ३९ ॥ गंभीरानंदें केला बोध । ब्रह्मानंद तो प्रसिद्ध । सहजानंद तत्वविद । शिष्य शुद्ध तयाचा ॥१४०॥ सहजानंदें अनुग्रह । पूर्णानंदासि केला पाहे । तेथोनि लाधली आत्मसोय । मुख्य अन्वय निजानंद ॥ ४१ ॥ निजानंदें श्रीरंगनाथ । विठ्ठलराव आत्या याते । मेळविले निजपदाते । जाहाला पंथ येथोनि ॥ ४२ ॥ संप्रदाय पुढें बहुत । कीर्ती वाढला असे जगाते । तया साष्टांग प्रणिपात । श्रीगुरुते भजति जे ॥ ४३ ॥ ईश्वरापासोनि अकरावा पुरुष । रंगनाथ स्वामि स्वयंप्रकाश । जयाचा सखा श्रीरामदास । रुद्र अंश तो अकरावा ॥ ४४ ॥ तयाचि भेटी होईल संवाद । उचंबळेल ब्रह्मानंद । पुढें वर्णिले ते चि शुद्ध । असोन सिद्ध श्रवणासि ॥ ४५ ॥ सद्गुरु साक्ष श्रीरंग । वदवी कथा आपुलि अंगें । सहजीं फावला प्रसादरंग । न पडे व्यंग तेणें चि ॥ ४६ ॥ भक्तमंजरिमालिके प्रति । सिद्ध स्वामि ते करविती । राजारामी लेखणि हातीं । धरिलि प्रीति निमित्यासि ॥ ४७ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । रंगनाथस्वामिचरित्राते । अध्याय होत प्रथम हा ॥ १४८ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ अनुक्रमें अध्याय १६ ॥

## अध्याय १७ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु निजात्मरंगा । पंढरीनिवासा पांडुरंगा । सिद्ध स्वामिया अभंगा । नव्हेसि भंगा भावाते ॥ १ ॥ विनायकाविणें कांहिं । पाहू न देसि सर्वथा हि । व्यापिले तुवां अंतर बाहि । ठाव नाहिं रिता कोठें ॥ २ ॥ दाविले डोळा निजकल्याण । हरपोनि गेले मीतूंपण । येकात्मता सहजीं पूर्ण । सरस्वति जाण वंदिली ती ॥ ३ ॥ तात अंबा अनुक्रमें । कुळदेवता आत्माराम ।

अनन्युक्ति सप्रेम । श्रोते निष्कर्म नमिलेते ॥ ४ ॥ मागिल कथाअनुसंधान । रंगनाथ स्वामिचे सद्गुरु जाण । कन्हाडक्षेत्रि सन्यास घेऊन । राहिले पूर्ण तेथें चि ॥ ५ ॥ नामाभिदान निजानंद । परंपरा वर्णिति शुद्ध । पुढें चमत्कार निर्द्वंद्व । आख्यान विशद श्रवण करा ॥ ६ ॥ रंगनाथस्वामि आत्मा समर्थ । नाझरे ग्रामि वास्तव्य करित । आत्मानुभवि सदा रत । थोर कीर्ति पै ज्याचि ॥ ७ ॥ कोणे येके दिनीं श्रीरंगमूर्ति । मार्गानें अश्वारूढ जात होति । तव तेथें अवचिता येति । रामदासमूर्ति सहज लीळे ॥ ८ ॥ समवेत कल्याण स्वामि आदि करूनि । शिष्यमंडळि रामस्मरणीं । गजर करित येता नैनिं । देखिले तयानि राजयोगिया ॥ ९ ॥ कल्याण म्हणे या पंथानें । आनंदयुक्त पुरुष जातसे कवण । स्वामि अैकता धावले जाण । खुणाविति नैने उमे राहावया ॥ १० ॥ रंगनाथें पाहता रामदासमूर्ति । तात्काळ उडि घातली क्षिति । उभयता संत आलिंगन देति । वर्णिता स्थिति ती अनुपम्य ॥ ११ ॥ मग तेथें वृक्षा खालते । बैसते जाहले हितगुज बोलत । समर्थ बोलति रंगनाथातें । धरिले सोंगाते ऐसिये कां ॥१२॥ रंगनाथ म्हणति तुम्हि श्री मारुति । वैराग्याचि स्वामि आपणा संपति । आमुचि असे जन्मांतर स्थिति । समर्थांप्रति ठाउकी हे ॥ १३ ॥ रामदास वदति भला रे भला । मागील संमंध त्वा जाणियेला । आत्माराम सखा केला । प्रेमें भक्तिला आचरोनि ॥ १४ ॥ आतां ज्ञान भक्तिचा योग । करावया अवतार धरिला सांग । धरुनि शिपायाचे सोंग । जगातुनि निःसंग हिंडतसा ॥ १५ ॥ परि आम्हासि चोरुनि असावे । हे का तुम्हासि वा बरवे । भरतशत्रुघ्न हो ऐसे न करावे । द्वार की सर्व तुम्ही भक्तीचे ॥ १६ ॥ रंगनाथ म्हणति तुम्ही ादिगुरु । आदिनाथा श्रीशंकरु । अकरावा अवतार महारुद्र । मुख्य णींद्र स्वामिचे ॥ १७ ॥ तुम्हासि अम्हि काय नसो विदित । ब्रह्मांड र्णे जया दृष्टित । दडोनि राहावे कोठें तेथें । येकात्मता सर्वां भूति १८ ॥ उभयता संवाद आत्मस्थिति । बोलणें जाहलें अत्यंत प्रिति ।

लिहितां न ये उघड ग्रंथीं । जेथें वृत्ति तन्मय ॥१९॥ रामदास स्वामिस करूनि नमन । रंगनाथ चालिले मार्गानें । समर्थे केले तेथुनि उड्डाण । नामस्मरण गजर करीत ॥ २० ॥ स्वइच्छाच्यारें स्नानास । माहुलि-संगमीं आले रामदास । तेथें पातला दर्शनास । राजा सशिष्य शिवाजि ॥ २१ ॥ प्रार्थना करूनि स्वामिसी । घेऊनि गेला सातारियासि । अनेक द्रव्य पूजनासि । अर्चिले गुरुसि नृपवरें ॥ २२ ॥ अनन्य भावें जोडुनि हात । शिवाजी राजा प्रश्न करित । कोणते स्थळीं कोण संत । सांगा समस्त मजलागीं ॥ २३ ॥ रामदासस्वामिस ऐकोनि ऐसे । जाला अंतरिं परमउल्हास । ऐक म्हणति शिवाजीस । सांप्रत विशेष संत जे ॥ २४ ॥ देहुस्थानिं तुकाराम । वैराग्यभरीत पूर्ण निशिम । गुरुभक्त स्वामि जयराम । स्थान वटग्राम तया ॥ २५ ॥ रघुनाथस्वामि उपासक । आनंदमूर्ति माहा भाविक । तयाचि भक्ति पादुका सुखें । ग्रंथ गीताख्य जाहला ॥ २६ ॥ निरंजन स्वामि गाणपत्य । प्रीति संगमीं वास करित । शिवरामस्वामि विख्यात । कल्याणांत वस्ती जया ॥ २७ ॥ केशवस्वामि वामन । उत्कृष्ट कीर्ति तयाचि जाण । रंगनाथ स्वामि आत्मा पूर्ण । भक्त निधान परम ते ॥ २८ ॥ नाझरे-कर बोपाजीपंत । तयाचे उदरिं जन्मले सत्य । आम्हांसि भेटले अरण्यांत । माहासमर्थ ब्रह्मनिष्ठ ॥ २९ ॥ शिपाई वेश उभयता स्थिति । भूमंडळामाजी सदा फिरति । अनेक संत सांगूं कीति । मौन श्रुति ज्या वर्णिती ॥ ३० ॥ सद्गुरुमुखें ऐकतां ऐसे । चटपट लागली शिवाजीस । रंगनाथ स्वामि पाहावयास । उद्विग्न मानस बहु जाहले ॥ ३१ ॥ करूनि सिविकालोक । विज्ञाप्ति लिहिली अलोलीक । पत्रान्वय सांगतां देव । अनंत मुखें विस्मय करि ॥ ३२ ॥ ऐशि करुणा जेथें भाकिली । पत्रिका पालखि नाझरे-यासि गेलि । वाचुनि पाहतां संतापलि । गुरुमाउलि श्रीरंगमूर्ति ॥३३॥ विठलरावास म्हणति चला । राजा शिवाजी प्रेमळ भला । जेणें मज-कुर ऐसा लिहिला । आले मनाला स्नेह भरतें ॥ ३४ ॥ आत्यास्वामि-

नि येंदुनि आज्ञा । तयांरि करविलि तात्काळ जाणा । स्नान संध्या करूनि भोजना । निघाले स्मरणा करुनि गुरुचे ॥ ३५ ॥ रंगमूर्तिचा खिस-मतगार । योगभ्रष्ट केरया तो निर्धार । ईश्वरि तेज गरुड अंश साचार । निळा अश्वेंद्र स्वामिचा ॥ ३६ ॥ घ्यारि पाय सारिखे ज्याचे । अंबज गति गमन त्या हयाचें । भागानेगराहुनि येणें जयाचें । दिवसांत येक रेवटग्रामा ॥ ३७ ॥ असो ती कथा सांगू पुढारि । रंगनाथ बैसले घोड्यावरि । उभयता बंधु निघालि स्वारि । जावया सातारियासि पै ॥३८॥ सहजगति मार्गे क्रमित । निगाडिसि आले श्रीरंगनाथ । तेथें वर्तमान जाहले श्रोते । परम अद्भुत ते ऐका ॥ ३९ ॥ ग्रामासंन्निध उदकधरण । वाहतसे पाट सदा पूर्ण । तेथें रुतला सव्यचरण । गरुडांश चिद्घन त्या घोड्याचा ॥ ४० ॥ टाच मारिति श्रीरंगनाथ । नाना उपाय करिति हयाते । परी न काढी बाहिर कदा पदाते । तिष्ठ तेथें तो वाजी ॥ ४१ ॥ जाणिला स्वामिनि अंतरभाव । म्हणति ईश्वर इच्छा येथें राहावें । खालि उतरले श्रीरंगराव । श्रीगुरुदेव चित्तिं स्मरोनि ॥४२॥ राज आज्ञांकित जे लोक । तयानि पाहिले हें कौतुक । माघारें पातले निशंक । वर्तमान चोख सांगति नृपा ॥ ४३ ॥ रंगनाथ स्वामि आल्या सहित । राहते जाहले निगडित । डोंगरे पाटील पुण्यवंत । भाविक बहुत तेथिंचे ॥ ४४ ॥ सत्कार तेणें फार केला । ठेऊन घेतले श्रीस्वामिला । म्हणे आज्ञा व्हावि मजला । आश्रमाला बांधवावया ॥ ४५ ॥ पाहोनि तयाचा अंतर्भाव । अवश्य म्हणति श्रीरंगराव । तेथें चि राहिले येकाग्रभावें । वासुदेवचिंतनें ॥ ४६ ॥ कृष्णा तेथुनि युग्म क्रोश । निर्गुणपुर ते अत्यंत विलसे । साधुसमाज अनुक्रमें असे । तटाकास कृष्णेच्या ॥४७॥ शिवाजीराजा गुरुभक्त । सातारयावरिल जो नृपनाथ । रंगनाथचरणिं तयाचा हेत । घ्यावया भेटीते तो निघाला ॥ ४८ ॥ मंत्री प्रधान कारभारि । सैन्यासहित त्या अवसरीं । येते जाहले निर्गुण पुरीं । भजन वैखरि करित पै ॥ ४९ ॥ तव स्वामिनि भोजन करून ।

तांबुल भक्षिला असे जाण । मंचकावरि केलें शयन । पादसंवाहन होतसे ॥५०॥ उभयता शिष्यिणि दोघि जणि । चंद्रमाभागंमा लावण्य खाणि । पाय रगडिति प्रीती करूनि । जन्मांतरिच्या मेदिनि अप्सरा त्या ॥ ५१ ॥ प्रार्थुनि इंद्रदेवासि । जन्म घेतले मृत्युलोकासि । साधावया आत्मज्ञानासि । वैराग्य मानसीं जाहले तया ॥ ५२ ॥ निष्काम होउनि सद्गुरुते । शरण गेल्या रंगमूर्तिते । सेवेमाजि सदा रत । जाल्या त्वरित त्या दोघी ॥ ५३ ॥ वस्त्रें अलंकार वय तारुण्य । करिति चरण संवाहन । हें देखोनि राजियानें । संशय पूर्ण आणिला मना ॥ ५४ ॥ ब्रह्मच्यारि श्रीरंगनाथ । ऐसें बोलति लोक समस्त । परि येथें दिसे विपरित । कैचें वृत्त विलास हे ॥ ५५ ॥ दुधाचिल क्षीर खाणें । केशासि केलें सुगंध चर्चन । आणि तरुण स्त्रिया जवळि जाण । येकांति मन राहिल कसें ॥ ५६ ॥ अग्निमाजि ठेविला घृत । विघरोनि जाईल ते निश्चित । चुंबका सन्निध लोहो चळत । तैसें चित्त पुरुषाचें ॥ ५७ ॥ आशंका ऐसि शिवाजीस । प्राप्त जाहली त्या समयास । नमस्कार केला श्रीरंगमूर्ति । कांहिं वाचेस न बोलवे ॥ ५८ ॥ निद्रा लागतां स्वामिस नैनिं । राजा निघाला खोलितुनि । रंगनाथ माहराज समजले मनिं । बोलाउनि आणविले तया ॥ ५९ ॥ शिवाजीस प्रश्न केला । काय बापा संशय आला । समर्थाचा शिष्य भला । गुरुपुत्र आपणाला म्हणवितोसी ॥६०॥ तात्काळ घेतले मोठे पात्र । शिस्नद्वारा पाडिले रेत पवित्र । राजियासि म्हणति पाहा नेत्रें । पुरुष स्वतंत्र कीं नपुंसक आम्हि ॥ ६१ ॥ आता स्त्रिया असतां सन्निध । ब्रह्मचर्य राहिलें कैसें शुद्ध । हें हि दावितो तुजला प्रसिद्ध । न धरि द्वंद्वशंका मानसिं ॥ ६२ ॥ पुन्हा तैसें चि गुह्यद्वारें । रेत शोषिलें सकळ निर्धारें । जेथिल तेथें केले स्थिर । भयराजेंद्र पावला मग ॥ ६३ ॥ आंगावरि रोमांच उठलें । पंचप्राण व्याकुळ जाहले । शरीर अवघे कापूं लागले । घाबरलें मन तयाचें ॥ ६४ ॥ न कळे स्वामि करितील काय । बळकट धरिले दोन्हि पाय । क्षमा करि श्रीगुरुमाय । अनन्य हृदय

स्वचितसे ॥ ६५ ॥ रंगनाथ स्वामि दयासिंधु । असेल कैचा तेथें क्रोधु। म्हणति राजा हो सावधु । दीनबंधु स्मरिजे हरि ॥ ६६ ॥ सखा माझा श्रीरामदास । तयाचा शिष्य तूं निर्दोष । इतुकिया उपरि कोणा संताप। छळण बुद्धिस न धरि तूं ॥ ६७ ॥ अनेक प्रकारें ब्रह्मनिष्ठ । वर्तती जनि परम श्रेष्ठ । सांगितले तुजला स्पष्ट । न धरि नष्ट संशय तो ॥६८॥ संबोखोनि ऐसे रिति । निर्भय केले शिवाजीप्रति । धन्य कृपाळु श्रीरंगमूर्ति । काय स्थिति वर्णूं ते ॥ ६९ ॥ भीष्मासारिखे ब्रह्मचर्य । किंबहुना श्रीशुकाच्यार्य । नातरि अंजनीचा तनय । तैसा आर्य श्रीरंग ॥७० ॥ शिवाजीने तये काळिं । जोडिलीसे बद्धांजुळि । चिटणीसाहातें सनद लिहिली । पुढें ठेविली स्वामिचा ॥७१॥ द्वादश ग्राम दिधले म्हणतां। हांसें आले श्रीरंगनाथा । च्यार खुंट आम्हा सत्ता । काय कथा इतर ते ॥ ७२ ॥ विस्मय जाहला राजा मनि । दंडवत घातिले मागुतेनि । कृपा भाकी दीनवचनि । अंतःकर्णि सखेद ॥ ७३ ॥ म्हणे पदरचा मी आपुल्या दास । पाय लागावे सातारियास । पूर्ण करा येवढी आस । न आणि त्रास आणिक तो ॥७४॥ आदर जाणुनि श्रीरंगमूर्ति । शिवाजीप्रति काय बोलती । स्वामि समर्थ रामदास येति । तयी निश्चिति कळवी आम्हा ॥ ७५ ॥ कृपाकर ठेवितां शिरिं । आनंद जाहला शिवाजी अंतरिं । आज्ञा घेवोनि सातारया भीतरि । गेला निर्धारि राजेंद्र ॥ ७६ ॥ काहिं दिवसा नंतर जाणा। रामदास आले कृष्णस्नाना । आदि करूनि कल्याणा । नामस्मरणा करित पै ॥ ७७ ॥ माहुली क्षेत्रीं कारकूनदूतें । अकस्मात पाहिले श्रीस्वामिते । सांगत गेले राजीयाते । हर्ष मनांत वै जाहला ॥ ७८ ॥ म्हणे आजीचा धन्य दिवस । सद्गुरु भेटति मज दिनास ।·तात्काळ निघोनि दर्शनास । आला शिष्यराज तो ॥ ७९ ॥ सद्गुरु सत्शिष्य संगम । तेथिल प्रेम ते अनोपम्य । च्यारि वाचेसि जे अगम्य । ग्रंथि धर्म ते कोण वर्णि ॥ ८० ॥ असो उभयतांचा संवाद । लिहूं जातां लेखणि स्तब्ध । विच्यार सांगितला विविध । सायंत शुद्ध

श्रीरंगमूर्तिचा ॥ ८१ ॥ शिवाजी घेऊनि स्वामिते । सातारियास आला उल्हास चित्ते । पालखि सिद्ध करूनि त्वरित । निर्गुणपुराते धाडियेलि ॥ ८२ ॥ रामदास स्वामि आलेति म्हणुन । पत्रिका लिहिली आनंदानें । रंगनाथ स्वामिसि पाहतां जाण । सुख पूर्ण जाहलें मना ॥ ८३ ॥ निळा अश्व जो स्वामिचा । कदा वियोग नसे तयाचा । सज्ज करोनि तो नेमाचा । बैसला साचा श्रीगुरु वरि ॥८४॥ पक्षि गति तो गरुड अंश । निघतां चि पावले सातारियास । शिवाजी राजा श्रीरामदास । पाहता विशेष संत त्रिवेणी ॥ ८५ ॥ तरी भक्ति ज्ञान वैराग्य । मानवरूपें धरिला विग्रह । जगदोद्धार जाणुनि कार्य । मूर्तिमंत देही प्रगटले ॥ ८६ ॥ राजा शिवाजी तो चि भक्ति । ज्ञानस्वरूप श्रीरंगमूर्ति । पूर्ण वैराग्य ज्या मारुति । अवतार क्षिति तो रामदास ॥ ८७ ॥ येकत्र होतां तिन्हि योग । सहजी होतसे त्रिपुटिभंग । स्वानंद वृत्ति अध्यात्म रंग । कोण अभंग वर्णि तया ॥८८॥ आधिं च राजा गुरुभक्त । गृहासि पातले सद्गुरुनाथ । अत्यंत आवडि श्रीरंगपदाते । ऐसियात ते हि आले ॥ ८९ ॥ मग तो सोहळा राजगृहिचा । उपच्यार लिहिले नवजाय वाचा । ब्राह्मणभोजन यज्ञ साचा । उत्कृष्ट भक्तिचा जाहाला तो ॥ ९० ॥ रामदासस्वामि रंगमूर्तिते । कीर्तनिं हेत बहु म्हणत । ऐकाविसे जरि श्रवणाते । होईल तृप्ति ते तरि रंगोबा ॥ ९१ ॥ सकळ रंगाचा जो रंग । रंगनाथ स्वामि तो अभंग । अवश्य म्हणुनि चित्सुखरंग । कथारंग प्रगटविला ॥ ९२ ॥ नगरांतिल पंडित वैदिक । येते जाहले सकळ लोक । अध्यात्ममोक्ता साधु भाविक । श्रवणासि देख बैसले ॥ ९३ ॥ प्रत्यक्ष मूर्ति निजरंगाचि । कीर्तनरंगिं ऊभि साचि । सिमा जाहली वगत्रुत्वाचि । मूर्ति गुरुचि बोलुं लागली ॥ ९४ ॥ ऐसि कथा रंगासि आलि । आबाळवृद्धा मुद्रा लागली । तशांत गोष्टि अपूर्व जाहली । ते हि भली श्रवण करा ॥ ९५ ॥ रंगनाथ स्वामिनि नेत्र झांकीले । वरुते हात दोन्हि केले । कीर्तन करितां उभे राहिले । अवलंबिले मौनस्थिति ॥ ९६ ॥ दोन घटका समग्र पाहि । ताटस्तता

धरिली देहिं । शरीरशुद्धि कांहीं च नाहिं । मग देही नेत्र उघाडिले ॥९७॥ अंगीच्या छायाच्या अस्तण्णा । पिळुनि टाकिल्या उदक जाणा। ऐसे देखुनि सर्वत्र जना । नवल मना जाइलें तें ॥९८॥ रामदासस्वामि काय बोलिले । रंगोबा तुझें कर्तुत्व न कळे। शिवाजीस आश्चर्य वाटलें। प्रश्न केले रंगनाथासि ॥९९॥ दोन घटिका पर्यंत । उगे चि राहिला निवांत । अस्तण्या दोन्हि हाते । दाविले ते काय पिळुनि ॥ १०० ॥ शिवाजीस सांगति रंगनाथ । समुद्रिं होते आज बुडत । शिष्यें केले माझिया स्मरणाते । भागानगरांत राहाणार तो ॥ १ ॥ तेंव्हां तयाचि करुणा आलि । हात घातले आजातळिं । निरूपण राहिलें कीर्तन तळिं । तये वेळीं दोनि घटिका ॥ २ ॥ याचा अनुभव पंधरा दिवसिं । कळों येईल सर्वत्रासि । आश्चर्य करिति नगरवासि । सकळ मानसिं शाहारांतील ॥ ३ ॥ शिवाजीस विस्मय जाला । प्रेमाश्रु घातले नेत्राला । कीर्तनविधि समाप्त केला । मंगळ आरतिला आरंभिले ॥ ४ ॥ पुढें सवे चि पंचदश । दिवस भरले त्या नेमास । सावकार आला सातारियास । घेउनि नवस तो शिष्य ॥ ५ ॥ रंगनाथ स्वामिसि पाहात पाहात । प्रवेश केला राजमंदिरांत । शिवाजी राजिया प्रश्न करित । रंगमूर्तिते दावा म्हणे ॥ ६ ॥ राजा विचारि तयाते । कैसियासि हुडकिला स्वामिते । सांगितला समूळ वृत्तांत । नृपनाथ सद्गद जाहाला ॥ ७ ॥ रंगनायस्वामिस सावकारानें । नाहुं घातले म्हून मोहरानें । बादली पोशाग देऊन । तुरा पूर्ण लावियला ॥ ८ ॥ रत्नजडित घालुनि कंठिं । सद्गुरुपूजा केलि गोमटि । रामदासस्वामिस पाहतां दृष्टि । सुखवृष्टि जाहालि ते ॥ ९ ॥ षडरस करूनि पक्वान्न । जेवविले असंख्य ब्राह्मण । साखर वाटिली आनंदें करून । समस्ता लागुन तेणें पै ॥ ११० ॥ वर्तमान फाकले शाहारांत । अवतारि पुरुष श्रीरंगनाथ । सांगितली कीर्तनि मात । प्रत्यय त्वरित आला तो ॥ ११ ॥ निंदक जाहले लज्जायमान । करूं लागले भाविक स्तवन । अनुताप तापले मन । धरिले चरण स्वामिचे

॥ १२ ॥ असो रंगनाथस्वामि आणि रामदास । सातारयांत राहिले अठरा दिवस । नंतर निघाले स्थानास । आपुल्या देशास स्वछंदें ॥ १३ ॥ समागमें घाळवित । चालिला शिवाजी नृपनाथ । आज्ञा दिधली सावकारातें । भागानगरात जावया ॥ १४ ॥ शहरांतुन बाहिर निघतां । वैरागी आले अवचिता । विच्यारित चालीले श्रीरंगनाथा । ऐका कथा ते श्रोते ॥ ११५ ॥ हिंदुस्थानि महा समर्थ । कन्हैयादास वैरागी महंत । तेणें ऐकिले स्वामिकीर्तिते । अध्यात्मवेत्ते श्रीरंगोबा ॥ १६ ॥ फिरत फिरत शोध करित । सातारियासि आले हुडकीत । तो अकस्मात भेटले श्रीरंगनाथ । सद्गुरुनाथ मार्गि तया ॥ १७ ॥ बोळख नाहि वैरागीयासि । विच्यारिति प्रत्यक्ष स्वामिसि । रंगमूर्ति आहेति सातारियासि । किंवा स्थानासि गेले पै ॥ १८ ॥ ऐसे ऐकोनि श्रीरंगनाथ । उतरते जाहाले अश्वाखालते । नमस्कार केला वैरागियाते । अनन्यचित्तें स्वामिनि ॥ १९॥ म्हणति रंगोबा नामाभिदान । या चि देहासि बोलति जन । आपुला देश सागा कवण । इकडे येणें किंनिमित्य ॥ १२० ॥ वैरागिराम तये वेळा । निवेदन करिति विच्यार आपुला । रामानुज पंथ भला । असो स्थळा हिंदुस्थानि ॥ २१ ॥ तत्ववेत्ता श्रीरंगनाथ । श्रवणि ऐकिलि ऐसि कीर्त । यतद्विषई दुरिपथ । आलो हुडकीत आपणासि ॥ २२ ॥ परी येथें दिसे विपरीत । शिपाई डौल आश्रित । ब्रह्मचर्य कैचे व्रत । वैराग्य किंचित नसे पै ॥ २३ ॥ काय झगा शाहाल्लव तवल्याचा । तुरा खोविला शीरिं मोत्याचा । भरजरि पोषाग करुनि साचा । छंद घोड्याचा बैसला वरि ॥ २४ ॥ खटाटोप हा तुम्हा श्रेष्ठा । कासया पाहिजे ब्रह्मनिष्ठा । सहन करावे शरीर कष्टा । तरी च शिष्टा थोरपण ॥ १२५ ॥ वैरागियानें बोलतां ऐसें । श्रीरंगमूर्ति काय म्हणतसे । येकाग्र करुनि श्रोतिं मानस । ऐका शब्दास स्वामिचे ॥ २६ ॥ अनेक प्रकारें संत वर्तति । जगाते न कळे तयाचि स्थिति । मुख्य येथें आत्मप्रचिति । साधु जगति ते चि पै ॥ २७ ॥ त्यागभोग

सांडि मांडि। घेतला संन्यास त्रिदंडि। तोडिले सूत्र काढिली शेंडि। ज्ञान प्रौढि तया कैंचि ॥ २८ ॥ पंच्याग्नि धुम्रपान। जटा राखुनि वागशुन्य। तेणें न घडे समाधान। कृपेवांण सद्गुरुचे ॥ २९ ॥ नानाविध बहिर्मुख। आचरण करिति प्राणी मूर्ख। सारांश येथें निजात्मसुख। साधिल चोख धन्य ते ॥ १३० ॥ देहासि प्रारब्ध भोगवित। सर्वसाक्षि आपण आलिप्त। वैरागि बावासि श्रीरंगनाथ। बोधिले तेथें ऐशापरि ॥ ३१ ॥ परि तयाचे अंतःकर्ण। संशयग्रस्त जालें मन। म्हणे बोला ऐसें वर्तणें। तो चि जाण योगि पै ॥ ३२ ॥ याहुनि द्रढत वैरागियाचे। सकळ ऐश्वर्य त्यागिले साचे। वस्त्रें अळंकार नेमाचे। घोडियाचे वहनासहित ॥ ३३ ॥ कौपिनपरिधान असे चि पहिले। शीरिं केश मोकळे केले। शुकासारिखे ध्यान शोभले। चकित जाहाले वैरागि ॥ ३४ ॥ शिवाजी राजियास। देखुनि जाहले परमक्लेश। रंगनाथ स्वामिनि तयास। केला संतोष बहुयुक्ति ॥ ३५ ॥ आज्ञा देउनि स्वस्थाना। धाडिला राजा आपुल्या सदना। आपण निघाले तीर्थाटणा। वैरागिजना समवेत ॥ ३६ ॥ मार्ग क्रमित दोन प्रहरिं। येते जाहाले कृष्णातीरिं। स्नान करुनि शिळेवरिं। निद्रा थोरि केली ते ॥ ३७ ॥ वैरागीराम आज्ञा घेउन। भिक्षेसि गेले गावात जाण। पानगे करावया पीठ आणून। भक्षाया जाण उभयता ॥ ३८ ॥ तंव इकडे काय जाहले। ऐकावे श्रोतिं नवल। रंगनाथ स्वामिचा शिष्य ते वेळे। येते जाहाले ते स्थानिं ॥३९॥ निसिम गुरुभक्त श्रीमंत। सद्गुरु दर्शना निगडिसि जात। सहजी उतरला मार्गात। श्रीकृष्णेते पाहुनी ॥ १४० ॥ बाहिर्भूमिसि जावया। गृहस्थ आला तो तया ठाया। जवळि येता श्रीगुरुराया। वोळखुनि पाया नमियेले ॥ ४१ ॥ खळखळा नेत्रीं अश्रु पातले। स्वामिचरणिं मस्तक ठेविले। वस्त्रें अळंकार लेवविले। घेउनि गेले डेरयासि ॥ ४२ ॥ मग गुरुपूजन सावकारानें। आरंभिले प्रिति करून। केलें अंगा सुगंधचर्चन। घातिले स्नान स्वामिसि ॥ ४३ ॥

करवीला पारिधान पीतांबर । नाना सुमनें रत्नहार । सिंव्हासन करुनी साजिरे । बैसविले श्रीरंगनाथा ॥ ४४ ॥ पायसादिक पक्वान्नें । पात्रें वाढिलीं समग्र जाण । उत्तम प्रकारें भोजन । केला पूर्ण नैवेद्य ॥ ४५ ॥ त्रयोदश गुणी तांबुल । समर्पण जाला प्रांजळ । विंजणा वारिति उष्णकाळ । वसंत निर्मळ म्हणुनि ॥ ४६ ॥ ऐसा सोहळा शिष्यभक्ति । भोगितसे श्रीरंगमूर्ति । तव भिक्षा घेउनि परम युक्ति । आले निगुति ते वैरागि ॥४७॥ पाहूं जातां स्वामि स्थळासी । कोठें न पडे दृष्टिसि । विच्यारिति सैन्यासि । येक उदासि देखिला काय ॥ ४८ ॥ ऐसें ऐकतां श्रीरंगनाथ । वैराग्याकडे गेले धांवत । वस्त्रें अलंकार देऊनि तयाते । जाहाला अत्यंत विस्मय ॥ ४९ ॥ म्हणे स्वामि सद्गुरुनाथा । छळण केलें मी वाउगें वृथा । चरणावरि ठेविला माथा । अपराधि सर्वथा म्हणुनि ॥ १५० ॥ राजयोगि श्रीरंगनाथ । वैराग्यखाणि माहासमर्थ । कळों आले तुटली भ्रांत । ऐसें वदत तो वैरागि ॥ ५१ ॥ मग स्वहस्तें वैरागियाते । पाक सारोनि केलें भोजन । पाहुनिया येकांतस्थात । बैसले जाण उभयता ॥ ५२ ॥ रंगमूर्तिसि सप्रेमें । नमस्कार घातिला वैरागीरामें । पूर्वपक्ष केला परब्रह्म । कैसा नेम आहे सांगा ॥ ५३ ॥ जैसा चंद्र पाहुनि पूर्णकळा । भरतें दाटे समुद्राला । प्रश्न करितां श्रीरंगाला । तैसी लिला जाहाली ते ॥ ५४ ॥ स्वामिरायें वैरागियाते । मेळविले स्वात्मसुखातें । प्रहर समग्र येक पर्यंत । समाधिस्त पै जाहाले ॥ ५५ ॥ उभयता येउनि देहावरि । नमन केलें परस्परी । वैरागी रामतीर्थांतरि । पृथ्वीवरि विचरति ॥ ५६ ॥ शिष्यासहित श्रीरंगनाथ । निगडिसि आले आनंदयुक्त । सामोरे पातले ग्रामस्त । जोडुनि हात प्रेमळ ते ॥ ५७ ॥ स्वआश्रमो पंचमाहयज्ञ । करुनि वर्तति जाण । निमग्न सदा स्वरूपीं पूर्ण । ते ते धन्य लोकत्रै ॥ ५८ ॥ पुढें चमत्कार आणीक कथा । वर्णिजेल आख्यान हे चित्तत्वता । श्रोते असावें सादरता । तेणें स्वार्थी पवित्रें ॥ ५९ ॥ मर्क-

तयासि ॥ २४ ॥ मग गयावर्जन पितराचें । आणि जयरामस्वामी समर्थाचें । रंगमूर्तिनि केलें साच । काया वाचा मनें करूनि ॥ २५ ॥ कर्मविधि सकळ जाहला । निरोप क्षेत्रस्थानि दिधला । घालवित आले स्वामिला । नमस्काराला करिति पै ॥ २६ ॥ क्षेत्रा बाहेर निघता जाण । पत्रिकेचें जाहालें स्मरण । अज्ञापिति विप्रा लागुन । सच्चिद्घन श्रीरंगनाथ ॥ २७ ॥ म्हणति अभंग देता भागिरथीसि । प्रत्योत्तर येईल हातासि । आणुनि धावें मजपासि । येवढें तुम्हासि विनवणि ॥ २८ ॥ द्विज वदिति स्वामिराय । हें तों न घडे आम्हासि कार्य । तयें काळीं श्रीगुरु स्वयें । परतले अद्वय माघोरे ॥ २९ ॥ भागीरथीतटाकीं जाउन । जयदेवा सारिखें केलें स्तवन । मग चमत्कार जाहला जाण । ऐका श्रवण श्रोतिये ॥ ३० ॥ जळांतुनि प्रत्यक्षता । हस्त काढिला असे वरुता । आनंद जाहला श्रीरंगनाथा । पत्रिका हातांत बोधित ॥ ३१ ॥ स्थीर व्हावया अर्थे । संकेत दाविला वामहस्तें । रंगनाथस्वामिनि जोडुनि हात । जाहले स्थित अर्ध घटिका ॥ ३२ ॥ अळंकारयुक्त पाहत कर । दचकले सकळ द्विजवर । पत्रिकेचें उत्तर सुंदर । दिधलें सुंद भागिरथिनें ॥ ३३ ॥ तयाचा अर्थ पाहुं जाता । जीव पार्वा सायोज्यता । ऐसें उत्तर दिधलें सर्वथा । अभंगपर तत्वता तें ऐका ॥ ३४

## अभंग भागीरथीचा

आजीचा दिवस धन्य मज जाहला । सद्गुरु भेटला पत्रास्तव ॥ १
मजमाजि प्राणि पवित्र जे होति । ते दोष लागति माझे अंगीं ॥ २
माझेये अंगींचा मळ काढिल कोण । ऐका तुम्हावांचुन विष्णुदासा ॥ ३
ऐका रंगमूर्ति सांगावे निरोपा । नमस्कार बापा तुकोबासि ॥ ४ ॥

ऐसियापरि भागीरथिनें । पत्र दिधलें असे जाण । न करवे तो लेखन । परि सांगणें कांहि येक ॥ ३५ ॥ साधु माहात्म न कळे कवण वर्णितां अहो पावला मौना । भागीरथि म्हणुनि स्वमुखें जाणा । वद स्तवना धन्य म्हणुनी ॥ ३६ ॥ रंगमूर्तिचें दर्शन जाहलें । आ तुकयाचें पत्र पाहिलें । येणें योगें हस्त काढिलें । गौरविलें उदकाद

॥ ३७ ॥ दीनवदनें पत्रिकेंत । तीर्थस्वामिनीं स्वयें लीहित । परिसा त्याचा तुम्हि अर्थ । चतुर श्रोते पंडित हो ॥ ३८ ॥ दोषि येउनि करिति स्नान । ते दोष जडति मज लागुन । न होय तो त्याचे निवारण । दर्शनावीण संताचे ॥ ३९ ॥ ऐसे समर्थ जे, वैष्णव । मुख्य अभंगीं हा चि भाव । नमन करूनि केला गौरव । तो, अभिप्राय अनिर्वाच्य ॥ ४० ॥ जान्हवीनें ऐसिया परि । पत्र दिघलें रंगनाथाकरि । सद्गद होउनि अंतरि । नमस्कारि स्वामिते ॥ ४१ ॥ असो पत्रिका घेउनि श्रीरंगभूर्ति । माघारे निघाले निर्गुणपुरांप्रति । भजन करित मार्ग क्रमिति । सहजास्थिति स्वानंदें ॥ ४२ ॥ शाहार पट्टणें ग्रामें नगरें । वस्तिसि राहाता जीवोद्धार । करिते जाहाले कृपासागर । श्रीरंग थोर श्रीगुरूनाथ ॥ ४३ ॥ पंढरिसी येता पाहि । उचंबळलें प्रेम ह्रदई । धीर न पडे स्वामिसि कांहि । श्री विठोबाबाई पाहावया ॥ ४४ ॥ इकडे देवासि त्वरा जाहली । संतमंडळी सामोरि आली । भजनकडाकाध्वनि चालिली । वाजति भली अनेक वाद्यें ॥ ४५ ॥ देव भक्त मिळतां मिळणि । तया सुखा कोण वर्णि । तव इतुकीयात तुकारामानि । भावें करूनि नमन केलें ॥ ४६ ॥ मग तें पत्र पाहुनि डोळा । तुकोबाचा कंठ दाटला । प्रेमाश्रूचा लोट चालिला । भावें आळंगीला श्रेष्ठी ते ॥ ४७ ॥ परस्परें होता आलींगन । संवाद जाहाला निजात्मखूण । धन्य धन्य ते साधु पूर्ण । श्रीरंगनाथ मान्य आणि तुकोबा ॥ ४८ ॥ मग कांहीं दिवस राहुनि पंढरिंत । निर्गुणपुरास आले श्रीरंगनाथ । सामोरे येउनि ग्रामस्त । जोडुनि हात सकळ हि ॥ ४९ ॥ तीर्थविधि मावदे सोहळा । यथायुक्त सांग जाहला । आपआपुले स्थानाला । गेला मेळा संताचा ॥ ५० ॥ आणीक चमत्कार अद्भुत गोष्टि । रामदास माहाराज आले भेटि । आनंद जाहाला श्रीरंगपोटि । आमतां मठि निर्गुण पुरि ॥ ५१ ॥ परस्पें आलिंगन होऊन । येकांति बैसके उभयता जाण । सहजी घडले वेदांतभाषण । कोण वर्णन करि तया ॥ ५२ ॥ मग बोलति सद्गुरुनाथ । रंगराया चला अरण्यात । इछा फार आहे मनांत । सत्सं-

गात वनि क्रीडावया ॥ ५३ ॥ ऐसे म्हणतां चि स्वामिनिं । श्रीरंगमूर्तिति उल्हास मनि । तात्काळ गेले उठोनि । पर्वति निघोनि अंब्रापुरीचे ॥ ५४ ॥ स्नान करोनि श्रीकृष्णेसि । आले उभयता वर्ण्यापासि । शमीवृक्ष पाहुनि दृष्टिसि । स्थीर मानसीं बहु जाहले ॥ ५५ ॥ स्वानंद शद्ब क्रीडो जाता । माध्यानीसि आला सविता । संवाद सारूनि मग तत्वता । विच्यार सर्वथा करिति पै ॥ ५६ ॥ सचिद्घन श्रीरामदास । प्रश्न करीति रंगमूर्तिस । आजी तुह्मा भोजनास । कोठें पायस भक्षावया ॥ ५७ ॥ निंबपत्रें कल्याणाहातें । आणवितो ह्मणति सद्गुरुनाथ । सेवन करूं आनंदांत । विलास समस्त कैचे ते ॥ ५८ ॥ ऐसें ऐकुनि श्री रंगनाथें । हास्य करूनि जोडिले हात । वदति तेव्हां सुनिश्चित । प्रारब्ध सत्य न टळे ते ॥ ५९ ॥ तव इतुकियात लवलाही । विचित्र वर्तले असे पाहि । अकस्मात तये ठाईं । अनन्यहृदई अमात्य पातले ॥ ६० ॥ रंगमूर्तिचा तो सत्शिष्य । रामचंद्र नाम तयाचे असे । केला होता तेणे नवस । सद्गुरुस परम प्रीति ॥ ६१ ॥ गुरुवारिं निगडिसी जाऊन । नैवेद्य करावा पायस अन्न । तो रात्रौ जाहाले तयासि स्वप्न । जावे ह्मणुन वर्ण्याजवळ ॥ ६२ ॥ तेव्हां दुधाच्या कावडि भरुनि । साहित्य सकळ सिद्ध करूनि । येता जाहला तये स्थानिं । निमग्न भजनीं समारंभें ॥ ६३ ॥ हें पाहुनि रामदासस्वामि । आश्चिर्य करिति अंतर्यामि । रंगनाथ ह्मणति काय करूं मी । न चुके धर्मि प्रारब्ध हे ॥ ६४ ॥ मग तया अरण्यांत । ब्राह्मणभोजन जाहलें निश्चित । रामदास माहाराज शिष्यसहित । श्रीरंगनाथ जेविले पै ॥ ६५ ॥ आमात्यपर्यंतें प्रसाद घेउनि । स्वस्थानासि गेले निघोनि । अद्भुत त्याचि न कळे करणी । सहस्त्रवदनि न. वर्णवे ॥ ६६ ॥ आपआपुल्या स्वस्थानासि । जाते जाहाले चित्सुखराशि । पुढें कथा वर्तली कैसि । ते हि मानसि ऐकीजे ॥ ६७ ॥ रामदासस्वामि परळिसि असतां । शिष्यसमुचय मिळाला भोवता । आवलोकिति अद्वैत ग्रंथा । नाम तत्वता दासबोध ॥ ६८ ॥ तये काळिं कल्याणास । उगेच

वांटले मनास । सांडुनिया सगुणास । वेदांतास काय पाहाणें ॥ ६९ ॥ हें जाणुनि सद्गुरुनाथें । विच्यार केला सहजीं मनांत । धाडावया निगडिते । श्रीरंगनाथभेटिसि ॥७०॥ ह्मणति कल्याणा निर्गुणपुराते । जाउनि यावे तुवा निश्चित । नमन करुनि रंगोबाते । पत्र तयाते देउनि ॥ ७१ ॥ उत्तर देतिल ते घ्यावे । मागुति आजि लवकर यावे । ऐसे वदतां श्रीगुरुदेवें । आज्ञा भावें वंदिली ॥ ७२ ॥ अर्ध्या श्लोकांत सुचउनि उक्ति । पत्रिका दिधली कल्याणाहाति । तात्काळ निघोनि सत्वरगति । गेले निश्चिती निर्गुणपुरा ॥ ७३ ॥ पटशिष्य पाहुनि श्रीस्वामिचा। आनंद जाहला बहुत साचा । हस्त धरोनि तयाचा । वेदांत वाच्या बोलति ॥ ७४ ॥ कल्याणानें साष्टांग नमोन । पत्रिका केलि समर्पण । रंगनाथस्वामिनि पाहुन । अंतःकर्ण सद्गद पै ॥ ७५ ॥ परस्परें जाणुनि खुणेसि । हासिनले कैवल्यरासि । लेखन केलें उत्तरार्धासि । चिद्विलासि श्रीरंगनाथें ॥ ७६ ॥

## रामदासस्वामिची उक्ति श्लोक अर्धा।

अद्वैतचर्चा कंटाळवाणी । सांडूनि वर्णा कोदंडपाणी ।

रंगनाथस्वामिचि उक्ति श्लोक अर्धा ।

अद्वैतचर्चा जंव हे कळेना । तों पूर्ण रामीं मन हे वळेना ॥ १ ॥

इति श्लोक

हे पत्रिकेचें उत्तर पाहुनि । कल्याण दचकला तेथें मनीं । श्रीरंगमूर्तिसि नमन करुनि । आले निघोनि परळीसि ॥ ७७ ॥ सद्गुरुपदासि प्रेमाश्रूनें । अभिषेचिले असे जाण । रामदासस्वामिनिं कृपें करून । गाढ आलिंगन दिधलें त्या ॥ ७८ ॥ असो रंगनाथ आणि श्रीसमर्थ । येकरूप उभयता सत्य । उपासना अद्वैत । बाणलि त्वरित कल्याणा ॥ ७९ ॥ पुढें कथा अपूर्व बरवी । श्रोतें जनिं ते परिसावी । राजारामि सदा रमवी । देवोनि पदवी श्रीरघुवीर ॥ ८० ॥ जन्मोजन्मीं स्वतसिद्ध । लाड पाळि श्रीगुरुसिद्ध । निज दृष्टि करुनि प्रसाद । योजिले शुद्ध संतस्तवनीं ॥ ८१ ॥ भक्तमंजरिमाळा ग्रंथ । श्रवणें ।चि पुरति

मनोरथ । रंगनाथस्वामिचरित्राते । अध्याय होत तिसरा हा ॥ ८२ ॥
॥ अध्याय ३ ॥ समाप्तः ॥ अनुक्रमें अध्याय अठरावा ॥ १८ ॥

## अध्याय १९ वा

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय जया जी अपारा । सद्गुरु सिद्धा निर्विकारा । अंतर्बाह्य तूं सारा । नाहिं थारा भीवणासि ॥ १ ॥ परि सेव्य सेवकपण । राहाता सुख घडे जाण । गुरुशिष्य जेथें शुन्य । तें तों ज्ञान धिग पै ॥ २ ॥ तरि माउली मी तान्हें । प्रेमपान्हा पाजि पूर्ण । नातरि सिंधु श्रीभगवान । तेथें क्रीडेन मछ मी ॥ ३ ॥ किंबहुना चिदाकाशि । वायु विचरे स्वानंदविळासि । मागणें माझें निजपदासि । वेगळेपणासि तैसें उरो ॥ ४ ॥ गोडि माजि शर्करा । कीं कर्पुरिं सुगंध अभेद खरा । नमन माझें श्रीगुरुवरा । अनन्य विचारा तदांशें ॥५॥ निज आत्मरंगकथा गहन । वदविता स्वामि सिद्ध पूर्ण । अखंडाकार मंगळाचरण । जाहालें नमन सहजी ते ॥ ६ ॥ श्रोतिं अवधान देता भले । सिद्धि मनोरथ पाविजेल । आणि तात्काळ मुक्ति वरिल । श्रवण भले या रिति ॥ ७ ॥ कृष्णातटाकीं निगडिग्रामि । वास्तव्य करिति रंगनाथस्वामि । आत्या धाकुटे गृहस्ताश्रमि । श्रवण निर्धर्मि ब्रह्मनिष्ठ ॥ ८ ॥ निस्पृहता वैराग्य पूर्ण । निरंतर जयाचें होतसे भजन । कीर्तनिं वश्य केला भगवान । रात्रंदिन सन्निध ॥ ९ ॥ पंढरीचा बहुत प्रेमा । ऋणी केले त्या श्रीरामा । अंतर न पडे कदा नेमा । करिति पौर्णिमा गोपाळाकाला ॥ १० ॥ खंडोबा पुतण्या श्रीरंगमूर्तिचा । स्वामिचरणीं भाव तयाचा । काळ सारिका सेवेंत साचा । निःशीम भक्तिचा पुतळा जो ॥ ११ ॥ परि बुद्धिहीन मतिमंद । उगा चि बैसे सदा स्तब्ध । क्षणतां नये येक पद । अभंग विविध कांहिं च पै ॥ १२ ॥ कोणी येके समइं श्रीरंगनाथ । पंढरीसि निघाले आला समर्थ । समागमें

खंडोपंत । गुरुभक्त प्रेमळ तो ॥ १३ ॥ गजर करीत आनंदेंसीं । येते जाहाले श्रीक्षेत्रासि । साष्टांग नमिला ऋषिकेशि । देवभक्तासि आलिंगन ॥ १४ ॥ संतोषले श्रीरुक्मीणिरमण । संतसमुचय हर्षायमान । परस्परें करीति नमन । अबोलणें प्रेम ते ॥ १५ ॥ स्वमुखें बोलति श्रीभगवान् । कीर्तन करावें रंगमूर्तिनें । राउळामाजि संनिधान । उभे राहुन गरुडपारि ॥ १६ ॥ आज्ञा वंदुनि श्रीरंगनाथ । उभे ठाकले आत्मा समर्थ । शुकादिक बैसले जेथें । ऐकावया ते काळिं ॥ १७ ॥ रामदासस्वामिं शिष्यसहित । जयराम गोसावी गुरुभक्त । तुकाराम संत विख्यात । गाणपत्य श्रीनिरंजन ॥ १८ ॥ आत्मवेत्यामाजि पंडित । वामनस्वामि जो कां समर्थ । आनंदमूर्ति माहा भागवत । श्रीरघुनाथ उपासक जो ॥ १९ ॥ केशवस्वामि ब्रह्मनिष्ठ । कल्याणकर शिवराम भट । आणीक मिळाले संत शिष्ट । नामें श्रेष्ठ तयाचिं ॥ २० ॥ ऐसे श्रोते श्रवणार्थि । कीर्तन करिति श्रीरंगमूर्ति । तेथिल रहस्य शेषाप्रति । सरस्वतीते न वर्णवे ॥२१॥ श्रीरंगाचें आत्मरंग । रंगनाथस्वामि आत्मा अभंग । भरतशत्रुघ्नाचें अवतार सांग । शिपाई निःसंग साजिरे ते ॥ २२ ॥ लावण्यखाणि आकर्णनयन । विष्णुसारिखीं जयाचिं ध्यानें । वस्त्रें आलंकार तैसीं भूषणें । अत्यंत जाण ब्रह्मनिष्ठ ॥ २३ ॥ भर्जरि पोषाख शाणन तक्याचा । झगा आंगिं घातिला साचा । पायजमा उभय मूर्तिचा । मस्तकिचा फेटा जो ॥ २४ ॥ कीर्तनरंगीं ऐशा स्थिति । रंगनाथस्वामि आत्मा विभूति । प्रभा फांकली तेज दीसे । पाहातां मूर्ति आनंद ॥ २५ ॥ मग तो संवाद स्वात्मसुखाचा । ग्रंथि लिहिणें न घडे साचा । जेथें वगत्रुत्व सकळ रंगाचा । कवि वाचा श्रीरंगोबा ॥ २६ ॥ ताटस्ता देवालागिं । मुद्रा लागली अद्यापि जगिं । मनन होतसे पांडुरंगिं । कीर्तनरंगीं त्या अर्थाचें ॥ २७ ॥ नित्यनेम सायंकाळिं । ऐसि होतसे कीर्तन धुमाळि । वाट पाहातसे श्रीवनमाळि । कटिकमळिं ठेउनि कर ॥ २८ ॥ कोण्हि एक दिवसिं रंगमूर्तिस । उशिर लागला सायंसंध्येस । म्हणुन खंडेराव पुतणे तयास । धाडिले

असे पुढें स्वामिनि ॥ २९ ॥ सत्वर येतो ह्मणुन । सांगावे श्रोतिं लागुन । ऐसे आज्ञापिता खंडोबानें । केलें गमन राउळासि ॥ ३० सकळ संता नमन करुनि । सुचविलें स्वामि येताति ह्मणोनि रामदासस्वामि आदिकरूनि । बोलति वचनि काय तया ॥ ३१ रंगोबा येई तवपर्यंत । उभे राहावें तुह्मि खंडोपंत । करवा कीं श्रवणातें । भागवतअर्थ लोळा ते ॥ ३२ ॥ ऐसे बोलतां खंडेरायाते पश्चात्ताप जाहाला मनातें । खळखळा नेत्रि अश्रु वाहात । आले धांव विन्हाडासि ॥ ३३ ॥ म्लान वदन अवलोकोनि । प्रश्न केला रंगमूर्तिनि पाणी आलें समर्थ नयनि । श्रमि अंतःकर्णि कां खंडोबा ॥ ३४ विच्यारितां स्वामि ऐसें । ह्मणे मी व्यर्थ आलों जन्मास । संत सर्वे जाहाले हांसे । काय दुःखास सांगूं पै ॥ ३५ ॥ अक्षरहीन मी मंदमति आणि कीर्तन करा अवघे वदति । येक हि अभंग मजप्रति । न युक्ति काय ह्मणूं ॥ ३६ ॥ रंगनाथस्वामिनि त्ये वेळा । मस्तकीं हा पूर्ण ठेविला । जिव्हा ह्मणति खंडोबाला । काढि भली आपुली तूं ॥ ३७ मग वैखरिमाजि श्री अक्षर । लिहिलें स्वामिनि स्वकरें । नाम ठेवा श्रीधर । कीर्तन गजर करविति ॥ ३८ ॥ आलंकार भूषणें आपुां वस्त्रें । श्रीधरासि तेव्हां दिधलीं पवित्रे । अवलोकितां कृपा नेत्रें ज्ञान स्वतंत्र उद्भवलें ॥ ३९ ॥ जैसें कां रेडियासि । ज्ञानदेवें च‍उ वेदासि । बोलविलें पैठणासि । गति तैसी जाहली ते ॥ ४० ॥ श्रीधरबावानि तात्काळीक । संतचरणीं ठेउनि मस्तक । उभे राहिले निःशंक । कीर्तन चोख करावया ॥ ४१ ॥ मग तो कथेचा अद्भुत रंग । श्रवण करिति श्रीपांडुरंग । रामदासादि निःसंग । निजरंग सुखावले ॥ ४२ ॥ रंगनाथस्वामि कीर्तन करिति । ऐसें वाटले श्रोतियांप्रति । आलंकार वस्त्रें अंगावरूति । तैसे स्थिति वागत्व ॥ ४३ ॥ मध्यान रात्र गेलि टळून । तरि पुरे न होय श्रवण । विरोनि गेलें देहभान । श्रोतेजन समाधिस्त ॥ ४४ ॥ असो तीन प्रहर निशि होता । आरति केली पंढरिनाथा । रंगनाथचरणीं ठेविला माथा । रामदाससमर्थां आदिकरुनि

॥ ४५ ॥ साधुमंडळि तये वेळिं । प्रसन्न होउनि आज्ञा केलि । वाग्देवता जिव्हे भलि । वसो सरली तुझ्या पै ॥ ४६ ॥ प्रसाद होता श्रीधरासि । ग्रंथ जाहाले निश्चयेसि । मान्य होवोनि सर्वत्रासि । भाविक तयासि वाचिति ॥ ४७ ॥ रामविजय हरिविजय । पांडवप्रताप निःसंशय । शिवलीलामृत निश्चय । नामें अद्वय अपूर्व जया ॥ ४८ ॥ ऐसि संतकृपा समर्थ । धन्य स्वामि श्रीरंगनाथ । कीर्तन करविलें श्रीधरा हातें । अज्ञान अत्यंत असतां पै ॥ ४९ ॥ कांहिं दिवस राहुन पंढरि । येते जाहले निर्गुणपुरि । समागमें श्रीहरि । घालवित गजरिं आले ते ॥ ५० ॥ येकात्मता देवभक्त । निगडिग्रामिं राहिले स्वस्थ । नित्योत्छाह आनंद होत । भजन सतत ज्या स्थळिं ॥ ५१ ॥ जड जीव जे शरण येति । कृपेनें तया उद्धारिति । समान दया सर्वां भूतिं । बहु प्रीति अन्नदानिं ॥ ५२ ॥ प्रत्यहिं होतसे ब्राह्मणभोजन । कीर्तनविधी पुराण-श्रवण । जे जे बोलति ते ते स्तवन । सहजीं कवन रंगमूर्तिचे ॥ ५३ ॥ आतां स्वामिसेवेमाजि । आज्ञा करिति ह्मणति हा जि । फेरित असावा निळा वाजि । जावें सहजि मळ्याकडे ॥ ५४ ॥ रुईचिं झाडें पाहातां नयनिं । सुंदर काव्य करावें वनिं । पदें ल्पाहावीं अर्कपानिं । निबिडपाणि वेदांत ॥ ५५ ॥ असंख्य वृक्ष अरण्यांत । लेखन केलें आत्या समर्थ । येके दिवशीं श्रीरंगनाथ । गेले हिंडत तये स्थळा ॥ ५६ ॥ ह्मणति येथे झाडावरि । लिहिले कोणी सांग निर्धारि । माळि बोले तेव्हां वैखरि । कवनकुसरि विठलरायाचे ॥ ५७ ॥ घरासि येउनि प्रश्न आत्यातें । करिते जाहाले श्रीरंगनाथ । तये काळिं जोडुनि हात । निवेदन वृतांत करिति ते ॥ ५८ ॥ निजकृपें होतसे स्फुरण । तें चि करितो मी लेखन । होईल आज्ञा ते प्रमाण । आणीक नेणे दुजे पै ॥ ५९ ॥ ऐसें ऐकोनि श्रीरंगनाथें । प्रसाद केला अत्यास्वामिते । मस्तकीं ठेविला पूर्ण हात । बोल ह्मणत श्रुतिअर्थासि ॥ ६० ॥ आजिपासोनि आह्मि कवन । सोडिले तुवा वाक्य करणें । आज्ञा करितां वंदिले चरण । भावेंकरून आत्यानि त्या ॥ ६१ ॥

उपनिषद्भाग सिद्धांत । वर्णिला असे ज्या पदाते । मनन करितां निजपदाते । प्राणी पावत असंख्य ॥ ६२ ॥ अभंगि नाम रंगमूर्तिचे । आत्यास्वामि घालिति साच । निरसन केलें आपुलेपणाचें । द्वैत कैचें अभेदता ॥ ६३ ॥ येकात्मता क्षर अक्षर । जीव शिव ते चि निर्धार । विज्ञानभक्तिचा जो विचार । सरला थोर या अवतारिं ॥ ६४ ॥ त्वंपद तत्पदासि नाहिं भेद । असिपदिं फावला आनंद । निजानंद तो सद्गुरु प्रसिद्ध । विनविले सिद्ध श्रीरंग ते ॥ ६५ ॥ आत्यास्वामि निजपदिं । मिळोनि गेले आत्मसिद्धि । शोभे नाम ते त्रिशुद्धी । सकळ पदिं यालागिं ॥ ६६ ॥ जें जें करुन श्रवण करिति । तयासि लाभे सायोज्यमुक्ति । अर्थीं धरितां दृढ प्रीति । ज्ञानोक्ति त्या वारितसे ॥ ६७ ॥ आत्यास्वामिचि पदरचना । सारिखी त्रैलोक्यांत नसे जाणा । जैसे श्रुति ह्मणतां ब्राह्मणा । मुक्तपणा तयापरि ॥६८॥ रंगनाथस्वामि आत्या ऐक्य । हें दाविले जगा कौतुक । निजानंदपदिं रंगले देख । पदि विवेक हा चि पैं ॥६९॥ रंगमूर्तिचि पदें गातां । हर्ष होतसे पंढरीनाथा । सनकादिक तुकिति माथा । वेदांत पाहातां ज्या माजि ॥ ७० ॥ जयासि पाहिजे निज आत्मपद । तेणें पाहावीं श्रीरंगपदें । भाविक धरिता सद्गुरुपदें । तुटे बंद द्वैताचा ॥ ७१ ॥ रंगनाथस्वामि आत्यासमर्थ । प्रत्यक्ष अवतार मूर्तिमंत । जगदोद्धारासि प्रगटार्थ । जाहाले समर्थ कलीमाजि ॥ ७२ ॥ धन्य ग्राम निगडि नगर । आत्मचर्चा निरंतर । जेथें कीर्तन सदा गजर । वैकुंठक्षेत्रसमान ते ॥ ७३ ॥ गुरुउपासक श्रीरंगनाथ । दुजा देव न दिसे जयाते । काया वाचा मनें सहित । अनन्य भजत सद्गुरुपदिं ॥ ७४ गुरुवार येतां नेमेंसि । आनंदें जावें कऱ्हाडासि । भावें पुजावें सद्गुरुसि । निजानंदस्वामिसि गुरुवर्या ॥ ७५ ॥ ऐसि भक्ति सदा प्रखर । रंगनाथस्वामि निर्धार । आत्मवेत्ते परम चतुर । श्रीगुरुवर भजति पैं ॥ ७६ ॥ कोणियेके दिनिं श्रीरंगमूर्ति । सद्गुरुदर्शना जात होति । साजिरें ध्यान अद्भुत दीसे । अश्वावरति नसोनि ॥ ७७ ॥ तीरकमान पाठिसी भाता ।

वस्त्रें अलंकार सुंदर पाहातां । नामोच्चारें क्रमिति पंथा । आले सर्वथा शाहापुरा जवळि ॥ ७८ ॥ अश्वत्थ वृक्षाखालीं तेथें । रामदासस्वामि बैसले होते । दृष्टि गेलि अकस्मात । रंगनाथस्वामिचि ॥ ७९ ॥ तात्काळ उतरले घोड्यावरून । नमस्कार घातिला दंडायमान । उभयता जाहाले आलिंगन । मग तें भाषण अवर्णिय ॥ ८० ॥ ग्रामस्त मंडळि भाविक । दर्शनासि मिळाले सकाळिक । वर्तले तेथें अपूर्व कौतुक । आलोलीक परिसावें ॥ ८१ ॥ विलक्षण होते छळक कोण्हि । आशंका आली तयाचे मनि । ब्रह्मच्यारि रंगमूर्ति असोनि । खटाटोप जनि कासया ॥८२॥ ऐसें जाणुनि श्रीरामदासें । प्रश्न केला रंगमूर्तिस । येन्हवी ठाउके समर्था असे । परि लीलेसि जगीं दावावें ॥ ८३ ॥ रंगमूर्तिचें वय ते काळिं । तीस वर्षे होती जाहाली । वीस वर्षे ती आगळी । गुरुमाउली रामदासा ॥ ८४ ॥ यालागि समर्थ बोलती ऐसे । रंगोबा काही जाणतोस । किंवा हत्यारें उगी च शोभेस । धारण केलीस तुवा आंगिं ॥ ८५ ॥ हास्यवदनें श्रीरंगनाथ । नमन करुनि रामदासाते । ह्मणति आज्ञा सांगा माते । काय मनांत असेल ते ॥ ८६ ॥ तव इतुकीयांत घार आकाशि । फेरे घालितां पाहिले दृष्टिसि । स्वामि सांगति रंगमूर्तिसि । उतरिसि काय येका तीरें ॥ ८७ ॥ आज्ञा वंदोनि ततक्षणिं । योजिला तीर घार लक्षोनि । भुमिसि पाडली प्रथमसंधानिं । अशुद्ध धरणि वाहातसे ॥ ८८ ॥ कांहिं काळ संवाद करुनि । रंगनाथ निघाले मार्गानि । समर्थ ह्मणति पक्षि मारुनि । जातसा निघोनि काय उचित ॥ ८९ ॥ अहिंसा साधुचा धर्म । हें हिंसक जालें कर्म । इचि पीलि वाट पाहाति प्रेमें । तरि वा नेमें सज्जीव करि ॥ ९० ॥ मग तात्काल जायोनि घारि जवळि । अमृतकरें कुरवाळीलि । सज्जीव होउनि जाति जाहाली । नभराउळीं सहजी ते ॥ ९१ ॥ केला तयेचा उद्धार । श्रीरंगमूर्ति कृपासागर । विस्मय करिति नारि नर । संशय थोर गेला तो ॥९२॥ जयाचे सत्ते पंचभूतें । वर्तति आपुल्या स्वधर्माते । ऐसे संत ते समर्थ । करणी अघटीत जयाचि ॥ ९३ ॥ असो नमस्कार करूनि रामदासासि ।

रंगनाथ गेले कन्हाडासि । गुरुदर्शन घेउन वटग्रामासि । जयरामासि भेटत ॥ ९४ ॥ तो हि निःसीम श्रीगुरुभक्त । संतचरणीं जयाचा हेत । तेणें ऐकीला वृत्तांत । रंगमूर्ति आली ह्मणोनि ॥ ९५ ॥ राउळाहुनि सत्वर निघोन । रंगनाथ स्वामिसि भेटले जाण । परस्परें होउनि नमन । घडलें आलिंगन येकमेका ॥ ९६ ॥ मग तो संवाद महानंद । वर्णितां मन होतसे स्तब्ध । सेविती निज आत्मपद । वृत्ति शुद्ध साटस्तता ॥ ९७ ॥ जयरामस्वामिनिं परम उल्हासें । आमंत्रण केलें रंगमूर्तिस । ह्मणति यावे पुण्यतिथिस । माघमास पौर्णिमेसि ॥ ९८ ॥ श्रीकृष्णस्वामि सद्गुरुनाथ । मुख्य दिवस त्याचा तो निश्चित । सांग करणें आपणाते । भोजनाते यावे पै ॥९९॥ रामदासस्वामि आनंदमूर्ति । प्रार्थिले असे तयाप्रति । आगमन होतां कीर्तनीं प्रीति । सर्वांप्रति लाभ होईल ॥ १०० ॥ अवश्य ह्मणुनि रंगनाथस्वामि । येते जाहाले निगडिग्रामि । वर्तति सुखें वर्णाश्रमि । निजनामि सदा रत ॥ १ ॥ पुढें कांहिं दिवसानें । भागानगरासि केलें प्रयाण । केशवस्वामिचें होता दर्शन । घेतले राहुन तयानि ॥ २ ॥ तव तो दिवस जाहाला प्राप्त । प्रातःस्नान करिति श्रीरंगनाथ । संकल्प करितां उच्चाराते । पौर्णिमा ते माघी शुद्ध ॥ ३ ॥ स्मरण जाहालें पुण्यतिथिचें । मग तें स्नान करणें कैचें । वचन गेले ह्मणोनि आमुचे । बोलिलो वाचे जयरामा ॥ ४ ॥ रामदासस्वामि आदिकरुनि । भोजन न करितील संत कोणिहि । यास्तव त्वरा रंगमूर्तिनिं । केली निघोनि अत्यंत ॥ ५ ॥ केरया खिसमतगार तयानें । सज्ज केला वारु जाण । गरुडअंश तो घोडा पूर्ण । चपल चालणें अद्भुत ॥ ६ ॥ बैसोनिया तयावर । निघते जाहाले अत्यादरें । कुकडवडचे खिंडित निर्धार । पडला आंधार सांजवेळ ॥ ७ ॥ पन्नास योजनें मार्ग क्रमिला । कांहिं अंधःकार तेथें पडिला । रामोसि शंभर भोंवता मिळाला । ध्यावयाला घोडा तो ॥ ८ ॥ तये वेळिं श्रीरंगनाथ । निशाचरासि काय बोलत ।

पराक्रम कांहिं दाखवा आम्हाते । तरि अश्वाते मग देऊं ॥ ९ ॥ भात्यांतील तीर सोडुन । धनुष्यासि लाविला तात्काळ जाण । खैराचे झोड मोठे पाहुन । मारिले जाण तयावरि ॥ ११० ॥ तो परगीर पर्यंत । तीर बुडाला निश्चित । आणी आज्ञा केली तया चोराते । आणावयाते उपडुनि ॥ ११ ॥ जरि न करितां या कार्यासि । अवस्था करु खोडाऐसि । नातरि सोडुन मार्गासि । वाचवा प्राणासि आपुले तुम्हि ॥ १२ ॥ तस्कर तेंव्हां अवघे मिळोन । पाहाति त्या तिरासि उपडुन । नाना उपाय करिति प्रयत्न । परि खोडांतुन न निघे तो ॥ १३ ॥ मग स्वामिनि सहजगति । चिमटिनें काढिला निगुति । आश्चिर्य करुनि चोरे चिति । दिधली निगुति वाट तया ॥ १४ ॥ खिडितूनि सत्वर निघोन । वडगावासि आले रंगमूर्ति जाण । घोडा हिसता वेसिंत पूर्ण । जयराम ह्मणे रंगोबा आले ॥ १५ ॥ तात्काळ सांगोनि शिष्यासि । पाणि ठेववा स्नानासि । तव इतुकियांत पोहचले मठासि । चिद्विलासि श्रीरंगनाथ ॥ १६ ॥ नमस्कार केला सकळ संता । चरणावरि ठेविला माथा । रामदासस्वामि जयराम वृतांता । रंगनाथा पुसति ते ॥ १७ ॥ किमर्थ अवेळ येणियासि । अद्यापि आह्मि उपवासि । रंगनाथस्वामि तयासि । सविस्तारेंसि सांगति ॥ १८ ॥ भागानगराहुनि आजि येणें । घोडा पीटिला अति त्वरेनें । आणि मार्गामध्यें जाहाले विघ्न । खिडित जाण कुकडवडचे ॥ १९ ॥ यास्तव लागला उशिर । चाकाटले श्रोते सारे । रामदासस्वामि जयराम चतुर । खुणाविति नेत्रीं येकमेका ॥ १२० ॥ ह्मणति आह्मि दोन प्रहरि । बोलिलो तीच गोष्टि खरि । रंगोबाचि येतसे स्वारि । भोजन न करि वदलो ते ॥ २१ ॥ पोटासि धरुनि रंगमूर्तिसि । प्रेम दाटलें रामदासि । श्रम जाहाले तुह्मासि । दयाराशि म्हणति पै ॥ २२ ॥ शडकरि स्नान वेगें करूनि । भोजन सारिलें त्रिवर्गांनि । तांबुल भक्षिती प्रितिकरुनि । वैसले आसनिं आनंदानें ॥ २३ ॥ तव इतुकीयांत मोतदार । केरया स्वामिचा जो साचार । सांगतां जाहाला समाचार । घोडा खगेंद्र तयाचा ॥ २४ ॥

जीन उतरतां क्षणी । पडला तात्काळ अश्व मेदिनि । स्वामिकडे मुख पसरुनि । नमन करुनि प्राण सोडिला ॥ २५ ॥ ऐसें ऐकतां श्रीरंगनाथ । ह्मणति उत्तम घडला वृत्तांत । सरकारचाकरिवरि आला मृत्य । पुण्य अद्भुत घोड्याचें ॥ २६ ॥ जयरामस्वामि तये वेळीं । ह्मणुं लागले गोष्ट आपणावरि आली । रामदासाकडे द्रिष्टि केली । टाळी पीटिली तयानिं ॥ २७ ॥ सत्वर निघोनि जयरामसमर्थें । समाधि स्तवोनि घेतलें तीर्थ । पंचपात्र धारण केलें होतें । जाहाले येते घोडियाजवळि ॥ २८ ॥ ह्मणति काय तया अश्वातें । वियोग न द्यावा रंगनाथातें । तुजसारिखा घोडा रंगोबातें । न मिळे सत्य वैसा-वया ॥ २९ ॥ ऐसें बोलोनि तीर्थ सिंचिलें । अंगावरि करें कुरवाळीलें । सजीव होवोनि नेत्र उघडिले । खडवडोनि उठले घोडे ते ॥ ३० ॥ मग जाहाला कीर्तनविधि । अद्भूत सामर्थ्य संत त्रिशुद्धि । वर्णुं जातां विस्मय बुद्धि । मौनसिद्धि होतसे ॥ ३१ ॥ असो पुण्यतिथी उत्छाहा सांग । करोनि निवाले श्रीरंग । निर्गुणपुरासि निःसंग । भवभंग आले ते ॥ ३२ ॥ आणीक गोष्टि ऐका नवल । माहुली सन्निध तांदुळवाडी-जवळ । रंगनाथस्वामिस भेटले । रामदास मळे जगद्गुरु ॥ ३३ ॥ अपार पाणी श्रीकृष्णेसी । पात्र फुटोनि चालिले नेमेसि । तेथें दाविले योगलीलेसी । रामदासि गुरुवर्यें ॥ ३४ ॥ अंग न भिजतां पैल तिरीं । जाते जाहाले रामदास निर्धारिं । रंगमूर्तिसि त्या अवसरिं । ह्मणति वैखरि या आतां ॥३५॥ तये काळीं श्रीरंगनाथ। हृदईं स्मरला सद्गुरुनाथ । जळावरूनि अश्वासहित । आले त्वरित सहजगति ॥ ३६ ॥ मग संवादस्वानदसुख । उभयता बोलति निज कौतुक । तो कृष्णेचा खळाळ बहु उदक । गर्जना देख होतसे पै ॥ ३७ ॥ तेणें करूनि शब्दश्रवण । परस्परें न घडे जाण । यालागिं रंगमूर्तीनें । केलें पूर्ण अभिनव ॥ ३८ ॥ कृष्णेसि ह्मणति अहो माते । गलवला न करावा येकांतांत । उगेचि असावें क्षणभर स्वस्थ । गदबद किमर्थ ये काळीं ॥ ३९ ॥ पंचपात्रांतिल पळिभर ।

पाणी घेतलें स्वकरें । श्रीकृष्णेंत टाकुनि निर्धारें । प्रार्थिले थोर तत्समई ॥ १४० ॥ खट्वाळ पावला स्तब्धता । संवाद सारिला उभयता ।' रामदास ह्मणति रंगोबा आतां । धरावी मौनता कीति बाईनिं ॥ ४१ ॥ रंगनाथस्वामिनि मागुति । नमन केलें कृष्णेप्रति । जळ काढिलें पळिमर निगुति । नेत्रीं पाहाति रामदास ॥ ४२ ॥ गर्जु लागला मग खळाळ । रामदासस्वामि संतोषले । ऐसें सामर्थ्य वर्णितां भले । काय कीले वर्णुं त्या ॥ ४३ ॥ कोणियेक दिवसीं भागानगरात । गेले होते श्रीरंग नाथ । केशवस्वामीचे दर्शनाते । फिरत फिरत सहजस्थिति ॥४४॥ महान्न पंडित ब्राह्मण । येते जाहाले भेटीसि जाण । 'ह्मणति स्वामिनिं करावे कीर्तन । हेत पूर्ण सर्वांचा ॥ ४५ ॥ श्रवणासि क्षुधा फार दिवस । लागली चटपट बहु मनास । कर्णासि पाजुनि ब्रह्मरस । तृप्ति मनास करावी ॥ ४६ ॥ अवश्य ह्मणुनि श्रीरंगमूर्ति । कीर्तन करावया उभे राहाति । हर्ष जाहाला श्रोतयाप्रति । टाळि पीटिति सकळीक ॥ ४७ ॥ अर्थज्ञ मुमुक्षु आधिकारी । साधक सिद्ध अधिकारी । मिळाले असंख्य वर्ण चारि । जाहाला अंतरिं आनंद ॥ ४८ ॥ सकळ रंगाचा नाथ । कीर्तन करी श्रीरंगनाथ । नसमाय आनंद हृदयांत । उचंबळत रंगोबा ॥ ४९ ॥ ह्मणति ऐश्या समई' आनंदमूर्ति । भेटवील कोण्ही मजप्रति । तयासि देईन पुण्य' निश्चिति । स्नान भागिरथि केल्याचें ॥ १५० ॥ ऐसें बोलतां कीर्तनसमेत । येक ब्राह्मण उठला उल्हास- चित्तें । ह्मणे आमुचिये घरिं- उतरले सत्य । येके आहेत आनंदवाक्षा ॥ ५१ ॥ न जाणों असतील ते च -जरि । पुण्य मिळेल आह्मा निर्धारिं । भावना करुनि अंतरिं । आला घरिं त्वरेनें ॥ ५२ ॥ धन्य भाग्य द्विजाचें । जन्मांतरिचे सुकृत साचें । त्या - च दिवसीं आनंदमूर्तिचें । राहाणें साधुचें तया घरिं ॥ ५३ ॥ लवकर येउनि केलें जागृत । सांगितला समूळ वृतांत । कीर्तन करिति श्रीरंगनाथ । जाहाले-सांगत सभेसी ॥ ५४ ॥ ह्मणति ऐश्या कीर्तनरंगांत । भेटवील कोणी आनंदमूर्ति । पुण्य देईन मी तयाते । समळ- तीर्थ- केलीयाचें

॥ ५५ ॥ ब्रह्मनाळकर असाल म्हणुन । धांवत आलों आस्था धरुन । सांगा तुम्हि कोठिल कोण । आनंद ब्राह्मण म्हणवीतसा ॥ ५६ ॥ आनंमूर्ति करुनि हास्य । सांगते जाहाले द्विजवरास । रंगनाथस्वामि ठकवितसे । नको पुण्यास घेऊं ते ॥ ५७ ॥ स्मरण केलें रंगमूर्तिनें । ते चि आम्हि निश्चित जाण । ठाउका नाहिं कीर्तनयज्ञ । निद्रा म्हणुन केली पै ॥ ५८ ॥ तरि सांभाळि सांगतो वचन । न घेई तू क्षुल्लक पुण्य । त्याचें आमुचें होतां दर्शन । होईल समाधान तें मग ॥ ५९ ॥ ऐसें सांगुनि त्या ब्राह्मणा । आनंदमूर्ति गेले कीर्तना । रंगमूर्तिनें पाहतां नैना । अंतःकर्णी भरतें आलें ॥ १६० ॥ संतत्रीवेणि संगम जाला । आनंदोदकासि पूर आला । पर्वकाळ तेथें फावला । श्रोतियाला कीर्तनाचा ॥ ६१ ॥ तैसियांत तो द्विज । तीर्थमय नाहला सहज । येरें साधिली आपुली काज । श्रवण चोज करुनि ॥ ६२ ॥ तेंचि ऐका येकाग्रचित्तीं । रंगनाथ स्वामिसि भेटले आनंदमूर्ति । केशवस्वामि आलिंगन देति । मग ते स्थिति आबोलणी ॥ ६३ ॥ तैसियांत स्मरण त्या ब्राह्मणाचें । रंगमूर्तिस जाहालें साचें । उदक घ्या ह्मणती काशीयात्रेचे । धन्य द्विजाचें भाग्य त्या ॥ ६४ ॥ वदे विप्र तो काय तेव्हां । पुण्यप्राप्तिचा नाहिं हेवा । त्रिवर्गाचा आनंद ठेवा । स्वानुभवा मम हृदईं ॥ ६५ ॥ उत्तर बोलतां ब्राह्मण ऐसें । रंगनाथस्वामिसि आलें हसें । ह्मणति फितुर जाहाला अज्ञात असे । काय याचेस वदू ते ॥ ६६ ॥ भटजी तुमचि नव्हे बुद्धि । बोधिले वाटेस येतां संधि । नातरि अनुताप न घडे कधिं । दयानिधि आनंदमूर्ति ॥ ६७ ॥ केशवस्वामिनि ते वेळे । श्रीरंगमूर्तिसि सुचविलें । शरण आलिया उपेक्षिलें । उचित भलें नसे पै ॥ ६८ ॥ आज्ञा वंदुनि श्रीरंगनाथ । अनुग्रह केला तया द्विजातें । मस्तकीं ठेविला वरदहस्त । निज सुखांत मेळविलें ॥ ६९ ॥ निजानंदिं रंगोनि गेला । ब्राह्मण कीर्तनिं तो उद्धरिला । आत्माराम वोवाळिला । यज्ञ जाहाला कीर्तनाचा ॥ १७० ॥ पुढें श्रोतिं अवधान यावें । रसिक कथन आहे अपूर्व । श्रवणीं धरितां शुद्ध भाव ।

समूळ भवव्यथा तुटे ॥ ७१ ॥ आधि च चरित्र रंगनाथाचें । तयांत चोळणें सिद्धकृपेचें । तेथें रंगासि उणें कैचें । स्वानंदाचें क्षेत्र तें ॥ ७१ ॥ राजारामि सिद्धनाथ । प्रगट जाहाले निज हृदयांत । रंगनाथस्वामि आख्यानातें । सकळार्थ पुरति पै ॥ ७३ ॥ भक्तमंजरी माळा ग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । भाविक भक्त साधन करीत । चतुर्थ अध्याय गोड हा ॥ १७४ ॥ अनुक्रमें अध्याय येकोणीसावा ॥ १९ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

## ॥ अध्याय २० वा ॥

श्री गणेशाय नमः । श्री रामसमर्थ ॥ नमो सद्गुरु सिद्ध परेशा । निजरंगा अखिल अविनाशा । आत्मयारामा स्वयंप्रकाशा । आदि गणेशा सुख सिंधु ॥ १ ॥ स्फुरद्रूपीणि मूळमाया । अर्धमात्रा जे का तुर्या । सरस्वतीते नमन पाया । अनिर्वाचा ठाया श्रीगुरुपद ॥ २ ॥ कुळदैवत सीतापति । जनकजननि तो चि निगुति । वंदन केले संत श्रोति । यथापद्धति अनुक्रमें ॥ ३ ॥ मागिल कथा अनुसंधान । भागानगरिं रंगमूर्तिनें । कीर्तनिं उद्धरिला तो ब्राह्मण । तया कारण आनंदमूर्ति ॥ ४ ॥ ऐशा लीळा अनेक जगति । वर्णितां ग्रंथिं न पुरे मति । ब्रह्मांडघटीं नसमाय कीर्ति । धन्य ह्मणति श्रीरंगनाथ ॥ ५ ॥ काशीक्षेत्रीं सच्चिदानंद । ज्ञानि संन्यासि माहा प्रसिद्ध । स्वामी माहात्म तेणें शुद्ध । ऐकिले सिद्धसाधकमुखें ॥ ६ ॥ ह्मणति ऐसियाचें दर्शन । घ्यावें जाउनी अपर्जून । यालागीं काशीक्षेत्र सोडून । आले निघोन निगडिसि ॥ ७ ॥ श्रीरंगमूर्तिसि पाहुनि नयनिं । संन्यासी आनंदले बहुत मनिं । पूर्वपक्ष केला च्यार प्रश्नि । महावाक्यध्वनी इत्यादि ॥ ८ ॥ उत्तरपक्ष सिद्धांत । करिते जाहाले श्रीरंगनाथ । ती पदें आद्यापि संत । कीर्तनिं गात निज आवडी ॥ ९ ॥ मग सच्चिदानंद संन्यासी । निजआवडि बोलति काय रंगमूर्तिसि । राह्यावे

सदा समागमासि । इच्छा मानसीं हे चि असे ॥ १० ॥ रंगनाथ म्हणति स्वामिदा । हेत माझा हा चि पाया । राहाते जाहाले तया ठाया । मनें काया वाचेसि ॥ ११ ॥ रंगमूर्तिचा सग होता । यति पावले उन्मनि अवस्था । सर्वत्र पावोनि येकात्मता । जाहली स्थिरता परब्रह्मिं ॥ १२ ॥ सेवटीं टेविला निगडिसि देह । समाधि तयाचि अद्यापि आहे । सच्चिदानंद उद्धरिले श्रीगुरुरायें । धन्य अद्वय निजरंग ॥ १३ ॥ आणिक गोष्टि कथा दुजि अद्भुत । सच्छिष्य जनार्दन स्वामिचा निश्चित । तयाचा ऐका समूळ वृतात । माहान गुरुभक्त ज्ञानराशी ॥ १४ ॥ जन्मकर्म तयाचें स्थान । संक्षेपयुक्ति करूं कथन । सेवेमाजि आयुष्य जेणें । अर्पिलें जाण श्रीगुरुचरणि ॥ १५ ॥ कोणियेक दिवसि श्रीरंगनाथ । जगदोद्धारार्थ निघाले भ्रमण करित । येते जाहाले अकस्मात । ईचळकर्जित सहजी ते ॥ १६ ॥ ऋग्वेदि ब्राह्मण कुळकर्णि । गेले तयाचिये सदनिं । तेथें केली अपूर्व करणी । भविष्य जाणुनि पुढिल पै ॥ १७ ॥ करावया उदकपान । मागति स्वामि श्रीआपण । तये वेळिं ती माउली जाण । आली घेउन जळाति ॥ १८ ॥ जन्मातरिचि योगभ्रष्ट । अनुष्ठान जियेचें परम चोखट । तयेचिये उदरी जनार्दन स्पष्ट । महानिष्ठ जन्म घेणार ॥ १९ ॥ परि तीयेसी होउनी सर्पडश । मृत्यु पावेल जाणिले ऐसे । या युक्ति निजकरें स्पर्श । केला स्तनास रगमूर्तिनीं ॥ २० ॥ षोडष वर्षें वय तारुण । परम जाहाली लज्यायमान । अंतरगृहिं तात्काळ जाउन । केलें निवेदन श्वशुरासि ॥ २१ ॥ नि.शिम असे तो भगवद्भक्त । उगी च राहा ह्मणतसे स्वस्थ । अनेक रिति वर्तती संत । चित्त दुखित न करी तूं ॥ २२ ॥ ऐसें ऐकोनि संतोषली । शुभा आणावया बाहिर गेलि । तेथें सर्प चावोनि मेली । रडत बैसली गृहिचि त्या ॥ २३ ॥ स्वामिपासि येवोनि सर्व । दीनवदनें भाकिति कीव । ह्मणति आह्मावरि क्षोभला देव । शोकार्णव प्राप्त तया ॥ २४ ॥ रंगनाथस्वामि दयाघन । बोलति तेव्हां काय वचन । बंदोबस्त आहि पूर्विं च जाण । केला न करणें शोक तुह्मि

॥ २५ ॥ मग कृपाकरें स्पर्शितां प्रेता । सजीव जाहाली ति माता । चरणावरि ठेविला माथा । श्रीरंगनाथा अनन्यबुद्धि ॥ २६ ॥ सकळ जन पुसिते जाले । आदौ स्वामिनि काय केले । इत्थंभूत सांगितले । स्वमुखें भले तये सतिनें ॥ २७ ॥ सर्पदंश होणारा ज्या स्तनास । तेथें चि केला हस्तस्पर्श । तेणें ठेला मृत्यु निःशेष । उतरिलें वीष श्रीगुरुनि ॥ २८ ॥ ऐकोनि जनिं विस्मय केला । धन्य ह्मणति साधुलीला । समस्त लागली पायाला । पति भला आदिकरुनि ॥ २९ ॥ तये काळि श्रीरंगनाथ । बोलति ईजला होईल सुत । आह्मासिं द्यावा तो निश्चित । करूं अनुग्रहीत आपुला पै ॥ ३० ॥ अवस्य ह्मणुनि सकळिकांनि । उदक सोडिले स्वामिचरणिं । अनन्यभावें प्रिति करुनि । गुरुअर्पाणें निमग्न ते ॥ ३१ ॥ रंगनाथस्वामि तेथुनि निघाले । स्वस्थानासि येते जाहाले । कांहिं दिवसानंतर गेले । मागुति उगले त्या चि ग्रामा ॥ ३२ ॥ तव ते बाईस पुत्र जाहाला । जनार्दन नाम ठेविलें त्याला । गृहिंच्यासि वृत्तांत कळला । सत्पुरुष आला तो चि ह्मणुनि ॥ ३३ ॥ आदरें करुनि आश्रमा आणिले । मूळ स्वामिसि अर्पण केले । रंगमूर्तिनें अंगिकारिलें । घेउनि आले मठासि ॥ ३४ ॥ आनंद उत्छाह परम केला । विद्याभ्यास पूर्ण जाहला । सद्गुरुचरणिं विनटला । ज्ञानकळा जेवि चंद्र ॥ ३५ ॥ मग केला व्रतबंध । तो सोहळा तो चि पै अगाध । अनुग्रह करितां निज शुद्ध । जाहाला सिद्ध स्वरूपिं तो ॥ ३६ ॥ येकात्मता सर्व भूतिं । निश्चळ जाहाली आत्मप्रचिति । दृढ उपासना बाणली चित्तीं । सीतापति नर नारि ॥ ३७ ॥ मग तेथें विवाह करणें । खुंटलें मूळीं च देहमान । श्रीरंग सेवे जनार्दन । जाहाले निमग्न सर्वदा ॥ ३८ ॥ अहर्निशिं स्वामिजवळि । सिद्ध जोडुनि करांजुळी । पदार्थ न दिसे जया बुवळी । गुरुमाउलिविण दुजा ॥ ३९ ॥ रामदासस्वामिचा शिष्य कल्याण । अनुपम्य भक्ति जयाचि जाण । तैसा चि निःसीम जनार्दन जाण । ज्ञानसंपन्न गुरुजवळि ॥ ४० ॥ दास्यत्व करुनि रंगमूर्तिचें । कैवल्यपद जोडिले साचें ।

महात्म तया गुरुभक्ताचें । काय वाचें वर्णू मीं ॥ ४१ ॥ तपें तीर्थे व्रतें दानें । येक श्रीगुरुसेवा प्रमाण । नेणे आणि दुजें साधन । धन्य जनार्दन सच्छिष्य तो ॥ ४२ ॥ रंगनाथस्वामिचे समाधिपासि । वामभागिं स्थान जयासि । जन पाहाति सकळ दृष्टिसी । पादुकेसी असादरें ॥ ४३ ॥ श्रीगुरुसारिखें दैवत । दुजें नसे सुष्टिवरुते । व्यास बोलिले गुरुगीतेंत । केला सिद्धांत सर्व शास्त्रिं ॥ ४४ ॥ परि दुर्धर कर्मगति । नाना प्रतिमा प्राणी धुंडिति । विसरोनि गेले आत्मप्रचिति । केंवि मुक्ति त्या लाभे ॥ ४५ ॥ असो जया स्वहित करणें । तेणे पाहावें आपण कोण । नाहिं तरि अवघा शीण । लाहिजे खूण गुरुकृपें ॥ ४६ ॥ रंगनाथस्वामिचि शिष्यीण आका । श्रोते गोष्ट तयेचि ऐका । जियेनें केला श्रीराम सखा । सद्गुरु निका भजोनि ॥ ४७ ॥ भागानगरिं राहात होते । ब्राह्मणपत्नि महा सति । ध्यानिं मनिं श्रीरंगमूर्ति । सदा चिंति निजछंदें ॥ ४८ ॥ निर्गुणपुरासि प्रतिवर्षि । येत असावे निश्चयेंसि । स्वामिपूजन करून गृहासि । भागानगरासी पुन्हा जावे ॥ ४९ ॥ ऐसें अनुष्ठान होतां मळें । वार्धिक्य शरिरीं प्राप्त जालें । दुर देशिं येणें राहिलें । आरंभिलें मानसपूजे ॥ ५० ॥ हृदयांत आठउनि श्रीरंगनाथ । अर्चन करावें यथाशास्त्रोक्त । नानापरिचे कल्पुनि पदार्थ । सद्गुरुनाथ भजावा ॥ ५१ ॥ सर्वसाक्षि श्रीसद्गुरुनाथ । भक्तियोग जाहाला तयेचा बहुत । तेणें सकळ कळे वृतांत । रंगमूर्ति त्रिकाळज्ञानि ॥५२॥ कोणि येके दिनीं ते आकानें । क्षीर केली उत्तम जाण । अंतःकरणीं जाहालें स्मरण । भरले नैन प्रेमें करुनि ॥ ५३ ॥ रडत बैसली खेद करूनें । ह्मणे मी आज न घेई अन्न । होईल जरि प्रत्यक्ष दर्शन । तरि च प्राण ठेविन दे ॥५४॥ अंतरसाक्ष श्रीरंगमूर्ति । कळले तयासि पूर्ण चिंति । तात्काळ निघोनि मनोगति । पावले निश्चिति भागानगरिं ॥ ५५ ॥ मग तो आनंद आकाबाईस । जाहाला न ये लेखन करावयास । अकस्मात पडले दृष्टिस । सच्चिद्विलास श्रीगुरुते ॥५६॥ वांसें पाहातां आपली गाय । कीं बाळाजवळ आली माय । नातरि जीवन प्राप्त होय । तृषेनें क्षाय

संतप्त होता ॥५७॥ असो भोजनविधि सांग जाला । रंगमूर्तिसि तांबूल दिधला । चरणावरि मस्तक ठेविला । शिष्यीण अबला तयेनें ॥ ५८ ॥ केशवस्वामिसि कळतां पाहि । दर्शनासि पातले लवलाहि । म्हणति वास व्हावा कांहिं । इच्छा हृदईं समागमाचि ॥ ५९ ॥ उत्तम म्हणोनि पंचदश दिवस । राहाले जाहाले भागानगरास । आरंभ केला कीर्तनास । नामघोष सतत पै ॥ ६० ॥ शाहारांतिल समस्त जन । आवडि करिति कथाश्रवण । तयातुन येका कळवातिण । रात्रंदिन येतसे ती ॥ ६१ ॥ तयेचें जन्मांतर पूर्वकथन । संकेतयुक्ति होईल वर्णन ॥श्रोतियें देऊन अवधान । येकाग्र मनें ते ऐका ॥ ६२ ॥ गंधर्वकन्या जन्मांतरिचि ॥ तयेसि आवडि बहु कीर्तनाचि । विप्रउदरिं जन्मली साचि । पोथी वाचि सर्वदा ॥ ६३ ॥ विष्णुध्यान सर्वकाल । करित बैसे शुद्ध प्रांजळ । अहर्निशि झाकुनि डोळे । श्रीघननीळ ध्यातसे ती ॥ ६४ ॥ कोपिष्ट ब्राह्मण तिचा भर्ता । त्याग केला तेणें सर्वथा । भ्रमण करूनि सकळ तीर्थां । राहिली ताता गृहिं ते ॥ ६५ ॥ कृष्णलीला पुराणश्रवण । योगमार्गिं जाहाली निपुण । अंगिं होय कामोद्दीपन । करि शांतवन विवेकें त्या ॥ ६६ ॥ अंतकाळ सन्निध आला । कामोर्मिनें देह व्यापिला । तशांत विष्णु चिंतियेला । प्राण गेला ते समयिं ॥ ६७ ॥ योगभ्रष्ट ऐशा रिति । वेश्या जाहाली तेणें क्षीति । परि अंतरिं बहुत प्रीति । कीर्तनस्थिति ऐकावया ॥ ६८ ॥ अत्यंत सुंदर लावण्यखाणि । गायन करावें मधुरध्वनि । उपवर जाहाली वयें करूनि । तारुण्य स्तनि भरलें आगा ॥ ६९ ॥ तये काळीं मातेनें । प्रश्न केला तिजलागुन । झुलधालावा तुजकारणें । आवडे कोण पुरुष सांग ॥ ७० ॥ क्षेत्री वैश्य शूद्र यवन । अवडे नर तुजला कवण । पुसतां ऐसें हृस्य करून । काय वदनें बोलतसे ॥ ७१ ॥ कीर्तन करतात जे रंगनाथ । तया ठाईं माझा हेत । आणिक नर दुसरे निश्चित । जाण समस्त ते बापासमान ॥ ७२ ॥ निश्चय ऐकुनि जननिप्रति । संकट वाटलें बहुत चित्तिं । न घडे तें चि बोलली युक्ति ।

जाहाली भीति प्राप्त तये ॥ ७३ ॥ महापुरुष समर्थ संत । ब्रह्मचर्य ज्यांचें तर्शात व्रत । तेथें सांगतां वृतांत । न घडे सत्य गोष्टि हे ॥ ७४ ॥ परि संशय फेडावयासि । समागमें घेतलें कन्येसि । जाति जाहाली विन्हाडासि । रंगमूर्तिसि पुसावया ॥ ७५ ॥ तव तेथें बहुत लोक । बैसले पंडित सभानायक । आत्मचर्चा बोलति सुख । जीव रंक उद्धरति ॥ ७६ ॥ ते वेळि जाउनि गणीकेनें । नमन केलें संकोचमानें । भय वाटलें बोलतां वचन । बैसली मौन येकीकडे ॥ ७७ ॥ सर्वज्ञ स्वामि श्रीरंगनाथ । जाणीतलें तयेचें मनोगत । प्रश्न केला कळवांतिणीते । आलीस येथें कां ह्मणुनि ॥ ७८ ॥ भीत भीत गणिका मग ते । विनती करि श्रीस्वामितें । अभय असतां मज दीनातें । निवेदिन वृतांत चरणासि ॥ ७९ ॥ कृपासिंधु भक्तवत्छळ । म्हणति असेल काय ते बोल । वेश्येनें तेव्हां निरोपिलें । होतें आपुलें ह्मृत जें ॥ ८० ॥ रंगनाथस्वामिनिं त्या मुर्ळास । समक्ष विच्यारिलें सांग कैसें । कामकटाक्षें करुनि हास्य । म्हणे दासिस अंगीकारा ॥ ८१ ॥ पायाविण या निर्धारें । पित्यासमान पुरुष सारे । रंगमूर्तिनें पाहुनि अंतर । दिधलें उत्तर तयेसि ॥ ८२ ॥ सुमुहूर्त वेगीं पाहावा । कार्यभाग आपला सिद्धि न्याहावा । ऐसें सांगतां गणीकेसि तेव्हां । आनंद बरवा जाहाला ते ॥ ८३ ॥ सभेतील सकळ नष्ट । निंदा करिति विद्वान शिष्ट । रंगनाथस्वामि कैचा श्रेष्ट । ब्रह्मचर्य भ्रष्ट होतसे आतां ॥ ८४ ॥ काउळा क्षत पाहुनि हर्षे । तेवि दुर्जन करिति हास्य । असो खळाचा काय वाच्यांश । इतिहास सांडुनि ॥ ८५ ॥ रंगमूर्तिचि आज्ञा होतां । गृहासि गेली गणिका तत्वता । सिद्ध करुनि साहित्य मूहूर्तां । कन्येसि सर्वथा श्रृंगारिलें ॥ ८६ ॥ भरजरी साडि शुद्ध यशाचि । नेसवीलि तयेसि साचि । भक्ति कंचुकीं नेमाचि । घेतली खुतानिचि तटतटीत ॥ ८७ ॥ त्रिगुणाची वळोनि वेणि । नग ठेवविले प्रीति करूनि । शांति राखडि अंजन नैनिं । अक्षै रेखुनि कुंकुम पै ॥ ८८ ॥ मुक्ति सुढाळ नथनीं नाकी । शोभे

मुर्डिव दंडी थाकी । गळा गळसरि साजे निकी । सूत्र राखि स्मरणाचे ॥ ८९ ॥ श्रवणीं श्रवण अळंकार । कंठिं मिरवती अनेक हार । पाईं घातिले पाल्हार । अनुहत गजर पैंजण ते ॥ ९० ॥ दाम दयेचि विळसे माजी । बुंधि घेतली विरक्ति ताजी । शिमा सांडिली लावण्यतेजीं । उपमे दुजी नसे चि ते ॥ ९१ ॥ विवेकवैराग्य मुद्रिका । करांगुळीत घातिल्या देखा । प्रबोधदर्पण घेवोनि निका । सदा मुखा न्याहळीतसे ॥ ९२ ॥ उपभोगतांबूल मरूनि तबके । तूर्यासखि ते जवळ निष्टंक । हंसगति चालणें सुरेख । जैसि चमके सौदामिनि ॥ ९३ ॥ पूर्ण करावया निज काम । अंगसंगार्थ जिचा धर्म । रंगनाथपदिं धरुनि प्रेम । आली नेमें ते गणीका ॥ ९४ ॥ तव श्रीरंगमूर्ति चतुर्थ प्रहरिं । बैसले निवांत आसनावरि । लोक मिळाले बहुत कचेरि । नर नारि शाहारांतील ॥ ९५ ॥ तैसियांत पातली ते वेश्या । ह्मणे घटीकेंत मूहूर्त अशा । वेगी पुरवा स्वामि आशा । गुरु परेशा रंगमूर्ति ॥ ९६ ॥ विषयविळास समग्र साहित्य । घेउनि आले चळा मंदिरांत । निरशन करावे कामज्वराते । उठा त्वरित या वेळे ॥ ९७ ॥ ऐसें बोलुनि दीनवदनें । उभी राहिली कर जोडून । वारंवार करी नमन । भावें अनन्य गाणिका ते ॥ ९८ ॥ दयासिंधु श्रीरंगनाथ । बैसवीले सन्मुख तयेते । आज्ञा केली वेश्येते । पाहे ह्मणत आपणाकडे ॥ ९९ ॥ द्रिष्टित घालितां निज द्रिष्टि । हरपोनि गेली समूळ सृष्टि । परब्रह्मिं पडतां मिठि । नये गोष्टि ते बोलतां ॥ १०० ॥ सप्त दिवस पर्यंत । काळवांतीण जाहाली समाधिस्त । या नांव बोलिजे द्रिष्टिपात । योगी जाणत खुणेसी ते ॥ १ ॥ देहभान नसतां कांहिं । विषयस्फूर्ति कैंचे काई । गुरुकृपेचि हे नवाई । धन्य गुसाई श्रीरंगनाथ ॥ २ ॥ कामसर्प दारुण थोर । चढतां गणीकेसी जाहालें दुःख । गारुडि भेटतां गुरुनायक । उतरोंले देख सहजीं तें ॥ ३ ॥ नातरी मदनज्वरें । व्यापिलि वेश्या ती निर्धारें । पातले तेथें गुरु साचार । वैद्य थोर.

श्रीरंग ॥ ४ ॥ किंबहुना विषयपिशाच । झडपीतां देखिला पंच्याक्षी साच । अद्भुत कौतुक गुरुनाथाचें । केलें भुताचें निरशन त्या ॥ ५ ॥ असो दृष्टांत घेमें फार । रंगनाथस्वामिचा महिमा अपार । चाकाटले निंदक सारे । नमस्कार घालीति पै ॥ ६ ॥ सप्त दिवसानंतर । गणीका आली देहावर । करिति जाहाली दंडवत फार । अनन्य विचार श्रीगुरुपदा ॥ ७ ॥ म्हणे आपुल्या कृपें करून । जन्मांतराचें जाहालें स्मरण। प्राप्त होउनि दिव्य ज्ञान । जाहाली पावन तात्काळ ॥ ८ ॥ समस्त बापासारिखे पुरुष । केला नेम तो पावला सिद्धिस । ऐसें बोलोनि श्रीगुरुस । पदरिस गेली ते ॥ ९ ॥ उद्धरिली गणिका सति । धन्य कृपालु श्रीरंगमूर्ति । मति न पुरे ग्रंथाप्रति । असंख्य स्थिति स्वामिचा ॥ ११० ॥ ठाईं ठाईं अनेक प्राणि । पावन केले कैवल्यदानि । जगीं मार्ग शुद्ध स्थापोन । लावीलें भजनि सकळ जीवा ॥ ११ ॥ भवनदि हे दुस्तर । कामक्रोधादि जळचर । मायाडोहिं जीव सारे । येकसरे बुडति पै ॥ १२ ॥ तेणें हरिसि कळवळा आला । निजआत्मरंग प्रगटविला । तो हा स्वामि तारि जनाला । काय जयाला वर्णू मी ॥ १३ ॥ लीहितां प्रताप तो अगणीत । आख्यान विस्तीर्ण न होय समाप्त । मौनावला वेद अनंत । ते हे संत कलीमाजि ॥ १४ ॥ असो रंगनाथस्वामि समर्थ । प्रयाण आरंभिले वैकुंठातें । श्रवण करीतां आदरें श्रोते । आयुष्यातें वृद्धि होय ॥ १५ ॥ सोळाशे साहा शके शालीवाहान । संवत्सरासि रक्ताक्षी नामाभिधान । मार्गशीर्ष मास विभूति पूर्ण । भगवान स्वयें बोलति जे ॥ १६ ॥ दशमि वृत उत्तम स्थिति । कृष्णपक्ष जाण तो निश्चिति । आत्मसूर्य श्रुति गर्जति । वासर युक्ति तो चि पै ॥ १७ ॥ निर्याण उत्छाह सागतां वाचे । उन्मन होतसे ज्या मनाचें । कीर्तनरंगीं नारद नाचे । देव स्वर्गींचे सुमनें वर्षति ॥ १८ ॥ विमानें दाटलें अंबर । जाहाला अवघा जयजयकार अनुहतध्वनि होतसे गजर । अनेक प्रकारें वाद्यें वाजति ॥ १९ ॥ निजरंगिं मिनले रंग । सहजिं जाहाले घटभंग । जडतनु ठेविली॰

श्रीरंगें । निर्गुण अभंग पुरामाजि ॥१२०॥ तये काळिं आत्यास्वामि । नव्हते समाप्तिसि निगडिग्रामिं । पश्चात येतां जाहाले श्रमि । शोके प्रेमि कासावीस ॥ २१ ॥ चित्तास्थानिं निश्चय करून । उपोशीत बैसले आत्यानिधान । त्याग करिन ह्मणति प्राण । न होता दर्शन आपणासि ॥ २२ ॥ केला निर्धार ऐशा प्रकारें । पद ह्मणतिल करुणापर । तीन कडवी ह्मणतां साचार । उचंबळला सागर रंगमूर्ति ॥ २३ ॥ चिद्गगनि उत्तरार्ध । रंगनाथस्वामि जगप्रसिद्ध । चतुर्थ कडवे बोलिले शुद्ध । म्हणति सिद्ध सर्वत्र ते ॥ २४ ॥ प्रसादिक पद तें गाता । साक्षात्कार होतसे आतां। सर्वत्र फावे येकात्मता । लाहे समता तात्काळ ॥ २५ ॥ मग विठलरावआत्यायानिं । उद्धरिले प्राणि बहुत मेदिनि । काळ सारिला निज चिंतानि । भक्ति करूनि सद्गुरुचि ॥ २६ ॥ पुढें वीस वर्षानंतर । सेवीत जाहाले निर्गुणमंदिर । कोण दिवस शक सवत्सर । श्रोते सर्वत्र ऐका ते ॥ २७ ॥ शके सोळाशे सवीस । पार्थिव नाम संवत्सरास । बुधाष्टमि श्रावण मास । ठेविलें देहास आत्यानिं ॥ २८ ॥ विठलराव श्रीरंगनाथ । अभेदस्वरूप येक निश्चित । निजानंदि रगले समर्थ । ते अद्वैत न वर्णवे ॥ २९ ॥ रक्त श्वेत नीळ सुनीळ । पीत प्रभा अति सोज्वळ। रंगातीत निजरंग अखिळ । रंगनाथ प्राजळ स्वामि तो ॥१३०॥ सिद्ध चि सबाह्य पाठिपोटि । भरुनि ठेला ब्रह्माड घटीं । अनुपासोनि व्यापिली सृष्टि । अखंड भेटि श्रीगुरुरूपें ॥ ३१ ॥ श्रीरंगमूर्ति जनिं वनिं । पाहातां दिसे सदा नैनिं । उघड जाहाली चित्सुखखाणी । थकली वाणि ते बोलतां ॥ ३२ ॥ भावबळें करिता स्मरण । प्रत्यक्ष स्वामि देतसे दर्शन । श्रीरंगमूर्ति दयाघन । किति ह्मणून वर्णावे ॥३३॥ बहुत कार्यें निज भक्ताचि । स्वयें चि अंगे साचि । प्रसिद्ध कीर्ति श्रीस्वामिची । अद्यापि ते चि सकळ गाति ॥ ३४ ॥ शके सत्रार्शे येकविसांत । पठाण दंगा जाहाला बहुत । उपद्रव करितां निर्गुण-पुरात । जाहाले प्रगटार्थ ते वेळिं ॥३५॥ तये काळिं स्वामिच्या घोड्याचें । खुर उमटले पाषाणावरि साचे । पूजन होतसे प्रत्यहिं जयाचे । येति

तयाचें दर्शन ॥ ३६ ॥ यात्रेमाजि पंढरीसि । भगवान भेटति भाविकासि । तैसेंचि येथें निगडिसि । प्रतिवर्षि होतसे ॥ ३७ ॥ समाधि पाहातां निज डोळा । घुणी होतसे पातकाला । जीव पावति आत्मसुखाला । श्रीगुरुला भजति जे ॥३८॥ भूत प्रेत समंध जाति । ब्रह्मराक्षसा होतसे गति । प्रदक्षणा करितां भक्ति । जीवा वराति ज्ञानकला ॥ ३९ ॥ भगवंत भक्त उभयता । अभेद स्थिति येकात्मता । हें दाविलें प्रगटार्था । पारिसीजे श्रोता तें नवल ॥ १४० ॥ समाधीतून भागीरथि । अखंडाकार सदा वाहाति । सूक्ष्म धार स्वेत निगुति । द्रिष्टि पाहाति ते भावीक ॥ ४१ ॥ पुण्यतिथी विभूतिमास । यात्रेसी येति पंढरिनिवास । कृष्ण दशमि मुख्य दिवस । उत्छाह विशेष ज्या स्थळिं ॥ ४२ ॥ कीर्तनरंग अद्भुत सोहळा । दुर्लभ श्रवण देवादिकाला । शुक येति ज्या स्थळाला । पक्षिरूपाला धरूनि ॥ ४३ ॥ नानाविध ब्रह्मनिष्ट । प्रसाद इछिति महान श्रेष्ठ । पदरिं पुण्य ज्या चोखट । लाभ स्पष्ट तयासि ॥ ४४ ॥ सर्वां भूतिं अन्नदान । प्रत्यहिं होतसे ब्राह्मणभोजन । वेदघोष पुराणश्रवण । वाद्यें पूर्ण वाजति ॥ ४५ ॥ पूज्या द्रव्य अनेक प्रकारें । अभिषेक करिति द्विजवर । जनयात्रा अपार । उत्छाह थोर अनुपम्य तो ॥ ४६ ॥ निर्गुणपुर क्षेत्र धन्य । अत्यंत भूमि पुण्यपावन । नेत्रीं पाहातां समाधिस्थान । समाधान होतसे ॥ ४७ ॥ रंगनाथस्वामि आत्यासमर्थ । विष्णुस्वरूप भरतशत्रुघ्न ते । अवतार जगीं कल्युगांत । महा भागवत प्रेमळ ॥ ४८ ॥ आत्मनिष्ठ ज्ञानराशी । राजयोगी परम विलासि । मागील वोळखि जाणुनि तयासि । वर्णिलें कथेसि निज भावें ॥ ४९ ॥ रामदास अवतार स्वामि सिद्ध । सद्गुरु समर्थ जगिं प्रसिद्ध । राजारामिं तेणें शुद्ध । केला प्रसाद काव्योक्ति ॥ १५० ॥ श्रीरंगनाथ आख्यान । आत्यास्वामि ऐक्य सुमन । भक्तमालीके गुंफीलें पूर्ण । सुगंध ज्ञान ज्यामाजि ॥ ५१ ॥ निजरंगपुष्प सीतारंगा । अर्पण केलें पांडुरंगा । आत्मया रामसिद्ध अभंगा । भवभंगा पूजियेले ॥५२॥ पुढें रघुनाथ आनंदमूर्ति । तयाचें

चरित्र ऐकीजे श्रोतिं । सिद्धकृपें भरली मति । ते चि युक्ति समर्पिन ॥ ५३ ॥ नाहिं वित्पति कळा लाघव । सद्गुरु पूर्ण दयार्णव । तेणें सुलभ काव्योद्भव । जालें पूर्व सांगतसे ॥ १४ ॥ भक्तमंजरीमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । रंगनाथस्वामि चरित्रातें । पंचमोध्याय समाप्तः ॥१५५॥ श्रीरंगनाथ नाथाचें चरित्र संपूर्णमस्तु ॥ अध्याय ॥ ५ ॥ अनुक्रमें अध्याय वीसावा ॥ २० ॥ समाप्ती ॥ दत्तात्रय गुरु रघुनाथि । निरंजन शिष्य वेदमूर्ति । सद्गुरुकृपें ज्ञानदिप्ति । आपलि आपणा स्वरूपस्थिती ॥

## ॥ अध्याय २१ वा ॥

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॐनमो श्रीगणाधीशा । मूळप्रकृतिपरेशा । सोहंहंसविलासा । माजी स्वासा क्रीडसी तूं ॥१॥ तूं चि मातापिता सर्व । कुळदेवता स्वयेमेव । सिद्ध चि उभा पंढरीराव । श्रीराघव सीतापति ॥ २ ॥ स्वानुभवशुद्ध पूर्ण ज्ञान । हे जयाचिये प्रसादेकरुन । तया साष्टांग माझें नमन । सिद्ध चिद्घन गुरुचर्या ॥ ३ ॥ आतां वंदूं संत श्रोते । परम विचक्षण अर्थज्ञाते । भक्तमंजरीमाळा ग्रंथ । श्रवणें कृतार्थ जीव होति ॥ ४ ॥ साधुकथेहून आणीक । सार नसे चि कांहिं येक । जेथें आत्मानात्मविवेक । वैराग्य निकें ज्ञानेंसि ॥ ५ ॥ हृदई वैसोनि सीतापति । वदवीतसे ग्रंथाप्रति । अंतरबाह्य कृपामूर्ति । भरली चित्तिं सतत पै ॥ ६ ॥ युगायुगीं अवतार । देवें घेतले साचार । परि न कळे प्रेमसार । मोहिला रघुवीर भक्तिनें ॥ ७ ॥ तेव्हां सकळ संता भगवान । प्रश्न करिते जाहाले पूर्ण । मज न पडे कदा चैन । सांगा खूण प्रेमाची ॥ ८ ॥ प्रल्हादादि भक्त सकळ । ह्मणति देवा वैकुंठ पाळ । गुह्यान गुह्य तुह्मा न कळे । संत प्रांजळ जाहाल्याविण ॥ ९ ॥ मग श्रीराम बोलति सुमित्रातें । चला घेऊं भक्तस्वरूपातें । स्थापोनिया निजधर्मातें । प्रेम

अद्भुत भोगावया ॥ १० ॥ वानरगण सकळ संत । होवोनि कळीमाजी क्रीडत । मारुति अवतरला सत्य । आपणा येथें न गमे चि ॥ ११ ॥ आज्ञा वंदुनि लक्ष्मणें । केले साष्टांग राया नमन । जन्म घेतले पृथ्वीत जाण । कथा पावन परिसावि ॥ १२ ॥ अनुक्रमें पुराणोक्त । श्रीराम अवतरले सौमित्रासहित । ऐका बरे सुनिश्चित । येकाग्र चित्तेकरूनि ॥ १३ ॥ स्थान भूमी वेद गोत्र । क्रिया आचरण लीला पवित्र । जैसे मणी वोविले सूत्रें । तेवि चरित्रमालिका ॥ १४ ॥ श्रीराम जन्मले कोणते स्थळिं । लक्ष्मण अवतार कोणते कुळिं । यथा पद्धति श्रोते सकळिं । अर्थावाळि ग्रहण करा ॥ १५ ॥ जनन-क्षेत्र ते नाशिक । जेथें गंगा प्रगटोदक । पंचवटिका अलौलीक । गंगातटाक पैलतीर ॥ १६ ॥ तये स्थानिं श्रीराम । अवतार घेतला पुरुषोत्तमें । यजुर्वेद जाणिजे नेमें । शाखा परम मध्यंदिनि ॥ १७ ॥ तपोनिष्ठ ब्राह्मण । वेदवेत्ता समर्थ पूर्ण । तया उदरिं रघुनंदन । प्रगटले जाण साधुरूपें ॥ १८ ॥ गोत्र जयाचें विश्वामित्र । सकळ विश्वा राम चि मित्र । उदय पावला ज्ञानमित्र । अज्ञान रात्र हरावया ॥ १९ ॥ सुंदर कांति शामवर्ण । आजानबाहु आकर्णनयन । साजिरि मूर्ति सुलक्षण । नव्हे वर्णन वाचेसि ॥ २० ॥ येथें स्फुरला काहिं भाव । श्रीगुरुकृपेचें लाघव । श्रवण करितां स्वयमेव । दिसे राघव सर्वत्र ॥ २१ ॥ श्रोते म्हणति काय कथा । कोण साधु वर्णितां आतां । अध्यात्म रस आवडे चित्ता । अद्भूत अर्थातेसहित ॥ २२ ॥ अंतर्भाव श्रोतियाचा । जाणुनि वदती स्वामि वाचा । रघुनाथस्वामि अवतार साचा । प्रताप तयाचा अभ्याईं ॥ २३ ॥ सत्शिष्य आनंदमूर्ति । लक्ष्मण अवतार तो चि निगुति । वृंदावन समाधि ढोल करिति । संगमि स्थिति कृष्णवेद्येच्या ॥ २४ ॥ धन्य क्षेत्र ब्रह्मनाळ । तेथिल चरित्र परम सखोल । गुरुपुत्र जाणति प्रांजळ । येरि केवळ सुख ऐकतां ॥ २५ ॥ नाशीकीं जन्मले श्रीराम । याचा पाहातां अर्थप्रेम । देहिच जाणिजे स्वात्मधर्म । पुनर्जन्म

मग कैचा ॥ २६ ॥ वद्धचके शाळग्रामयुक्त । तया ह्मणति श्री रघुनाथ । आधारादि संख्या निश्चित । चक्रें शोभत साहि ति ॥ २७ ॥ सप्तम स्थान ते सहस्रदळ । ब्रह्मगिरि तो चि केवळ । क्षेत्र त्रिंबक तेथ प्रांजळ । गंगा निर्मळ सत्रावी ॥ २८ ॥ ईडा पिंगळा सुषुम्ना । त्रिपुटि बोलति या स्थाना । नाशिकीं प्रगट निजस्फुरणा । गोदा जाणा प्रगटार्थ ॥ २९ ॥ पैल तीर निवृत्ति । तेथें चि वसिजे रघुपति । वाच्यांश सरली प्रवृत्ति । जाणिजे युक्ति पंचवटिका ॥ ३० ॥ स्वानुभवें पाहातां देहिं । रामावाचुनि आन नाहिं । रघुनाथस्वामि सर्वत्र ठाईं । संचला पाहि येकात्मता ॥ ३१ ॥ आतां लक्ष्मण अवतार कोणतें ग्रामिं । तें हि ऐका श्रोते तुह्मि । वेद गोत्र शाखा नामि । अनुक्रमीं सांगिजेल ॥ ३२ ॥ ब्रह्मदेव भटजी ज्योतिषि । अगळगार्वि वृत्ति तयासि । सावित्री नाम स्त्रियेसि । निश्चयेंसीं गृहस्थ ॥ ३३ ॥ तया उदरिं सुमित्राकुमर । जन्म घेतला निर्धार । वशिष्ट गोत्र साचार । शाखा थोर आश्वलायन ॥ ३४ ॥ कोण्हि घेतिल आशंका । राम लक्ष्मण अवतार देखा । भिन्न वेदिं जन्मले कां । इतिहास निका सांगतो ॥ ३५ ॥ तरि ऐका विचक्षण । अर्थिं घालुनि येकाग्र मन । उपनिषधिं बोलिले जाण । प्रत्यक्ष वदनें वेद स्वयें ॥ ३६ ॥ ऋग्वेद तो दक्षिणपक्ष । साम ह्मणावा उत्तरपक्ष । यजुर्वेद तो अध्यक्ष । न धरा काक्ष मस्तक ते ॥ ३७ ॥ वेद अथर्वण पुछ जाहाला । निगमरूपी हंस बोलिला । भाष्यकार जाणति अर्थाला । इतर जनाला कथा हे ॥ ३८ ॥ ब्रह्मनिष्ट जे जे बोलिले । यजुर्वेदिं ते बहुत जाहाले । याज्ञवल्कयादि कथिले । तत्वज्ञ भले पुराणांतरी ॥ ३९ ॥ असो दक्षिणभाग सुमित्राचा । तो चि स्विकारिला तेणें साचा । यालागीं जन्म आनंदमूर्तिचा । ऋग्वेदाचा या अर्थे ॥ ४० ॥ शेष अवतार लक्ष्मण । तो हि जाणिजे अर्थ सघन । लक्षूं जातां स्वरूपीं मन । सहजीं उन्मन होतसे ॥ ४१ ॥ जाणीव ग्रासोनि उरले शेष । तोचि अवतार लक्ष्मण शेष । आनंदमूर्ति नामविशेष ।

योगी निःशेष जाणति तया ॥ ४२ ॥ आतां चरित्रभाग श्रवणार्थि। सकळ जन वाट पाहाति। याळागिं आवरिली मति। प्रगट स्थिति कैसि करूं ॥ ४३ ॥ आख्यान सांगूं ते चि सुरस। नाशिकिं जन्मले अयोध्या निवास। ते कथा करूनि आवकाश। येकाग्र मानसें अवधारा ॥ ४४ ॥ जन्मकाळिं उत्छाह जाला। नये वर्णितां जडमतिला। ऋषि समोचय समस्त पातला। ठेविलें नामाला तये काळि ॥ ४५ ॥ दिवसेंदिवस चटला जाण। वृद्धि जेवि चंद्राशकीर्ण। मग जाहाले व्रतबंधन। तें वर्णन अनोपम्य ॥ ४६ ॥ ब्रह्मचर्य मूर्तिमंत। श्रीरामाते विनवित। अवमानिले समस्तें माते। कळी अद्भूत माजला ॥ ४७ ॥ दीनवदनें कर जोडुन। ब्रह्मचर्य आले रामासि शरण। तयेवेळिं रघुनंदन। व्रतासि आपण अंगीकारि ॥ ४८ ॥ वामांगि ते सीता सति। वेगळी न दिसे जगाप्रति। ब्रह्मवेत्ते तये जाणति। नेणवे स्थिति इतरासी ॥ ४९ ॥

## श्लोक

रकारः शक्तिरूपेण मकारस्तु परः शिवः ॥
शिवशक्तिसमायोगाद्राम इत्यभिधीयते ॥ १ ॥

टीका ॥ रकार शक्ति मकार पुरुष। तारक मंत्र ह्मणति यास। शिव सांगति गिरिजेस। गुह्य डंश हृदईंचा ॥ ५० ॥ ह्मणोनि रकार ते चि सीता। मकार श्रीराम सर्वथा। वियोग नसे श्रीरघुनाथा। क्षणेक पाहातां जानकीसी ॥ ५१ ॥ त्रेतायुगीं उपदेश। हनुमंतें केला नळास। समुद्रिं बांधले स्वेतुस। युक्ति विशेष हे चि ते ॥ ५२ ॥ तो ऐकावा इतिहास। रामायणीं वर्णिलें असे। नळाहातुनि पाषाणास। तरावयास उदकीं ते ॥ ५३ ॥ परी शीळा वाहात जाति। तेव्हां हनुमंते काढिलि युक्ती। तो अभिप्राय ऐका श्रोति। येकाग्र वृत्ति करूनि ॥ ५४ ॥ राममंत्र उभय शिळे। लेखन करिता जाहाला नळ। तव्हां जडाव तात्काळ। सागरि जाहालें श्वेतुबंधन ॥ ५५ ॥ रकार लिहितां पाषाणि। मकारिं जडे ततक्षणीं। याळागिं रकार सीता-

जननि । ध्यापपाणि मकार तो ॥ ५६ ॥ जानकीयुक्त रघुनाथस्वामि । ब्रह्मच्यारि वर्ते नेमिं । जग गुंतलें संशयभ्रमिं । नाहिं ब्रह्मिं प्रवेश तया ॥५७॥ असो प्रेमानुभव ध्यावयासि । अवतरते जाहाले अयोध्यावासि । संगे घेउनि शेषासि । आनंदमूर्तिसि लक्ष्मण तो ॥ ५८ ॥ संत जाहाले श्रीराम । परि सद्गुरु पाहिजे हा नेम । याच्यागी सर्वोत्तम । शिव प्रेमें आराधिला ॥ ५९ ॥ तात्काळ जाहाले सांब प्रसन्न । अनुग्रह केला गुरुरूपें जाण । हरिहर मुळिचे येक पूर्ण । गोडि अभिन्न शर्करा ॥ ६० ॥ तो स्वानुभव आत्मदर्शन । वाचे हातिं देईल कोण । रघुनाथ॰ स्वामि उपदेश खूण । गुह्य पूर्ण ते शिवाचे ॥ ६१ ॥ मग सर्वकाळ श्रीगुरुध्यानिं । राम विनटले निशिदिनिं । सर्वत्र पाहाति नैनीं । जीविंत्व त्रिभुवनिं नसेचि ते ॥ ६२ ॥ जनक जननि उद्धरिली । तात्काळ स्वरूपिं लीन केली । अवतार स्थिति सांगुनि आपुली । सुखी केली उभयता ॥ ६३ ॥ जेवि कपिलाचार्यें मातेसी । अनुग्रह केला निश्चयेंसि । तैसि च येथे कृपाराशी । रघुनाथस्वामिशीं गोष्ट घडली ॥ ६४ ॥ कांहिंकाळ सेवा केली । मातापितरें तोषविलीं । मग निघाली गुरु माउली । भूमंडळिं फिरावया ॥ ६५ ॥ तिर्थमिसें साधु पाहावे । हे चि वांछि श्रीराघव । किंबहुना सकळ जीव । उद्धरावे ठाईं ठाईं ॥ ६६ ॥ नातरि युगायुगीं । दैत्य मारिले श्रीरंगीं । याचि साठिं तीर्थजगीं । करिति शारंगी लोकरीसा ॥ ६७ ॥ कावडि भरोनि भागिथि । रामेश्वरा जातसे रघुपति । वारंवार यात्रा करिति । अनुष्ठानोक्ति आरंभिली ॥ ६८ ॥ शंकरा येवढे दैवत नाहिं । ऐसें बोलति शास्त्रें साही । आदिनाथ तो चि पाहि । जगत्रईं सद्गुरु ॥ ६९ ॥ काशीक्षेत्रीं मोक्षसत्र । घालोनि बैसला पंचवक्त्र । मृत्युकाळिं दक्षिण श्रोत्र । तयाते मंत्र उपदेशी ॥ ७० ॥ तारक मंत्र सांगतां कानिं । जीव पावति आत्मसदनिं । ऐसा स्वामि कैवल्यदानि । त्रिभुवनिं दुजा नसे ॥ ७१ ॥ श्रीराम शिवीं रत जाला । भेद नसे हरिहराला । द्वैतवादि भाविति त्याला । दुरिताला काय उणें ॥७२॥ विष्णुसारिखा स्मार्थ नाहिं । वैष्णव येक सदा शिव पाहि । यदर्थि

युक्ति परिसावी कांहि । न पडे संशई मन जेणें ॥ ७३ ॥ त्रिगुणात्मक तिन्ही देव । नाना ग्रंथि हा चि भाव । रज तम सत्व वर्ण पाहावे । सांगूं स्वभाव तयाचा ॥ ७४ ॥ रजोगुण ब्रह्मदेव । आरक्तवर्णे तो सावेव । शुभ्रवर्णे सर्वि असावे । श्रीराघव विष्णु तो ॥ ७५ ॥ तमोगुणी शंकर भोळा । शामरंग तो शोभला । पाहातां विच्यार ऐसा जाहाला । ध्यानलीला अनुक्रमें ॥ ७६ ॥ परि ध्याता येकयेका । शिव चि विष्णु जाहाला देखा । त्रिनेत्रासि हरि सखा । प्रिय निका अत्यंत तो ॥ ७७ ॥ परस्परें करितां ध्यान । अळीपरि जाहाले जाण । पक्ष फुटती तये लागुन । भ्रमरी कारणें जैसे का ॥ ७८ ॥ तैसि च येथें गोष्ट घडली । विष्णु आंगि शामता आली । शुभ्र वपु तात्काळ जाहाली । शिव माउली ते परियसा ॥ ७९ ॥ येकात्मता ऐसे रिति । शिव विष्णु अभेद मूर्ति । भेदभावना उगे च करिति । नाहिं गति तयासि ॥ ८० ॥ या च साठिं स्वहित । करणें आहे जया निश्चित । तेणें पाहावें अद्वैत । निरद्वैत परब्रह्म ॥ ८१ ॥ नाहिं तरि व्यर्थ शीण । तप तीर्थ नाना साधनें । जव न पाहे आपण कोण । भ्रांति जाण समूळ ते ॥ ८२ ॥ असो रघुनाथस्वामिया चि लागि । अवतार घेते जाहाले जगीं । अज्ञान जीवा लावणें मार्गी । हे चि आंगि ब्रीद शोभे ॥ ८३ ॥ अभेद भक्ति रामेश्वरा । अर्पण केले जान्हवी नीरा । तेविस कावडि निर्धारा । गिरिजावरा नाहाणिले ॥ ८४ ॥ चोविसावी कावड भरली । मार्गे चालिली गुरु माउली । आठवण सहजी होति जाहाली । हृदय कमळीं स्वामिते ॥ ८५ ॥ सखा शेष लक्ष्मण । अगळगांवीं जन्मला जाण । वियोग जाहाला बहुत दिन । भेटि घेणें तयाचि ॥ ८६ ॥ स्वइच्छाच्यारे हिंडत । आगळगांवा आले श्रीरघुनाथ । अपूर्व वर्तलें असे तेथें । ऐका श्रोते सर्वहि ॥ ८७ ॥ कांहि कथन मधि आले । पाहिजे तें वर्णियेलें । जैसें तुळशीस पाणि लाविलें । पाटवण फुटलें तयापरि ॥ ८८ ॥ आगळगांवि [illegible] । [illegible]

कमावीसि तथा लागुन। बहुत दीन असे पै ॥ ८९ ॥ परि तो द्विज तमयुक्त। हिंसा कर्माते आचरित। नित्य उठोनि अरण्या जात। श्वापदाते माराव्या ॥ ९० ॥ स्नानसंध्या स्वधर्माच्यार। संक्षेप अवघा चि विचार। चित्त सर्वदा नसे स्थिर। बहु वनचरें तों वधीतसे ॥ ९१ ॥ जन्मातरिंचें काय पुण्य। फळासि आलें न कळे जाण। रघुनाथ स्वामिनि पावन। केला ब्राह्मण निजलीळे ॥ ९२ ॥ ते ऐका विचित्र गोष्टि। त्रिविध तापा शमन वृष्टि। श्रीरामें कृपादृष्टि। द्विजश्रेष्टि उद्धरिला ॥९३॥आगळगावा सन्निधानिं। रघुनाथस्वामि येवोनि। योगमुद्रा सिद्धासनिं। बैसले ध्यानिं निमग्न ते ॥ ९४ ॥ साजीरि मूर्ति सुलक्षण। माथा जटा पींगटवर्ण। व्याघ्रांबराचें परिधान। विभूतिचर्चन आंगि ते ॥ ९५ ॥ स्थापोन जवळि कावडिते। स्वामि तेथें समाधिस्त। आपा विप्र उद्धरणार्थ। समय तेथें पातला ॥ ९६ ॥ प्रातःकाळि आपाजीपंत। अरण्या निघाले सेवका सहित। तयार करूनि बंदुकीते। अति त्वरित चालिले ॥ ९७ ॥ बहुत हिंडले वनांतरिं। श्वापद न सापडे चि निर्धारिं। श्रम पावोनि अंतरिं। वाट माघारि धरिली ति ॥ ९८ ॥ मुहूर्त मात्र राहिला सूर्य। तव देखिला स्वामिराय। पुढें बैसला व्याघ्र आहे। ऐसें पाहे वाटलें ॥ ९९ ॥ जो जो चित्ता निजध्यास। तो तो तया होतसे भास। तेसियात प्रत्यक्ष दिष्टिस। व्याघ्रांबरास पाहिले ॥ १०० ॥ मग विप्रें त्वरा केली। बदुक सावरोनि आगें धरिली। सेवका म्हणे सिकार साधिली। पाहाता बुबुळि का अझोनि ॥ १ ॥ येकसरा साधिति सधान। गोळ्या घालीति व्याघ्र लक्षुन। वृष्टि केली त्या दुर्जनें। आंगावरि जाण स्वामिच्या ॥२॥ परि गुरुराज स्वस्थ चित्तें। येकाग्रता समाधिस्त। सुदर्शन फिरे रामा मोवते। केच्या तेथें गोळ्या स्पर्शति ॥ ३ ॥ जया सत्तें शब्द आकाशीं। स्पर्शता असे वायुसि। सूर्य तपे तेजोराशी। रस जळासि वसे तो ॥ ४ ॥ पृथ्वीलागीं भार वाहाणें। हें तों जयाचि लीला जाण। तेथें बापुडें कायसें विघ्न। रघु-

नंदन.समर्थासि ॥ ५ ॥ ब्राह्मण दचकला अंतरिं । व्याघ्र न मरे चि अद्यापि वरि । जोडगोळ्या निर्धारिं । गेल्या स्वकरि कैरया त्या ॥ ६ ॥ भीत भीत सेवका सहित । आवलोकीत साशंकीत । जवळि पातला निश्चित । आपाजीपंत शुक्तिनें ॥ ७ ॥ तेव्हां पाहिले रघुनाथ स्वामि । भय पावला अंतर्यामि । बहुत पातकी अपराधि मी । हृदयपर्शी वाटले द्विजा ॥ ८ ॥ म्हणे अन्याय थोर घडला । पश्चात्ताप बळावला । परम चित्तीं घावरा जाला । विच्यार केला तो ऐका ॥ ९ ॥ रघुनाथस्वामिचें दर्शन । जन्मांतराचें जाहालें स्मरण । स्फुंदस्फुंदो करि रुदन । श्रवति नैन प्रेम ते ॥ ११० ॥ कोण तपश्वि न कळे कांहिं । केवढें सामर्थ्य ज्याचे ठाईं । स्मृति नसे जया देहिं । तन्मय हृदईं येकाग्रता ॥ ११ ॥ दत्तात्रय शुकाचार्य । की याज्ञवल्की गुरुवर्य । नातरि कपिल मुनि सर्वथा हे । बैसले पाहे घ्यानरत ॥ १२ ॥ ऐसियाते मी पातिवे । गोळ्या घातल्या निश्चीत । विच्यार करि सद्गदित । उद्विग्न चित्ते मानसि ॥ १३ ॥ होते जाहाले पूर्ण वैराग्य । कोण वर्णि तयाचें भाग्य । निर्धार करुनि स्वर्गि । जाहाला भृंग पदकमळा ॥ १४ ॥ सेवका सांगोनि निरोप दिधला । जावे म्हणे आश्रमाला । ग्रामाधिकार सोडिता जाहाला । बळावला अनुताप ॥ १५ ॥ रघुनाथस्वामिपुढे जातां । भय वाटतसे विप्रचित्ता । तपोदिष्टि रागें पाहातां । पावेन घाता तात्काळ ॥ १६ ॥ ऐसि शंका धरुनि मनि । पृष्टिभागा दुरि जाउनि । सांष्टांगेंसि मेदिनि । कर जोडोनि नमितसे ॥ १७ ॥ सर्वसाक्षि श्री गुरुमूर्ति । अंतरिं कळवळे रघुपति । कृपादिष्टि माघे पाहाति । बोलवीति त्या ब्राह्मणा ॥ १८ ॥ म्हणति कां बा उगा च श्रमसि । नमस्कार कवणा घालीसि । येकला चि येथें आउसि । काय मानसीं इछा तुझे ॥ १९ ॥ सुहास्य पाहोनि प्रसन्न वदन । निर्भय जाहाला तो ब्राह्मण । तात्काळ धरिले स्वामिचरण । करि निवेदन वृत्तांत पै ॥ १२० ॥ प्रश्न केला श्रीगुरुराया । सदृढ धरिले मस्तकीं पाया । म्हणे दावा निजपद ठाया । करुणालया श्रीमूर्ति ॥ २१ ॥ स्वामि कृपेचे सागर । बोळला मेघ द्विज चातकावर ।

प्रसाद वाक्य अपार । शद्वयोर वृष्टि होतसे ॥ २२ ॥ सांप्रदाय क्रमेकरुनि । उपदेश केला निजकर्णी । तात्काळ लाधली उन्मनी । अंतःकर्णि येकात्मता ॥ २३ ॥ तो अनुभव लिहितां नये । जाणति गुरुपुत्र सन्वय । बहिर्मुखा न कळे सोय । गुरु अद्वय नसे जया ॥२४॥ मंत्र तंत्र उपदेशिति । चावटि ज्ञान उदंड कथिति । नाहिं बाणली आत्मस्थिति । थिगः वितति सकळ ते ॥ २५ ॥ तैसा नोव्हे सद्गुरु-राम । दर्शन होतां नुरे भ्रम । उद्धरिला विप्रोत्तम । अत्यंत अधम असता पै ॥ २६ ॥ आपणाकरितां वाया जाति । तया अवश्य तारणें निश्चिति । पल्लव फुटले शाति प्रति । ते हे ख्योति जाणा पै ॥ २७ ॥ पदर पसरोनि म्लान वदन । द्विज विनवी कर जोडुन । स्वामिराया वांछि मन । गुरुपूजन करावया ॥ २८ ॥ म्हणे पायिं अर्पिन स्त्रीपुत्र । आश्रम करावा पवित्र । बोलति तेव्हां पद्मनेत्र । येऊं स्वतंत्र घरासि ॥ २९ ॥ परि यात्रा जाहाल्यावीण । येणें न घडे जाणिजे खूण । चोविसावी कावडपूर्ण । येवर्दि नेहणे रामेश्वरा ॥ १३० ॥ अपाजीपंता तये काळिं । अश्रु दाटले नेत्रकमळिं । मस्तक ठेवीले पदयुगळिं । बद्धांजुळी पसरीतसे ॥ ३१ ॥ वत्सा मोकळी वनिं गाय । बाळा टाकोनि जातसे माय । नातरि मछा जगणें काय । यक तोय न मिळे जरि ॥३२॥ ऐसि पाहातां निर्वाण भक्ति । वचन देतसे श्रीरघुपति । प्रघट होईन रामजयंति । वाच्योक्ति सत्य सत्य ॥ ३३ ॥ मग ब्राह्मण हर्ष पावला । गेला निघोनि स्वस्थानाला । अंतर्धान पावता जाहाला । योगेंद्र भला रघुनाथ ॥ ३४ ॥ अपाजीपंत निजसदना । त्याग केला कारभार जाणा । टाकीयेलें अन्नपाना । छंद मना तो चि पै ॥ ३५ ॥ लक्ष लागलें श्रीगुरुचरणीं । कैंचि निद्रा असेल नैनिं । मोजितसे निशिदिनि । अंतःकर्णि घटिकाते ॥ ३६ ॥ पतिव्रता स्त्री जैसी । पतिवियोगें झुरे मानसीं । धौंवहुना पक्षिणीसी । स्मरे मानसी अंडज ते ॥ ३७ ॥ ऐसा करिता निजध्यास । तव पातला तो चि दिवस । न मायें चित्तिं द्विजा हर्ष । रामनवमीस माध्यान्हिं ॥ ३८ ॥ प्रातःकाळिं करोनि स्नान ।

मार्गि तिष्ठे तो ब्राह्मण । माध्यान्हिसि चंडकीर्ण । आला जाण तत्समई ॥३९॥ रघुनाथ स्वामि ते वेळिं । प्रगटले तेथें भूमंडळीं । अेकावे ते श्रोते सकळी । कथा सरली सुरस पै ॥१४०॥ बाळरूप अत्याद्भुत । धरिते जाहाले सीताकांत । गोजीरी मूर्ति पाहातां चित्त । तन्मय होत द्विजाचें ॥ ४१ ॥ प्रसुत काळीं कौसल्येसी । तात्काळ प्रगटले हृदयनिवासि । नये सांगतां वाचेसी । घडली तैसी गोष्ट हे ॥ ४२ ॥ विस्मय पावला ब्राह्मण मनिं । विचित्र ध्यान दिसते नैनिं । घेता जाहाला उचलोनि । ध्यापपाणी कडेवरि ॥ ४३ ॥ हास्य केले श्रीरघुनाथें । द्विज आसनि बैसवीत । धारण केले पूर्वस्थित । ऐसे समर्थ माहाराज ॥ ४४ ॥ अगाध लीळा न कळे कवणा । थकली वाणि पावली मौना । ते सुख करावया गणना । सहस्र वदना विस्मय तो ॥ ४५ ॥ तेथें मानव वर्णील कीति । द्विजवरा भेटले रघुपति । धन्य दिवस रामजयंति । बाळमूर्ति दर्शन ॥ ४६ ॥ पुढें कथा वदवी स्वामि । सिद्ध जाहाले अंतर्यामीं । वाक्य सुमनें राजारामि । पादपद्मीं समर्पिले ॥ ४७ ॥ भक्तमंजरीमाळा ग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । रघुनाथस्वामी अख्यानातें । जाहाला समाप्त अध्याय हा ॥ १४८ ॥ अनुक्रमें अध्याय येकविसावा ॥

---

## ॥ अध्याय २२ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥श्रीरामसमर्थ ॥ जयजया जी सद्गुरुनाथा । अनन्य चरणीं ठेविला माथा । अंतर्बाह्य तूं चि पाहातां । नाहिं वार्ता द्वैताचि ॥ १ ॥ बोलूं जाता शब्द राहे । अबोलणें तें बोलूं काय । जाणिवेचे मोडले पाय । जाहालें हृदय तन्मय ते ॥ २ ॥ असो ऐसिया सिद्धमूर्ति । नमन माझें पुढतपुढति । देहभाव निजस्फूर्ति । अर्पिली वृत्ति श्रीगुरुपदा ॥ ३ ॥ मागील अध्यांई आख्यान ।

रघुनाथ स्वामिनि द्विजास दर्शन । बाळरूपें दिधलें जाण । तें वर्णन अनोपम्य ॥ ४ ॥ नंतर दाविले पूर्वील ध्यान । जटाभार देदिप्यमान । रुद्राक्षमाळा भस्मोद्धारण । शोभे वसन व्याघ्रावर ॥ ५ ॥ षोडशोपच्यारें केळी पूजा । नैवेद्य अर्पिला श्रीगुरुराजा । मंत्रपुष्प वाहातां वोजा । प्रसाद द्विजा दिधला तो ॥ ६ ॥ पारणा विधि साग जाहाला । श्रीराम विप्रगृहासि आला । अनुभव प्रतिसि लाधला । विप्र भला आणा तो ॥ ७ ॥ मग राहिले प्रपंचमान । ग्रामाधिकार त्यागिला जाण । श्रीगुरुसेवे निमग्न । करि चिंतन सर्वदा ॥ ८ ॥ अखंड बैसणें येकांति । न स्फुरे कांहिं दिवा राति । सस्वरूपीं रंगली वृति । आत्मस्थिति बाणली तें ॥ ९ ॥ आपाजीपंत योगीराज । पूर्णता पावली तया सहज । लोकेषणा राहिली लाज । गुरुराज सदा मनिं ॥ १० ॥ पुरोहित द्विज आपायाचा । आनंदमूर्ति ब्राह्मण साचा । वेदवेत्ता प्रताप ज्याचा । शास्त्रज्ञाचा मुगटमणि ॥ ११ ॥ तयासि कळलें वर्तमान । ग्रामिं आला तापसी पूर्ण । भुलविला असे तेणें । यजमान आपुला तो ॥ १२ ॥ प्रत्यक्ष असतां मि कुळगुरु । संत आणीला कोण थोरु । नाहि जाणीला विच्यारु । मैंद चोरु भोंदु तो ॥ १३ ॥ व्यर्थ माजविलें येथें बंड । साधुत्व कैचें दिसे थोताड । आपाजिपंतासि लागलें वेड । टाकीली प्रौढ मामलत ती ॥ १४ ॥ ऐसें वदुनि आनंदमूर्ति । मोटी टांग घेतली हातिं । छळावया सत्वरगति । निघाले युक्ति अती त्वरें ॥ १५ ॥ गोकुळीं जैसें ब्रह्मदेवें । वत्सें हरण केली सर्वे । भागवतिं वर्णिला असे भाव । घडलें अपूर्व तैसें तें ॥ १६ ॥ शेष अवतार लक्ष्मण । आनंदमूर्ति तोचि जाण । रघुनाथस्वामी तयाचा पूर्ण । परि मन भ्रमलें तें ॥ १७ ॥ आपा विप्र श्रीगुरुमूर्ति । येकांतस्थानिं बैसले असति । गुप्तरूपें आनंदमूर्ति । आले निगुति जवळ ते ॥ १८ ॥ कैसें साधुत्व तें पाहावें । प्रश्नोत्तरें परीक्षावे । नाना विध तंडावे । छळण करोन दुरोक्ति ॥ १९ ॥ ऐशा प्रकारें जातां निकट । वर्तले तेथें अद्भुत

चोखट। श्रोतिये मराली श्रवणपुटें। घेउनि घोट चरित्ररसाचा ॥ २० ॥ रघुनाथस्वामिसि पाहतां नैनिं। आनंदमूर्ति पडले मेदिनि। दृष्टिपात ततक्षणि। धरिले उन्मनि नयनें ते ॥ २१ ॥ कैचि डोंग कैचें भाषण। विरोनि गेलें देहमान। ठाईं च गळाला अभिमान। मीतूंपण न दिसे ते ॥ २२ ॥ कर्पुर वन्हि येकवटला। अवघा चि जाहाला वंबाळा। तैसि गति आनंदमूर्तिला। लाधले स्थितिला गुरुदर्शनें ॥ २३ ॥ नातरि दारूचा पर्वत। अग्निस्पर्शें उडोनि जात। किंबहुना पिशाच पळत। पडतां श्रवणांत हरिनाम ॥ २४ ॥ असो दृष्टांत येकदेशि। देणें कळाया साधकाशी। आपुलेपण सच्छिष्यासि। दयारासि देति ते ॥ २५ ॥ आनंदमूर्ति लक्ष्मण अंश। मिळाला कैंचें श्रीरामास। सद्गद जाहालें मानस। वैराग्य आंगास भरले पै ॥ २६ ॥ पश्चात्ताप बळावला। विरक्तिनें घातिलि माळा। कोण वर्णि त्या वैभवाळा। संशय पळाला दिगांतरि ॥ २७ ॥ मग सांप्रदायक्रमें श्रीगुरुनाथें। उपदेश केला आनंदमूर्तिते। ते वाच्यांशद्वारें ग्रंथातें। लेखन केउतें करूं मी ॥२८॥ श्रवणिं पेरिलें निजबीज। नैनिं उगवलें सतेज। अंतर्बाह्य फाकले सहज। नवल चोज गुरुकृपेचें ॥ २९ ॥ सहज समाधि अद्वय स्थिति नसे चि तेथें दिवाराति। नित्योदय आनंदमूर्ति। अद्वयस्थिति भोगीली ते ॥ ३० ॥ पिंड ब्रह्मांड निरसले। तत्वीं तत्व विभागिले। जीवशिव मावळले। तया सोज्वळ चिद्गगनीं ॥३१॥ अहंसोहं भेदमान। आनंदि विराले निजस्फुरण। उमस खाऊ नेदि क्षण। वृत्ति लीन परब्रह्मि ॥ ३२ ॥ ऐसा होता स्वरूपानुभव। कर्म धर्म जाहाले वाव। आपि आप स्वयंमेव। वासुदेव परमात्मा ॥ ३३ ॥ प्रवृति भाग राहिला। देहस्मृति नसे ज्याला। स्वइच्छा वर्ते योगी भला। परम पदाला मीनला तो ॥ ३४ ॥ सदा वैसणें येकांति। लोकेषणा राहि रिति। केन्हां तरि गृहासि येति। मग सारिति भोजन ॥३५॥ वेदश्रुतिचा जाणला अर्थ। वेदाध्ययन केचें तेथें। वाच्य वाचक विरला जेथें। अनिर्वाच्य तें स्वरूप

पै ॥३६॥ ययापरि आनंदमूर्ति । पूर्णता पावले आत्मस्थिति । श्रीगुरुचरणिं रंगली वृत्ति । प्रपंचयुक्ति राहिली ते ॥ ३७ ॥ हें तों नावडे त्याच्या पित्यासि । परम कोपिष्ठ तमोराशी । आगळगांवी ग्रामजोशी । नाम तयासि ब्रह्मदेव ॥ ३८ ॥ म्हणे मी विद्वान ब्राह्मण । मान्य सकळा ठाईं जाण । जन्मले कुळिं संतान । कलंकपूर्ण वंशासि ॥ ३९ ॥ पुत्र जाहला संत उपदेशी । दाखवणें काय मुख जगासि । जाणें लागे दूरदेशीं । अपकीर्तिसि नायकावें ॥ ४० ॥ स्त्रियेसि म्हणे अगत्य जरि । असेल माझि निर्धारिं । तरि घालवी बाहेरि । आनंदा करिं धरुनि ॥ ४१ ॥ कयावु परि ते माता । सावित्रिबाई तत्वता । म्हणे आज्ञा मान्य सर्वथा । स्वकांता शांत करि ॥ ४२ ॥ बोलाउनि आनंदमूर्ति । बोधवीतसे नाना युक्ति । बा रे टाकी अध्यात्म पोथि । संसारकृति करि तूं ॥ ४३ ॥ वडिल आज्ञापाळण । करितां सकळ कल्याण । मुख्य विधि स्वधर्माचरण । काय करणें छंद हा ॥ ४४ ॥ उपदेश करितां ऐसा जननि । परम उल्हास जाहला मनिं । आनंदमूर्ति लागले चरणीं । धन्य जननी म्हणति ते ॥ ४५ ॥ सकळ धर्मामाजि धर्म । स्वरूपिं राहणें हा स्वधर्म । वेदशास्त्रिं बोलिलें वर्म । तो चि परम सिद्धांत ॥ ४६ ॥ सांगितलें तें तुवां माये । आज्ञानुलंधी सर्वथा हे । आनंदमूर्ति वंदिति पाय । अनन्य हृदय मातेचे ॥ ४७ ॥ मग ती दचकली मनीं । म्हणे अवतार असेल हा कोणि । स्वरूपाकार तत्क्षणीं । जाहाली जननी सावित्रि ॥ ४८ ॥ ब्रह्मदेव भटजी कोपिष्ट । स्त्रियेसी बोले परम रुष्ट । ऐसा पुत्र नलगे स्पष्ट । कर्मभ्रष्ट गृहामाजीं ॥ ४९ ॥ जैसा क्रोध जमदग्निचा । तैसा बाप आनंदमूर्तिचा । नातरि हिरण्यकशिपु दैत्य साचा । काया वाचा द्रोहि तो ॥ ५० ॥ प्रार्थिति सकळ ग्रामस्त । परि तो द्विज न होय शांत । उपदेशी भ्रष्ट ऐसा सुत । नलगे आम्हातें वदतसे ॥ ५१ ॥ तये काळीं बाळंतिण । आनंदमूर्तिचि स्त्रीजाण । प्राप्त जाहला त्रयोदश दिन । नामकर्ण पुनोत्साह ॥ ५२ ॥ ऐसे वेळ हा प्रसंग । न आवरे तया द्विजा राग । स्नुषा पुत्र दवडि अंगें । भटजी निःसंग

रागीट तो ॥ ५३ ॥ रघुनाथ स्वामि आनंदमूर्ति । बाळांतिण भार्या तिसरि सती । वसुगा मुळ घेवोनि क्षिति । निघाले युक्ति पादच्यारि ॥ ५४ ॥ तिव्र उष्ण माध्यान्हकाळि । चैत्र मास तप्त ज्वाळीं । बाळांतिण स्मरे तये वेळि । हृदयकमळि रघुराया ॥ ५५ ॥ तेन्हां आकाशें छाया धरिली । परम भूमी मृदु जाहाली । सन्निध आसतां गुरु माउली । दुःखें समुर्छी गेली ति ॥ ५६ ॥ आगळगांवा बाहेरि । निघल्या जाहाल्या मूर्तिच्यारि । प्रज्वळला अग्नि भारि । जाहाला नगरि हाहाकार ॥ ५७ ॥ क्षोभले ग्रामदेवता गण । न होय फदा शांतवन । हाळकल्लोळ वर्तत जाण । करुणा जन भाकितसे ॥ ५८ ॥ असो श्रीगुरुराय कृपावलोकन, करिता जाहाला शांत भवन । जन पावले समाधान । अगाध करणें स्वामिचें ॥ ५९ ॥ आगळगांवा जळके चिन्ह । अद्यापि दिसत आहे जाण । निघते जाहाले मार्गानें । पानि घेउन शिष्य गुरु ॥ ६० ॥ आपा विप्र मार्गे धावत । तया सांगति श्रीरघुनाथ । घरिं राहि स्वस्थचित्तें । स्वरूपिं रत सदानुभवें ॥ ६१ ॥ आज्ञा घेऊनि तो गेला । आपा विप्र स्वस्थानाला । बोलति स्वामि आनंदमूर्तिला । आतां चला हळु हळु ॥ ६२ ॥ सहज गति क्रमित । वसगड्या पातले श्रीगुरुनाथ । बाळांतिण श्रीसमवेत । आनंदमूर्ति शिष्य तो ॥ ६३ ॥ जाहाला तेथें अस्तमान । पुसिते जाहाले राहावया सदन । वसंगडे ग्रामिचे कुटिळ जन । स्वामिछळण आरंभिले ॥ ६४ ॥ पिशाच वसगडे नगरांत । ब्रह्मराक्षस असे राहात । ते स्थळ दाविले विन्हाडाते । श्रीरघुनाथ स्वामिसि ॥ ६५ ॥ अवश्य म्हणुनि उभयता तेथें । राहिली संगे बाळांतीण । हासते जाहाले दुर्जन । सकळ नैनें खुणाविति ॥ ६६ ॥ सद्गुरुनाथ पंच्याक्षरि । वास केला तये मंदिरिं । भूतसमंध काय करि । ध्याता अंतरिं आत्मरूप ॥ ६७ ॥ मग संध्यावंदन सारुनि रामें । आरंभिला नित्यनेम । विणा लाविला सप्रेमें । भजनधर्म होतसे तो ॥ ६८ ॥ तो आटहास्य देवोनि हाक । पिशाच्च पातला भयानक । दिष्टि पाहाति कौतुक । रघुनायक माहराज तो ॥ ६९ ॥ करकरा खातसे दादा । उभा ठाकला येवोनि

पुढा । म्हणे माझा घेतला वाडा । पसरला जबडा खाईन म्हणे ॥ ७० ॥ हास्य करूनि रघुनाथें । सुचविलें तेव्हा आनंदमूर्तिते । मेळवावे मुक्तिते । पिशाचाते ये क्षणिं ॥ ७१ ॥ आज्ञा वंदुनि तयेवेळा । हस्तिं घेतले गुरुपादजळा । बोल म्हणति पिशाचाला । कोणस्पळाला तूं येथें ॥ ७२ ॥ आनंदमूर्ति वदतां ऐसे । शरण आला ब्रह्मराक्षस । सिंचन करितां गुरुतीर्थास । वर्तले सुरस तें ऐका ॥ ७३ ॥ जाहाले जन्मांतराचें स्मरण । सकळ दोप कथिले तेणें । तात्काळ देह त्यागिला जाण । ब्रह्म धन्य गुरुलीला ॥ ७४ ॥ अचेतन प्राणहिन । पीशाच पडला पृथ्वी जाण । दणाणीली सकळ भुवनें । जाहाले जन भयाभीत ॥७५॥ प्रातःकाळिं ग्रामस्त मिळुनि । येते जाहाले तये स्थानिं । पाहातां साधु स्वस्थ सदनिं । बाळंतिणि समेत ॥ ७६ ॥ आश्चिर्य करिति नरनारि । लोटांगण घालीति निर्धारिं । दुर्जन दचकले अंतरिं । अनुताप उदरिं जाहाला त्या ॥ ७७ ॥ प्रार्थना करिति सकळिक । पदर पसरिति भाउक । करुणा भाकिति अनेक । इछिति सुख शाश्वत तें ॥ ७८ ॥ श्रीगुरुराय बोलति जना । काय यांछा तुमचे मना । ग्रामस्त वदति याबे वचना । आह्मा दीना उद्धरावे ॥७९॥ राहावे अक्षई या स्थानि । मागणें हें चि मोक्षदानि । दिले म्हणति च्यापपाणि । कैवल्यखाणि श्रीरघुवीर ॥ ८० ॥ वसगडे ग्रामीं श्रीरघुनाथ । मारुतिरूपे राहिले स्वस्थ । अद्यापि जरि जन पाहत । तो चि वृत्तांत परिसावा ॥ ८१ ॥ अनुक्रमें येईल कथा । श्रोतिं असावी येकाग्रता । रघुनाथ स्वामि शिष्यसहिता । वास नगरिं त्या केला पै ॥ ८२ ॥ वसगडे ग्रामीचे धन्यजन । कोण तयाचे अनुष्ठान । जेथें राहिले भगवान । आनंदघन सर्वदा ॥ ८३ ॥ सर्व काळ आनंदमूर्ति । श्रीगुरुपदिं निमग्न असति । संसारभान कैचि स्मृति । प्रपंच पाहाति गुरुराय ॥ ८४ ॥ बाळांतपण सकळ सांग । करिते जाहाले श्रीराम अंगें । नवल चोज भक्तियोग । थोर भाग्य त्या सतिचें ॥ ८५ ॥ लक्ष्मणें करुनि बहुसेवा । रुणी केले श्रीराघवा । किंबहुना अवतार बरवा । घेणें माधवा यासाठीं ॥ ८६ ॥

जे जे भक्तें इच्छा धरणें । ते ते स्वयें आपण करणें । अर्जुनासाठिं नारायणें । सुभद्रा होणें निजअंगें ॥ ८७ ॥ यापरतें काय सांगणें । दासा अंकीत रघुनंदन । केलें येथें बाळांतपण । नसे जाण नवल तें ॥ ८८ ॥ नाम ठेविलें कृष्ण बाळा । अद्भूत जाहाला तो सोहळा । अन्नदान सकळिकाळा । तये वेळा करिति गुरु ॥ ९९ ॥ सहज स्थिति रघुनाथस्वामि । वास्तव्य केलें वसगडेग्रामीं । आनंदमूर्ति सेवाधर्मि । पाद पद्मिं भ्रमर ते ॥ ९० ॥ श्रीगुरुरायें बोलतां कांहिं । उत्तर नेदि सर्वथा हि । उच्चार करणें याचे ठाईं । स्वामि होये म्हणुनि ॥ ९१ ॥ नित्य उठोनि कृष्णेसि । आनंदमूर्ति जातसे नेमेसि । उदक आणावे स्नानासी । रघुपतीसी प्रेमभरें ॥ ९२ ॥ पूज्या द्रव्य अनेक । मेळवावी सकळिक । अर्चन करावें कौतुक । वेदोक्त निके यथाविधि ॥ ९३ ॥ शिव आराधनां शैव करिति । कीं वैष्णव विष्णु ते पूजीति । तयापरि आनंदमूर्ति । उपासिति सद्गुरुते ॥ ९४ ॥ भजन नृत्य प्रदक्षणा । जोडोनि पाणि साष्टांग नमना । करूणास्वरें रघुनंदना । करावें स्तवना सप्रेमें ॥ ९५ ॥ रघुनाथ स्वामि आनंदमूर्तिसि । ह्मणति छंद हा काय करिसि । अवघा चि भरला ऋपिकेशी । मजपाशि काय आहे ॥ ९६ ॥ पंच्यायतन देवपूजा । करावी हा मार्ग बोजा । नकळे समज कैसा तुझा । श्रीरघुराजा सकळ ठाईं ॥ ९७ ॥ आनंदमूर्ति नेत्र सजळें । श्रीरामाते विनविलें । सांडुनिया मच्छ जळ । उपास्य मलें नसे तया ॥ ९८ ॥ देवता स्त्रियेसी पतिप्राण । श्रीगुरुराया असे कवण । जननी जनका त्याग करून । नाहिं भजन पुत्रासी ॥ ९९ ॥ तैसें मज अनाथातें । कोण तारिल दुजें दैवत । स्वामिराया निज हृदयातें । बोच्याराते आपुल्या पै ॥ १०० ॥ न करा अव्हेर या दिनाचा । जन्मोजन्मिं अंकित साचा । श्रीगुरु वाचुनि देव कैचा । नवदे वाच्या आन दुजे ॥ १ ॥ ऐकोनि आपण आनंदमूर्तिचें । भरतें दाटलें निजकृपेचें । अलींगन दिधलें प्रेमाचें । केलें तयाचें समाधान ॥ २ ॥ धन्य तो ग्राम धन्य तो देश । पवित्र कुळ धन्य सद्वंश । जया उदरिं गुरु भक्तास ।

जन्म तयास कीति वर्णु ॥ ३ ॥ भागीरथि आदिकरूनि । सकळ तीर्थे तये स्थानीं । ऐसि बोले व्यास वाणी । धन्य प्राणि गुरुभक्त ॥ ४ ॥ इतर साधनें करुनि काय । तारक येक सद्गुरुपाय । जन्ममरण सरें अपाय । घडे उपाय आत्मप्राप्ति ॥ ५ ॥ गुरुभक्तामाजी वरिष्ठ । आनंदमूर्ति स्वामि श्रेष्ठ । अनन्युक्त येकनिष्ट । भजनीं निष्ठ श्रीगुरुपदी ॥ ६ ॥ काया वाचा मनेंसहीत । सेवाधर्मी सदा रत । न जाणे दुसरें दैवत । येका सद्गुरुवांचुनी ॥ ७ ॥ सत्सिष्य शिरोमणी । आनंदमूर्ति या मेदिनी । तोषवीला कैवल्यदानि । च्यापपाणी श्रीरघुवीर ॥ ८ ॥ पूर्विल कथा वसगड ग्रामि । हनुमंतरूप धरिलें रामी । सर्वज्ञ श्रोते ऐका तुम्हि । अंतरयामी येकाग्रते ॥ ९ ॥ गाई ब्राह्मण पाळनार्थ । घेणें अवतार श्रीरामातें । मारावया दैसातें । श्रीद सत्य हें चि पै ॥ ११० ॥ ते चि मूर्ति रघुनाथ स्वामि । स्थापावया स्वात्मधर्मि । आली असे इहिभूमि । निजप्रेमि विनटावया ॥ ११ ॥ यालागी रज धुळि करणें स्नाना । आवडि बहु रघुनंदना । नित्यनेम नटले जाणा । प्रातःर्मध्यान्हा साज वेळि ॥ १२ ॥ नगरद्वारिं पाषाण । पडला असे शूद्र पूर्ण । तेथें बैसे जगजीवन । रघुनंदन जगद्गुरु ॥ १३ ॥ ऐसे घडतां कांहिं दिवस । विचित्र वर्तलें ऐका सुरस । अवयवसहित त्या दगडास । मारुति जगदीश प्रगटले ते ॥ १४ ॥ हनुमंतमूर्तिचें श्रीरामदासें । वर्णियले ध्यान जैसें । तयापरि येथें दिसे । खूण योगेश जाणति ते ॥ १५ ॥ हाकार हनुमान तो जाहाला । सकार श्रीरामीं मिळाला । गुरुपुत्र जाणति अर्थाला । इतराला कथा हे ॥ १६ ॥ असो हनुमंत आणि रघुवीर । येक चि असे साचार । हे कळावया निर्धार । श्रीगुरु वरें नवल दाविलें ॥ १७ ॥ मारुति पुत्र वायोचा । पुत्रपिता अभेद साचा । मुनि गर्जति वेदवाचा । तेथें कैचा संशयो ॥ १८ ॥ वायो तेंचि निजस्फुरण । मूळमाया ते परिपूर्ण । पिंड ब्रह्मांड उद्भव जाण । अवघे ते धोन सचराचर ॥ १९ ॥ वायोवीर तो चिदाकाशीं । ठाई च ऐका परब्रह्मासी । म्हणुनिया श्रीरामासि । मारुतिसी अभेदता ॥ १२० ॥ आदी स्थापन त्या देवाचि ।

मग रचना सकळ देह्याची । माहाद्वार जाणा हे ची । मारुतीचि जेथें स्थिती ॥ २१ ॥ न कळतां तें निजसुख । जन्मासी येणें निरार्थक । ते चि असतां आपण देख । नाहि विवेक स्वरूपाचा ॥ २२ ॥ केवळ करूं जरि प्रगट । गगासि येतिल संत शिष्ट । जग ते आधि होईल चावट । म्हणुनि स्पष्ट राखिले पै ॥ २३ ॥ प्रत्यक्ष आतां वसगडे ग्रामीं । हनुमंतरूपें रघुनाथस्वामि । दर्शनमात्रें इहि भुमि । मुक्तनामि करितसे ॥ २४ ॥ संशय चित्ति असेल कवणा । तरि पाहावे जाउनि नैना । पूर्ण होतसे मनकामना । प्रचीत जाणा बहुतेका ॥ २५ ॥ मारुति सारिखें दैवत । दुजें नसे सृष्टिवरुतें । यदर्थि नसे कांहि भ्रांत । सत्य सत्य त्रिवाचा ॥ २६ ॥ इतर देवता जरि असति । तया चालक श्रीमारुति । मुख्य प्राण हा चि जगति । मुनि गर्जेति श्रुतिमाजि ॥ २७ ॥ जया करणें आत्महित । तेणें भजावा श्रीहनुमंत । ऐसे बोलति अनुभवव्येते । माहासंत शुकादि ॥२८॥ असो हनुमंतरूपें श्रीरघुनाथ । वसंगडे ग्रामि जन पाहात । वचन घेतले जे ग्रामस्त । सर्व सत्य तें केलें ॥ २९ ॥ साधुचरित्र नकळे कवणा । थकला अही पावला मौना । उभा केला पंढरीराणा । अद्यापी जाणा तिष्ठतो ॥१३०॥ जे जे बोलं स्वामी प्रति । ते ते साजे तया वितपति । संतस्वरूपें श्रीरघुपति । आनंदमूर्ति निजशेष ॥ ३१ ॥ श्रीगुरुभक्तिचा लाउनि ध्वज । जगदोद्धार केला सहज । प्रगटवीले निजात्मबीज । ज्ञान सतेज स्वयंज्योति ॥ ३२ ॥ कोण्हीयेक समई श्री रघुनाथ । आनंदमूर्तिसि बोध करित । स्वरूपानुभव जाहाला तूंते । अभेद सत्य गुरुशिष्य ॥ ३३ ॥ असो आम्ही तीर्थवासी । फार दीन राहिलों या स्थळासी । आतां जाणे दूर देशीं । वियोगासी न धरि तूं ॥ ३४ ॥ येऊं सत्वर यया ठाईं । क्षीत न धरणें सह्या हृदईं । अंतरबाह्य आपणा पाही । द्वैत नाहि सर्वा भूति ॥ ३५ ॥ ऐसें सांगुनि श्री रघुवीरें । अदृश्य जाहाले तेथें चि त्वरें । आनंदमूर्ति पाहातां बरें । जाहाले अंतर उद्विग्न तें ॥ ३६ ॥ रासक्रीडा करितां जैसे । गुप्त

जाहाले जगन्निवास । मग तया गोपीकास । दुःख जैसें पै जाहालें ॥३७॥ नातरि कौंडण्य ब्राह्मण । अनंतदर्शना हिंडे जाण । किंबहुना ध्रुवा लागुन । न पडे चैन हरीसाठीं ॥ ३८ ॥ तयापरि आनंदमूर्ति । मूर्छा येवोनि पडले क्षीतिं । वियोगदुःख न साहे ।चित्ति । जाहाली वृत्ति कासावीस ॥ ३९ ॥ त्रिपुत्र टाकोनि वसगडे ग्रामांत । हुडकीता क्रमिले नाना पंथ । जो जो प्राणी मार्गी पाहात । तया पुसत आनंद-मुर्ति ॥ १४० ॥ क्षुधा तृषा ते सांडिली । निद्रा कैचि असेल बुवळीं । रघुनाथस्वामिचे पदकमळिं । भ्रमरी जाहाली मनोवृत्ति ॥४१॥ रात्रदिवस न कळे कांहीं । निजध्यास लागला ह्रदईं । आनंत मूर्ति ठाईं ठाईं । अडखळोनि मही पडतसे ॥ ४२ ॥ अैसे होतां निर्वाण । स्त्री येक भेटली मार्गी जाण । सांगीतले तयेनें । वर्तमान सकळीक ॥ ४३ ॥ शंकराच्यार्य परमहंस । संकेश्वरीं मठ त्या असे । भेटले तेथें माहापुरुष । जाहाला संतोष दर्शनें ॥४४॥ यथायुक्त घ्यान जैसें । निरोपिलें होतें तैसें । आवर्षण काळीं मेघ वर्षे । जाहाले तैसें आनंदमूर्तिसी ॥ ४५ ॥ अति त्वरें लगवगेसों । उलंघीला मार्ग निशिं । क्षेत्र संकेश्वर तयासी । पोहचले त्वरेसी आनंद ॥ ४६ ॥ तेथें भेटतां श्रीरघुवीर । आनंदमूर्तिसि आनंद थोर । तयासी सृष्टिवर । न दिसे साचार यावया ॥ ४७ ॥ परि दृष्टांतेवीण काहि । अज्ञान जना कळत नाहिं । म्हणुनि युक्ति ते चि पाहि । ही नवाई गुरुकृपेचि ॥ ४८ ॥ संकेश्वरि रघुनंदन । आनंदमूर्तिसि दिलें दर्शन । मछालागी प्राप्त जीवन । तैसें जाण घडलें सुख ॥ ४९ ॥ नातरि गांजितां दुःशासनें । द्रोपदिसि भेटले श्रीकृष्ण । कीं अशोक वनिं हनुमान । जानकीनें देखिला तो ॥ १५० ॥ किंबहुना मधुवनिं ध्रुवासि । धुंडितां देखिले हरीसि । आनंद जाहाला जो मानसीं । वर्णन तयासि कोण करि ॥ ५१ ॥ आनंदमूर्तिसि श्रीरघुनंदनें । मही-वरोनि दिलें आलींगन । बा रे शिणलासी हुडकीतां वनें । तपोषणें बहु केलीं ॥ ५२ ॥ आनंदमूर्ति प्रेमभरित । अश्रुधारा नेत्रीं वाहात । शरीर जाहाले रोमांचित । अंग कापत थरथरा ॥ ५३ ॥

वारंवार नमस्कारीले । चरणकमळ हृदईं धरिलें । म्हणति अनाथा दुरि धरीले । दीनदयाळें गुरुमायें ॥ ५४ ॥ ऐसें स्तवीतां आनंदमूर्ति । हासे आले श्रीरघुपति । अंतर्बाह्य स्वरूपस्थिति । वियोगभ्रांति मानिली हे ॥ ५५ ॥ सकार स्वामि हकार शिष्य । हेतु जाणसी निजस्फुरणास । वाया चि मानिले द्वैतास । कोण अंश म्हणावा ॥ ५६ ॥ नाहिं दुसरें कदा काळिं । बरे दृष्टि करोनि न्याहाळी । लटीका दुहसी वियोगजळिं । आश्चिर्य नव्हाळि वाटते ॥ ५७ ॥ ऐकोनि विच्यार अद्वैत । आनंदमूर्ति कर जोडित । श्रीगुरुराया वीनवित । अनन्युक्त ते परियेसा ॥ ५८ ॥ जैसें सांगतां उद्धव गोपिसि ज्ञान । सुख न होय कदापि जाण । संतत जाहाले असे मन । पाहिजे कृष्ण भोगावया ॥ ५९ ॥ तयापरि आनंदमूर्ति । वोटे घाली श्रवणीं निगुति । न रुचे शास्त्र हे म्हणे रघुपति । प्राण जाति वियोग ॥ १६० ॥ प्रत्यक्ष टाकोनि साकार । निर्गुण ब्रह्म व्योमाकार । ते तो नावडे साचार । काय विच्यार करूं मी ॥ ६१ ॥ उदकीं उदक क्रिडों जातां । नाहिं सुख त्या सर्वथा । मोन जळिं वास करिता । तया सर्वथा आनंद ॥ ६२ ॥ तरि तूं माउली मी तान्हें । गोतुमीजवळी वछ लाहान । स्वामीराया जाणसी खूण । काय वचन बोलूं ते ॥ ६३ ॥ पाहोनि ऐसा दृढभाव । संतोषले श्रीराघव । हातिं धरिले श्रीगुरुदेवें । केला गौरव तयाचा ॥ ६४ ॥ मग निघाले रघुनाथ स्वामि । येते जाहाले वसगडे ग्रामिं । आनंदमूर्ति अंतर्यामि । असंत प्रेमी उचंबळले ॥ ६५ ॥ धन्य माउली जगन्माता । आनंदमूर्तिचि स्त्री तत्वता । अंकीं घेउनि कृष्णसुता । वाट पाहातां शीणलीसे ॥ ६६ ॥ कैचें अन्न कैचें उदक । मनामाजी रघुनायक । तीव्र अनुष्ठान होतां देख । पारणे सुख नेत्रांसि ॥ ६७ ॥ आनंदमूर्ति सहीत । पाहिले स्वामि श्रीरघुनाथ । निंबलोण देह्यभावाते । पतिव्रता ते करितसे ॥ ६८ ॥ नेत्रोदकें गुरुपाद लिंगा । अभिषेक करिते शुभांगा । शब्द सुमनें आमरंगा । अक्षईं अभंगा पूजीयेले ॥ ६९ ॥ जाहाले प्रसन्न श्रीरघु-

नाथ। कृपाबळें द्रवलें चित्त। ठेविला मस्तकीं वरद हस्त। पुत्रासहित उभयता ॥ १७० ॥ काष्टें फोडुन भ्रमर जाति। परि कमळिं त्या मोहिति। तयापरि श्रीरघुपति। वश्य भक्ति प्रेमळा ॥ ७१ ॥ धन्य साधुचरित्रलीळा। राजारामिं प्रसाद केला। स्वतसिद्ध प्रगट जाला। घनसावळा जगद्गुरु ॥ ७२ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ। श्रवणें चि पुरति मनोरथ। रघुनाथआनंदचरित्राते। अध्याय होत द्वितीय हा ॥ अनुक्रमें अध्याय बाविसावा ॥ २२ ॥

---

## ॥ अध्याय २३ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीराम समर्थ ॥ जयजया जी पूर्ण आद्या। परात्परा स्वसंवेद्या। आत्मयारामा जगद्वंद्या। भववैद्या सिद्धमूर्ति ॥ १ ॥ गणेश सरस्वति तूं चि येक। कुळदेवता श्रीरघुनायक। मातापिता नमिता देख। गेले दुःख सर्व हि ॥ २ ॥ सिद्ध चि उभा पंढरीसी। श्रीराम आज्ञा हृदयनिवासि। बोलवी संतचरित्रासि। दयाराशी जगद्गुरु ॥ ३ ॥ अवधान यावें येकाग्र श्रोतिं। अद्भुत कथा पावन जगतिं। मागील अध्याइं श्रीरघुपति। राहिले वस्ति वसगड्याते ॥ ४ ॥ आनंदमूर्ति सशिष्य। सेवेमाजी रात्रदिवस। काया वाचा मानस। करीति दास्य निजभावें ॥ ५ ॥ श्रीगुरुवाचुनि उपासना। ते तो वृथा चि अवघे जाणा। प्रवाहिं पडले जन्ममरणा। पुजीति पाषाणा भाव धरुनि ॥ ६ ॥ देहासि चि आपण ह्मणति। विसरोनि गेले आत्मप्रचिति। याचि साठि श्री रघुपति। धरिली स्थिति संतवेशें ॥ ७ ॥ शेष होऊनि आनंदमूर्ति। अवतरलासे इहि क्षिति। स्थापावया श्रीगुरुभक्ति। ज्ञानगभस्ति प्रगटला ॥ ८ ॥ सहजीं बोलति रघुनाथस्वामि। ते ते वचन स्वात्मधर्मि। जीव ऐकतां पावति उगमी। नाहिं भूमि जन्म तया ॥ ९ ॥ नाना

प्रकारें स्तविला शिव । निज आत्मता स्वयंमेव । दर्शनमात्रें नुरे भाव । कोण वैभव वर्णि ते ॥ १० ॥ कीर्तनसुखें सुखावला । श्रीराम स्वयें संत जाहाला । पंढरीसि गोपाळकाला । करि सावळा संगें तो ॥ ११ ॥ तें सद्गुरुत्व केतुकें वर्णावें । शेषादिका मौन का वे । कीर्तनीं उभे श्रीगुरुराव । श्रवणें जीव उद्धरति ॥ १२ ॥ अन्नशांति करणें मूर्ति । छंद फार हा श्रीरघुपति । जगत्रें मराठी कीर्ति । यश गाति जन सर्व ॥१३॥ नित्य जावोनि आनंदमूर्ति । भीक्षा आणीतसे परम युक्ति । ब्राह्मण भोजन करणे प्रीति । श्रीरघुपति आज्ञेनें ॥ १४ ॥ मुख ब्राह्मण देवाचे । ऐसे वेद बोले याचे । याळागीं सर्वदा द्विजाचे । आराधन साचें करावें ॥ १५ ॥ दुसरा अर्थ श्रोते जन । ऐका परम विचक्षण । जेणें करितां समता बाणे । द्वैत भजन होतसे ॥ १६ ॥ जितुके मुखे लोकत्रयीं । तितुके ठाईं ब्राह्मण पाहि । क्षेत्रि जाणिजे ते लवलाहि । स्थान देहिं बाहु त्या ॥१७॥ गुरु म्हणिजे वैश्य ते चि । पाईं वस्ती त्या शुद्राचि । ऐसे पाहातां च चहु वर्णाचि । व्याप्ति त्याचि ब्रह्मांडि ॥१८॥ याळागीं समस्त जीवाते । अन्नदान करावें निरूतें । मुख तितुके भगवंतें । ब्राह्मण निश्चित सांगितले ॥ १९ ॥ असो ब्राह्मण प्रिय भगवान । अवतरलासे रघुनंदन । साधुरूप खिकारून । जन पावन करितसे ॥ २० ॥ ठाईं ठाई निजसंत । तया भेटून प्रेम अद्भुत । भोगिते जाहाले श्रीरघुनाथ । अपरमित स्वानंदें ॥ २१ ॥ विषयानंदिं भ्रमले जग । तेणें कळवळले रमारंग । स्थापावया निजधर्म सांग । स्वानंद अंगें प्रगटविले ॥ २२ ॥ आनंदा स्वरूप पाहातां कैचे । परि नवल जाहाले कलित साचें । प्रत्यक्ष धारण देहाचे । केले नेमाचे भूठाईं ॥ २३ ॥ सच्चिद् पदाचा अर्थ । विंपन्न करिति पंडित । अनिर्वाच्य तो आनंद सत्य । कोण सांगत वाचेसि ॥ २४ ॥ ऐसा दुर्लभ आनंद जो कां । प्राप्त नोहे सदा लोका । जग चालिले सकळ नर्का । विषय क्षणिका भोगोनि ॥ २५ ॥ म्हणुनि आनंद मूर्तिमंत । प्रगटविला श्रीरघुनाथें । हें तों जाणति ब्रह्मवेत्ते । बाह्य कथे काय ऐकुनि ॥ २६ ॥ अवयव-

सहीत आनंदमूर्ति । मानवरूपें विलसे ज्योति । जैसि गार जग पाहाति । परि निश्चिति ते उदक ॥ २७ ॥ तैसे च येथें जाणिजे वर्म । देहिं च असतां साधु ब्रह्म । जगा न कळे पडला भ्रम । धरिति नेम पापाणि ॥ २८ ॥ नाभि च असतां कस्तुरी । मृग हिंडे वनांतरिं । येथें तैसी जालि परि । असतां हरि हृदईं तो ॥ २९ ॥ वर्णू जातां स्वसुख गोष्टि । हारपोनि जातसे जेथें त्रिपुटि । नित्यानंदि पडे मिठि । वृत्ति हींपुटि होतसे ॥ ३० ॥ रघुनाथस्वामि आनंदमूर्ति । वसगडे-ग्रामिं वास करिति । वेरळागंगा जेथें वाहाति । धन्य जगति ते क्षेत्र ॥ ३१ ॥ अनुभव घेऊन प्रेम सुखाचा । जगा दाविला मार्ग साचा । बोळला भेद आनंदाचा । चातक दिनाचा साहाकारी ॥ ३२ ॥ नाना संकटें वारिलीं । भवसिंधु पायवाट केली । धन्य कृपाळु गुरुमाउलि । केली साउली त्रितापा ॥ ३३ ॥ मग कांहिं काळा नंतर । प्रयाण आरंभिलें रघुवीरें । ऐकतां ते श्रोतें चतुरें । आयुष्य थोर होतसे ॥ ३४ ॥ बोलावणें सकळ संताते । धाडिते जाले श्रीरघुनाथ । पाचारूनि आनंदमूर्तिते । योगपीठ तें सिद्ध केले ॥ ३५ ॥ मुनिवृंदें पातली सकळ । सनक सनंदन प्रेमळ । मध्यें बैसले श्रीघननीळ । लोकपाळ श्रीरघुपति ॥ ३६ ॥ आनंदमूर्तिसि श्रीगुरुराजें । सांगितलें हृदगुज । संबोखोनि प्रिति सहज । ज्ञान सतेज अद्वैत ॥ ३७ ॥ अभय वचनें आनंदमूर्तिते । तोषविले श्रीगुरुनाथें । स्मरण करितां मी रघुनाथ । प्रगट त्वरित होईन ह्मणुनि ॥ ३८ ॥ परि जगदोद्धार जो राहिला । आनंदमूर्ति कारणें तुला । सिद्धी नेहणें मम वृत्ताला । न धरि मनाला वियोग तूं ॥ ३९ ॥ ऐसें सांगोनि सहज स्थिति । जड तनु त्यजिली श्रीरघुपति । प्रकाश दाटला संत पाहाति । मिनलि ज्योति परब्रह्मिं ॥ ४० ॥ घट फुटतां घटाकाश । अभेद ठाईंचे अविनाश । जाणें येणें कैचें त्यास । चिद्विलास गुरुवर्या ॥ ४१ ॥ परि अवतारचरित्र-लीला । दाखविली ते जगाला । डंका असे सुरु जाहाला । वैकुंठि भला 'चो आनंद ॥ ४२ ॥ नारद तुंबर गीत गाति । अप्सरा त्या

नृत्य करिति । विमानि बैसले श्रीरघुपति । द्रिष्टि पाहाति ते संत ॥४३॥ पुजाद्रव्य घेवोनि सर्व । धाविन्नला कमळोद्भव । उतावेळ सदासिव । दर्शनि भाव सुरेशा ॥ ४४ ॥ वर्णू जातां ते माहिमान । वृत्तिसहित हरपलें मन । सेविते जाले निरंजन । रघुनंदन माहाराज ॥ ४५ ॥ तये काळि आनंदमूर्ति । श्रीरामाते आठविति । दीनवदनें श्रमि होति । सद्गद चिति होउनि ॥ ४६ ॥ पाहुनि ऐशा विचाराते । प्रगट जाहाले श्रीरघुनाथ । सांगितला गुह्य वृत्तांत । राहे स्वस्थ ह्मणुनि ॥४७॥ मग उत्तर विधान शास्त्ररिति । करिते जाहाले आनंदमूर्ति । वृंदावन स्थापिले अति प्रीति । धन्य क्षिति ते स्थान ॥ ४८ ॥ क्षेत्र थोर तें ब्रह्मनाळ । जेथें राहिले वैकुंठपाळ । तेथिल अर्थ तो प्रांजळ । पाहातां सुकाळ आनंदाचा ॥ ४९ ॥ कृष्णा हरि तनु सत्य । आत्मा तेथें श्रीरघुनाथ । वृंदावन स्वरूपें जग पाहात । गुह्य अत्यंत योगाचे ॥ ५० ॥ नातरि क्षेत्र ब्रह्मनाळ । नाभिस्थान ते प्रांजळ । विधातियाचे जन्मस्थळ । वेदा सोज्वळ संगम तो ॥ ५१ ॥ वेदबाह्य क्रियाचरण । तेथें कैचा रघुनंदन । वेदा संगम स्वरूपि होणें । तेथें पाहाणें श्रीगुरूते ॥ ५२ ॥ किंबहुना नाभिस्थान । दशदळ म्हणति तया जाण । विष्णु दैवत तेथिल पूर्ण । जाणति खूण गुरुपुत्र ॥ ५३ ॥ दशवे द्वारिं तो चि उभा । व्यापुनि ठेला पंढरि नभा । अनुचाहि बोलिजे गाभा । फाकली प्रभा रघुनाथि ॥ ५४ ॥ असो आतां स्वसुख गोष्टि । श्रीरामस्वरूप कृष्णातटिं । वृंदावन समाधि पाहातां द्रिष्टि । पाप सृष्टि नुरे चि ॥ ५५ ॥ नाना समंध भूत बाधा । दूर होति व्याधि विपदा । अनन्य भावें स्मरतां पदा । सरे आपदा तात्काळ ॥ ५६ ॥ आनंदमूर्ति स्त्रि सुत । सेवा करिति येक चित्तें । न जाणति दुसरें दैवत । भक्ति सतत श्रीगुरुचि ॥ ५७ ॥ धन्य क्षेत्र पुण्य पावन । जेथें स्वामि वृंदावन । त्रिकाळ पुजा होतसे भजन । सदा कीर्तन ज्या स्थळिं ॥ ५८ ॥ वेद घोष नामपठण । नानाविध माहापुराणें । नित्य करावें अनुष्ठान । पुरश्चरण गुरुभक्ति ॥ ५९ ॥

भीक्षा आणुनि शुद्ध बरवी । श्रीरामाते समर्पावी । आतिथि दिनें जेववावि । नित्य करावी आराधना ॥ ६० ॥ नाहिं राहिलें कांहिं अन्न । तरि करावे उपोषण । येकात्मता तिघे जण । आनंदघन त्रि सुत ॥ ६१ ॥ प्रदक्षणा नमस्कार । श्रीगुरुगीता मनोहर । अनेक स्तोत्रे बहु प्रकार । नाम गजर सर्वदा ॥ ६२ ॥ देहभान प्रपंच कैचा । नामोच्चार गर्जति वाचा । सर्वां भूतिं राम चि साचा । हा चि ज्याचा स्वानुभव ॥ ६३ ॥ स्वरूपानुसंधान अखंड स्थिति । आनंदमूर्ति जे बोलति । ते ते अभंग पदें होति । स्तवनोक्ति सहजी ते ॥ ६४ ॥ कवन प्रसाद पडतां कर्णि । जीव पावति आत्मसदनि । शब्दानुग्रह सिद्ध वाणि । भवतारिणि नौका ते ॥ ६५ ॥ श्रीगुरुभक्तामाजि वरिष्ठ । आनंदमूर्ति स्वामि श्रेष्ठ । सद्गुरुचे पद संपुष्ट । बागवी निकट संबाळित ॥ ६६ ॥ प्रत्यहिं करावें तें चि पूजन । नसे चि ठाउके दैवत आन । मंतर घ्यावे उदक अन्न । ऐसा पूर्ण नेम तो ॥ ६७ ॥ गुप्त आराधन करणें प्रीति । भाविक स्वामि आनंदमूर्ति । वश्य केला सीतापति । तिष्टे प्रीति मागें पुढें ॥ ६८ ॥ कोणी येक समई आषाढिसी । संत चालिले पंढरीसि । आपण निघाले अति त्वरेसी । ज्ञानराशि भजन करित ॥ ६९ ॥ भगवान सांगति सर्वांते । यात्रेसि येतात गुरुभक्त । धन्य भाग्य आमुचें सत्य । जाऊं तयाते सामोरे ॥ ७० ॥ नारदादि सकळ शिष्ट । येते जाहाले अर्धे वाटे । गरुडासहित श्रीवैकुंठ । आले निकट जवळ पै ॥ ७१ ॥ आनंदमूर्ति स्वामिनि । मीठि घातलि भगवंतचरणि । श्रीहरिनें आलींगोनि । गोष्टि वचनि आरंभिल्या ॥ ७२ ॥ मागें पुढें संतमेळा । मध्यें श्रीरंग चाले सावळा । हाति धरिले करकमळा । आनंद बाळा उथळाहि ॥ ७३ ॥ पंढरिसि नाचत संतमेळि । पांडुरंग पातळे राउळि । कीर्तन करिती तये वेळि । श्रीवनमाळी स्मरोनि ॥ ७४ ॥ जयजयकार अवघा जाहाला । सांग विधि गोपाळकाला । जगीं आनंद उचंबळला । संतोषला सुरगण तो ॥ ७५ ॥ आनंदमूर्तिसि श्रीविठ्ठलें । सांगितले गुह्य सकळ । रघुनाथस्वामी मि च प्रांजळ ।

ठाउक केवळ तुजलागी ॥ ७६ ॥ मग आलिंगन पांडुरंगें । आनंदा दिधले सप्रेम अंगें । घालवीत आले श्रीरंग । क्षेत्रभवभंग ब्रह्मनाळा ॥ ७७ ॥ येकात्मता श्रीराम वीठल । समाधिस्त राहिले निश्चळ। कृष्णा वेदा संगम मेळ । होतसे डोल वृंदावना ॥ ७८ ॥ दर्शनें चि निरसति व्याधि । जन्ममरण सरे उपाधि । संसार असतां न बांधि । आत्मसिद्धी तात्काळ ॥ ७९ ॥ आनंदमूर्ति निजभावेंसि । सेवा करिति अहर्निशि । रघुनाथस्वामि तयापासि । स्मरतां मानसीं प्रगटत ॥ ८० ॥ कोणिहृ येक समईं वडगांवीं । गुरुभक्त जयराम गोसावी। पुण्यतिथि करितां बरवी । आले स्वानुभवी सकळिका ॥ ८१ ॥ तये काळि आनंदमूर्ति । वटग्रामा पातले निश्चिंति । तेथें जाहाली उत्कृष्ट कीर्ति । ऐकीजे श्रोति ते सर्व ॥ ८२ ॥ रामदासस्वामि आदिकरूनि । साधु मीळाले तये स्थानिं । अैकता तिं नामें कर्णि । पातका धुणि होतसे ॥ ८३ ॥ श्रीरंगनाथ आत्यासहित । केशवस्वामि परम विख्यात । तुकया थोर महा समर्थ । जाहाले येते वटग्रामी ॥ ८४ ॥ षामन पंडित शिष्ट मले । निरंजन गाणपत्य ते हि आले । आणिक सांगतां नामें प्रांजळ । असंख्य मळे वैष्णव ते ॥ ८५ ॥ नाना शास्त्रि वैदिक । चतुर्वेदि पुराणिक । तीर्थवासी अनेक । आले देख प्रसादा ॥ ८६ ॥ देशोदेशिचे द्विजवर । यात्रा मिळाळि अपार । कीर्तनकरते बहु सुंदर । अग्नहोत्री बहु विप्र ॥ ८७ ॥ अन्नदान सर्वां भूर्ति । विप्र-समुदाय बैसल्या पंक्ति । अनुक्रमें सर्वां वाढिति । यथापद्धति करोनि ॥ ८८ ॥ तव तेथें येक ब्राह्मण । ज्याचा नेम गीतापठण । ध्यावयासि प्रसाद जाण । आला निघोनि निज आवडि ॥८९॥ त्वरेनें निघतां लगबगेसी। विप्र विसरला पुस्तकासी । सांगीतले जयरामस्वामिसि । श्रीगीतेसी विसरलो घरिं ॥९०॥ वाचिल्यावीण ते गीता । अन्न ने घे मी सर्वथा। जरि पोथी मिळेल आता । तरि सर्वथा भोजन घडे ॥ ९१ ॥ जयराम-स्वामी तया सांगति । स्नानासि गेले आनंदमूर्ति । सोडुनि घेई गवळ्या प्रति । असेल पोथि श्रीगीतेचि ॥ ९२ ॥ शीघ्रगति वाचुनि बरवे ।

मागुति बाधुनि ठेवावें । वाढावया घेतले सर्व । न करि भूदेव तूं खोळंबा ॥९३॥ ऐकोनि जयरामस्वामिचें वचन । गवाळे सोडिले तया ब्राह्मणें । विचित्र वर्तले तेथें जाण । प्रेमळ जन परिसोत ॥ ९४ ॥ श्रीरघुनाथ-स्वामिचे चरण सतुष्ट । आनंदमूर्ति पूजिति स्पष्ट । तयावीण आणिक गोमटे । नसे श्रेष्ठ दुजे जया ॥ ९५ ॥ नेणे गीता पंचायतन । देवता येक पादुकार्चन । गवळ्यात सवळिमाजि घालून । वागवी पूर्ण निजभक्ति ॥ ९६ ॥ नसे कवणाते ठाउक । गुप्त आराधन करिती देख । आनंद-मूर्ति निःसीम भाउक । उपासक श्रीगुरुचे ॥ ९७ ॥ खूण करुनि गवळ्यासि । गेले असति स्नानासि । लक्ष अवघे पादुकापासि । नाहिं मानसीं दुजें तें ॥ ९८ ॥ तेव्हा इकडे काय जालें । गवाळे त्या द्विजें सोडिले । गुरुभक्तिचे सामर्थ्य वहिले । गीता जाहाले चरण सपुष्ट ॥९९॥ अवलोकन करिता ग्रंथाक्षर । समाधिस्त जाहाला विप्रेंद्र । आत्मस्वरूप साक्षात्कार । घडला विच्यार सहजी तो ॥ १०० ॥ त्वरा करोनि ब्राह्म-णाते । जयरामस्वामि वाचा म्हणत । पात्रें वाढलीं समस्त । पठण तें करा वेगि ॥ १ ॥ तव लाटस्तता नेत्रालागी । चळण वळण कैचे आंगि । वृत्ति पहुडली निजरंगीं । स्वरूप अभंगीं तन्मयता ॥ २ ॥ जयराम स्वामि जवळी आले । द्विजालागि अवलोकीले । तात्काळ मनिं समजले । उदक स्पर्शिले नेत्राशि ॥ ३ ॥ ब्राह्मण बोले गीता वाचितां । येकायेकी हो अवस्था । माझा मी च आत्मा आईता । नाहिं वार्ता दुजयाचि ॥ ४ ॥ गीता नव्हे तींहि अक्षर । प्रत्यक्ष दिसतसे जानकीवर । अनुग्रह जाहाला साचार । काय विच्यार सागू तो ॥ ५ ॥ उमस खाऊ नेदि क्षण । अवघे व्यापिले चैतन्य । आतां कैचे गीतापठण । जाहालें मन उन्मन तें ॥ ६ ॥ सकळ यात्रा आश्चिर्य करिति । तव पातले आनंदमूर्ति । ह्मणे माझि सुटली प्रधी । गवळ्याप्रति सोडिलेते ॥ ७ ॥ अधोवदन खालीं पाहात । केला सप्रस्न प्रणीपात । अपराध घाला पोटांत । ऐसे बोलत सर्वांसि ॥ ८ ॥ पादरक्षा श्रीस्वामिच्या । पूजन करितो नित्य साचा ।

भ्रष्ट असे मी ठाईंचा । स्पर्श चर्माचा नित्य मज ॥ ९ ॥ सांगतां वृतांत आनंदमूर्ति । सद्गद जाहाले जयराम चित्तिं । संतमंडळी स्तवन करिति । विप्र वंदिति सकळीक ॥ ११० ॥ वैदिक विलक्षण पंडित । अनुताप जाहाला तयाते । व्यर्थ चि निंदितो संताते । लीला अद्भुत साधुचि ॥ ११ ॥ कोणियेक लागले परमार्था । वैराग्य जाहाले प्राप्त बहुता । अभिमानें नाडिले स्वहिता । ऐसे समस्ता वाटले पै ॥ १२ ॥ आनंदमूर्ति लीनभावें । नमस्कारिति विबुध सर्व । मज पामरासि गौरव । स्तुति वैभव कासया ॥ १३ ॥ सर्वत्र तुह्मी श्रीगुरुमूर्ति । कांहीं च नेणे मी मंदमति । ज्ञान वैराग्य नाहिं भक्ति । न कळे स्थिति सर्वथा ॥ १४ ॥ समर्थ श्रीरामें नवल केलें । निजश्रीदासि रक्षियेले । धन्य धन्य ती स्वामिपाउलें । भक्तवत्सल दयानिधि ॥ १५ ॥ ऐसें परस्परें स्तवन करित । आनंदमूर्ति सकळ संत । भक्ति प्रिय श्रीरघुनाथ । धन्यमान तयासि ॥ १६ ॥ पाहा पाहा नेणता विरिंचि । वत्सहरण केली देवाचि । तये वेळि स्वयें अंगाचि । आपण चि जाहाले सर्वत्र ॥ १७ ॥ गोपाळ गाई वासुरे । स्वभाव आकृति वर्ण सारे । तयाचे ते अलंकार । लाहान थोर पादरक्षा ॥ १८ ॥ उणे नसे कांहिं येक । अवघे चि नटले रमानायक । काय बोलूं मी कौतुक । चतुर्मुख विस्मय करि ॥ १९ ॥ तैसि च येथें गोष्ट घडली । जोडियाचि गीता जाहाली । पूर्ण कृपाळु गुरु माउली । करि साउली निजदासा ॥ १२० ॥ असो जयराम स्वामिनि पुण्यतिथि । सांग केला उत्छाहा निगुती । प्रसाद वाटिला सर्वांप्रति । बोळवीति नमन करूनि ॥ २१ ॥ आनंदमूर्ति स्वस्थानाते । आले ब्रह्मनाळ क्षेत्राते । वृंदावन स्वरूप श्री रघुनाथ । उपासीत तया सर्वदा ॥ २२ ॥ सर्वकाळ व्रतस्त असणें । अवस्थात्रई अखंड ध्यान । निजानंदीं रंगले मन । रघुनंदन सर्वत्र ज्या ॥ २३ ॥ कैसा हि प्राणि भेटतां । समाधान करणें तत्वता । मनोभंग न घडे सर्वथा । हे चि समता गुरुपूजन ॥ २४ ॥ समान दया भूतमात्रीं । राम चि दिसे जया नेत्रीं । स्वानंद राणिव येत्र

छत्रि । आवघी धरत्रि परमात्मा ॥ २५ ॥ निर्विकल्प अभेद भक्ति । तेथें कैचि दिवाराति । श्रीरामपदिं रंगलि वृति । आनंद चिचि पूर्ण तो ॥ २६ ॥ रामजयंति तव पातलीं । साधु वृंदें मिळति जालि । अठरा पर्गे वाजर मेळी । देती आरोळी रामनामें ॥ २७ ॥ मध्य सिंव्हासनीं वृंदावन । तो चि जाणा जानकीजीवन । उत्साहविधी ऐकता श्रवण । तात्काळ जाण मुक्ति वरि ॥ २८ ॥ देह चतुष्टय कर्दळी स्तंभ । मखर बांधिले असे स्वयंभ । अवस्था त्रयि विलक्षण शोभे । तूर्यानम प्रभावळि ॥ २९ ॥ त्रिकुट श्रीहाट गोल्हाट । पुढें जाणिजे औठपीठ । पुण्यादि वस्तुते स्पष्ट । भ्रमरनिष्ट गुंफाते ॥ १३० ॥ ब्रह्मरंध्रि निजासन । तेथें माझा जानकीजीवन । सोहं मंत्रे स्थापीला पूर्ण । रघुनंदन सहजी तो ॥ ३१ ॥ वाद्यें वाजति अनुहत ध्वनि । माहाद्वारिं निशिदिनि । मंडप घातिला चिद्गगनिं । पाहाता नैनि सुख वाटे ॥ ३२ ॥ मुक्त घोष लोंबति अमुप । कर्पूरादि लागले दीप । स्थळोस्थळिं करिति जप । अजपाजप गायत्री ॥ ३३ ॥ रंगवल्लि सुलक्षण । द्विज करिति वेदाध्ययन । ऋग्यजुसाम जाण । अथर्वण ते मांत्रीक ॥ ३४ ॥ रामायण बहु प्रकार । वाचिताति निरंतर । माहा भागवत सुंदर । अत्यादरें पठण करिति ॥ ३५ ॥ नाना माहात्में पुराणें । ठाईं ठाईं अवर्तन । श्रीरामकीर्ति वर्णिति जाण । विद्वज्जन आत्मवेत्ते ॥ ३६ ॥ कीर्तन माहात्म वर्णू जातां । वाच्या पावति तन्मयता । कीर्तनरंगीं उभे तत्वता । रंगनाथादि सर्वत्र ॥ ३७ ॥ ते वगनुत्व अबोलणें । शिवादिक करितां श्रवणें । जिवाते न करवे लेखन । क्षेत्र धन्य ब्रह्मनाळ ॥ ३८ ॥ कोण प्रेम या आनंदमूर्तिचे । दैवत वोळलें वैकुंठिंचें । वृंदावन डोलत असे साचें । रामनवमीचे दिवसीं पै ॥ ३९ ॥ दश इंद्रियें येकवटली । दशरथ जाणा ते चि बोली । कौशल्या ते सहजी जाहाली । गुरुमाउली पराते ॥ १४० ॥ अद्भुत कौशल्य जियेचे । ब्रह्मादि देव प्रसवली साचे । नये वर्णितां सहस्र वाचें । जेथें मनाचें उन्मन पै ॥ ४१ ॥

श्रीरघुनाथ स्वामिसी तेणें। स्नेहें तोषविले असे जाण। म्हणुनि ग्रंथि केलें कथन। प्रेमळ पूर्ण यालागीं ॥ ४२ ॥ प्राचिन तेथें स्थान जयाचे। उभय वृंदावना जवळि साचें। दर्शन घेति तयाचे। पुरति जीविचे अर्थ पै ॥ ४३ ॥ असो जे जे सद्गुरुसि। शरण गेले निजभावेशि।' तयाचे ते वैभवासि। सहस्र मुखासि न वर्णवे ॥ ४४ ॥ सद्गुरु सारिखें दैवत। नसे चि पै श्रृष्टि वरुते। सर्व शास्त्रि हा सिद्धांत। करी सनाथ गुरुभक्ति ॥ ४५ ॥ लघु भक्ति इतर जाणा। नाना दैवत उपासना। कृष्णमूर्ति योगीराणा। विनटला चरणा श्रीगुरुचे ॥ ४६ ॥ रघुनाथस्वामि आनंदमूर्ति। उभयवृंदावनें अति शोभति। कृष्णातटाके चि चिन्मय स्थिती। संगम निगुति वेदेचा ॥ ४७ ॥ दर्शन होतां समाधिचें। तात्काळ जीवा शिवपद साचे। दैन्य जाय जन्मांतरिचे। अज्ञानाचें दरिद्र ते ॥४८॥ कृष्णपुत्र आनंदमूर्तिचा। थोर प्रताप जयाचा। कळस जाहाला ज्ञानाचा। श्रीगुरुचा भक्तिध्वज ॥ ४९ ॥ निशिम भावना वृंदावनीं। त्रिकाळ नेम पूजाभजनिं। भूतमात्रि अन्नदानि। तोषवी जनिं सर्वात्मा ॥ ५० ॥ पूर्वानुक्रमें श्रीरामजयंति। कृष्णस्वामि उत्छाह करिति। रघुनाथस्वामि आनंदमूर्ति। डोल करिति वृंदावनिं ॥ ५१ ॥ प्रेमानुभव दावयासि। अवतरले श्रीअयोध्यावासी। डोल तयाचा वृंदावनासि। मृत्यु लोकासि भूठाई ॥ ५२ ॥ शिवरात्रिसि प्रेम अद्भुत। रघुनाथस्वामिसि ते उचंबळत। वृंदावनीं डोल होत। दोन प्रहरांत माध्यान्हि ॥ ५३ ॥ भाविकासि प्रत्यक्ष दर्शन। स्वयें देत रघुनंदन। ब्रह्मानंदि बुडे मन। वृंदावन पाहातां चि ॥ ५४ ॥ व्यास भगवान शुकाप्रति। बोलवीते जाहले जातां पंथि। प्रतिवचन वृक्षा हाति। सर्वाभूति देति ते ॥५५॥ परि तीं झाडें सचेतन। येथें घडेल अपूर्व जाण। प्रत्यक्ष पाहातां जड पाषाण। डोलति पूर्ण कलीमाजि ॥ ५६ ॥ बौध्य अवतार धरियेला। देव न दिसे या जगाला। यालागि डोल आरंभिला। पाहातां मनाला सुख होय ॥ ५७ ॥ आब्रह्मस्तंभपर्यंत। आपण चि नटले श्रीगुरुनाथ। हें कळावया प्राणियातें। डोल होत अचेतन ॥ ५८ ॥ कीं कलीमाजि

कीर्तनधर्म । तेणें नावरे श्रीरामा प्रेमा । यास्तव जाणिजे डोळ नेम । होतसे परम वृंदावनिं ॥ ५९ ॥ किंबहुना श्रीरघुनाथ स्वामि निजधामासि । गेले वाटेल या जनासि । म्हणोनि डोळ स्थावरासि । वृंदावनासि होतसे ॥ ६० ॥ जे जें बोलं सद्गुरुसि । तें तें शोभे निश्चयेसि । कां जे प्रगटलें हृदयेसि । सिद्द विलासि माहाराज ॥ ६१ ॥ अनेक लीळा बहुत कांहीं । वर्णूं जातां न पुरे शाई । सहस्रमुखें थकला अहि । शास्त्रें साहि वेदादिता ॥ ६२ ॥ सुचलें तितुकें लिहीलें ग्रंथिं । न्युन्य पूर्ण करा प्रीतिं । निर्गुण भूमि ते निश्चिति । उदक जगति आदिगुरु ॥ ६३ ॥ रघुनाथस्वामि निजबीज । आनंदमूर्ति कोंब सतेज । फुटले अंकुर तेथोनि सहज । कृष्णराज तयाचा ॥ ६४ ॥ शाखा पल्लव ते वोंप संतति । विस्तीर्ण वृक्ष वाढला निगुति । जीवन घालितां मुळाप्रति । टवटवीति फांद्या ते ॥ ६४ ॥ * कां ते सविता वोवाळिता । ते चि कीर्णांते समस्ता । तैसें स्तवन सर्वथा । गुरुभक्ता अनुक्रमें ॥ ६६ ॥ श्रीरामअवतार रघुनाथस्वामी । जाहला असे इहीं भूमी । कादावया विषय कर्दमीं । जीव कर्मि लोळती त्या ॥ ६७ ॥ सेवाधर्मी परम रत । अवतारला तो सुमित्रासुत । स्थापोनिया निजधर्मांते । गुरुभक्तिते वाढविले ॥ ६८ ॥ विषयानंद क्षणेक । तेथें चि गुंतले सकळ लोक । ब्रह्मानंद अलोलिक । प्राप्त सुख नव्हे ते ॥ ६९ ॥ केला तयाचा सुकाळ । वितळुनि गेले माया-पडळ । स्वानंदीं रंगले केवळ । गेली तळमळ जीवाची ॥ ७० ॥ यास्तव नाव आनंदमूर्ति । आनंद केला सर्वांभूतीं । निज्यानंदीं रमिले वृत्ती । स्वयंज्योति परिपूर्ण ॥ ७१ ॥ सद्गुरु रामदास अवतार सित्य । जगदोत्धार पुन्हा प्रसित्ध । धारण केले जेणें जेणें शुत्ध । वत्सलांछन पद निजअंकीं ॥ ७२ ॥ युगायुगीं मी तयाचा । अंकीत म्हणवीतसे साचा । श्रीकृपे त्या आज्ञोक्तिचा । वेदवाच्या ग्रंथमंजिरी ॥ ७३ ॥ जे जे जयाची कामना । ते ते पुरवि आयोध्याराणा । वर दिधला असे जाणा । सकळ जना या ग्रंथीं ॥ ७४ ॥ श्रवणपठणें ते चि फळ ।

---

* मुळ पोथीत ६४ आकडा पुन्हा घातला आहे.

मनन होतां प्राप्त मंगळ । निजध्यासें आत्मा केवळ । होणें प्रांजळ श्रीराम ॥ ७५ ॥ साक्षात्कारें आनंदमूर्ति । भरोनि ठेला भंत जगति । ते चि समाधि सहजस्थिती । खुंटली गती भेदाची ॥ ७६ ॥ ज्ञानपीठ हे पंढरी । आत्माराम विटेवरी । भावें पुंडलिकाचे तिष्टे द्वारीं। हृदयमंदिरीं प्रगटला तो ॥ ७७ ॥ धरोनि नाना संतवेश । निजात्मधर्म स्थापितसे । मारावया दुर्जनास । कामक्रोधादिक असुरादिका॥७८॥ सिध्धनाथस्वामीनि निजरूपें । गुंफविले आख्यान हे चि पुष्प। भक्तमंजरीमाळा अमुप । पदक स्वरूप स्वामाजी ॥ ७९ ॥ शुध्द भक्ति वाचे हातीं । रघुनाथस्वामी आनंदमूर्ति । चरित्र सुमनें अभेदयुक्ति । अर्पिले प्रीति राजारामीं ॥ ८० ॥ आतां यावरी केशवस्वामींचें। आख्यान वदविती स्वामी वाचें । श्रवणें दैन्य जाय जीवाचें । प्राप्त साचें अक्षइ पद ॥ ८१ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती सकळ अर्थ । रघुनाथस्वामी आनंदकथे । अध्याय समाप्त चतुर्थ ॥ ८२ ॥ अनुक्रमें अध्याय चोविसावा ॥ २४ ॥

---

## ॥ अध्याय २५ वा ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु जय देवा । सिध्द स्वामीया श्रीराघवा । भक्तवत्सला करुणार्णवा । आद्य केशवा नमन तुज ॥ १ ॥ जगद्व्यापका निर्विकारा । लक्षातीत सर्वेश्वरा । पंढरीनिवासा रुक्मिणीवरा । दासचकोरा रामचंद्रा ॥ २ ॥ सुंदरस्वरूप मेघःशामा । चित्तचातका विश्रामा । वेद विरिंची शिव उमा । नेणे महिमा अगाध तो ॥ ३ ॥ नाम रूपातीत स्वरूप । वर्णूं जातां शेष धापे । तेथें इतर काय जल्पे । लीला अमुप स्वामीची ॥ ४ ॥ चतुर्विध वाचे गट । वृत्ति समूळ होतसे गट । आहं सोहं भरला घोट । उदेले निट आत्मत्वते ॥ ५ ॥ असो ऐसिया गुरुवर्या । अचळ

अढळा चित्सूर्या । इंद्रियोकमळे विकासिया । प्रकाश हृदया करीसी तूं ॥ ६ ॥ तेणें स्वछं दाही दिशा । अज्ञान तम गेली निशा । अंतर्बाह्य पूर्ण दशा । काय सित्धेशा स्तऊं तुज ॥ ७ ॥ तरी आतां हें चि मागणें । संतलीळा वदवी गुणें । दीना हातें पूज्या घेणें । वाग्सुमनें दयाळा ॥ ८ ॥ विनवणी परिसोनी कृपादानी । बोलविती ग्रंथ वाणी । सित्धस्वामी स्वानंदखाणी । वरदपाणी श्रीरघुवीरा ॥ ९ ॥ ऐकतां तें कथन सुंदर । प्राप्त होती मोक्ष चार । भक्तमहिमा अपार । नाशी गिरीवर पातकाचे ॥ १० ॥ श्री जयदेव स्वामीचा अवतार । जाला असे महीवर । ते कथा अतिपवित्र । श्रवणें श्रोत्र निविती पै ॥ ११ ॥ जयदेवासी अवतरणें । न्हावया पै हें चि कारणें । भगवंताचे गातां गुण । न पावे मन तृप्तीसी ॥ १२ ॥ याळागीं पुन्हा घेउनि जन्म । आराधिला पूर्ण काम । ते ऐकतां धरुनि प्रेम । पाविजे धाम परम ते ॥ १३ ॥ आत्मारामपंत कल्याणकर । देश लेखक ब्राह्मण थोर । स्त्री जयाचि अति पवित्र । गंगा सुंदर नाम तयेचें ॥ १४ ॥ ऋग्वेदी तो माहाभक्त । वरद विष्णुते उपासित । पंढरिचा प्रेमा बहुत । अनुग्रहित संताचा ॥ १५ ॥ सत्पुत्र व्हावा संत वोंशी । हेचि इत्सा उभय मानशीं । नाहींतरी आपणाशी । संतान हरिशी नको म्हणती ॥ १६ ॥ ऐसा संकल्प धरूनि मनीं । वरदराज घ्याती निशीदिनी । ऐशि वर्षे स्त्रीयेसी होउनी । वृधाप्य जनीं प्राप्त जाह्याले ॥ १७ ॥ तो हेतु आवणें सित्धी । कळवळले हरी कृपानिधी । जयदेवासि त्रिशुत्धी । स्वानंदाब्धि जन्मविती ॥ १८ ॥ स्वप्नें प्रगटोन वरदराजें । तीर्थ प्रसाद केला सहज । पोटासि येती जयदेव माहाराज । ऐसें गूज सांगीतले ॥ १९ ॥ मग तात्काळ ती सौभाग्यसुंदर । जाहाली माता गरोदर । उदरीं आले वैष्णव वीर । भक्तथोर जयदेव ते ॥ २० ॥ नाहिं देहाची उरली स्मृती । भगवद्भजनीं रंगली वृत्ती । सोहंभावें दिवा राती । जाली सती तन्मय ती ॥ २१ ॥ नउ मास होतां चि पूर्ण । प्रसवली पुत्र गुणनिधान । जयासि पाहातां निवती नैन । आंगीं लक्षणें पहिली तों

॥ २२ ॥ आम्नानोक्त प्रथम नाम । तें चि ठेविलें तयासि प्रेम । जेणें सांग सकळ कर्मे । भव भ्रम चुके पै ॥ २३ ॥ तया केशवासि उन्मनी ते । माळ घातिली धरिलें मौन । पांच वर्षे पर्यंत जाण । कवणा भापण करीना ॥ २४ ॥ तये काळीं तयाचा पिता । प्राप्त जाला तयासि चिंता । म्हणे काय करूं मुक्या सुता । जन्म वृथा गेला कीं ॥ २५ ॥ श्रीपांडुरंगासि नानापरी । अनन्य भावें नवस करी । तये काळीं तो मुरारी । संकट निवारी दासाचें ॥ २६ ॥ शंकराच्यार्य रूपें येउनि घरा । बोलिले तया केशवकुमरा । मस्तकीं ठेउनि वरद करा । कर्णि मंत्रा उपदेशिले ॥ २७ ॥ जागृत करुनि वाच्या वैखरी । तुर्यावस्थेचे आणिले मंदिरीं । येउनि सहजी देहावरी । जगदोध्दारी प्रवर्तले ॥ २८ ॥ मग पांच वर्षा नंतर । भापण करिती श्रीगुरुवर । तये काळीं माता पितर । संतोष फार जाहाला तया ॥ २९ ॥ व्रतबंधादि लग्नसोहळा । केशव स्वामीचा यथोक्त जाला । तो विचार अपूर्व लीला । क्रम घडला ऐक तो ॥ ३० ॥ श्रीधरपंत सबनीस । होते परम भाविक पुरुष । सूर्य उपासक निःशेष । तयासि जगदीश सांगती पै ॥ ३१ ॥ म्हणती केशवास करितां कन्यादान । तेणें होसील तूं पावन । जयदेवाचा अवतार पूर्ण । केशव ब्राह्मण पवित्र पै । ॥ ३२ ॥ पद्मावतीचा अंश । तुझी कन्या ते निर्दोष । म्हणुनि अर्पि सर्वस्वें । आंदणास देउनी ॥ ३३ ॥ श्रीधरपंतासि श्रीधरानीं । सांगतां जाऊनि ऐसें स्वप्नीं । उल्हास होउनि अंतःकर्णीं । अर्पिली नेउनी कन्या ते ॥ ३४ ॥ पुढें जन्मांतरयोगानें । उभयता करिती श्रीकृष्ण-ध्यान । अहोरात्र कीर्तन भजन । निरोपण निरंतर ॥ ३५ ॥ नाहीं देहाचि श्लाघ्यता । वैराग्य बाणोनि गेलें चित्ता । ज्ञान तेथें जोडुनि हात । तिष्ठे सर्वथा मोक्षपाईं ॥ ३६ ॥ युगायुगीं चक्रपाणी । जय-देवानें केला रुणी । तो चि माहाराज अवतार जनीं । भावार्थ खाणी केशव तो ॥ ३७ ॥ याजागीं प्रत्यहिं विष्णुमूर्तीनें । हार आपुल्या गळ्यांतील काढुन । केशवस्वामीस करावा अर्पण । तेव्हां भजन

दूर करावे ॥ ३८ ॥ ऐसें होतां कांहीं दिन । फाकलें सर्वत्र वर्तमान । मिळूं लागले सकळ जन । पाहाति नयनीं चमत्कार ॥ ३९ ॥ असंख्य यात्रा मिळती जाली । दिगांतरासी कीर्ती गेली । म्हणति असतां अघोर कली । भूमंडळीं अवतार हा ॥ ४० ॥ नरनारी अनुतापयुक्त । दर्शनास यती होउनि विरक्त । तात्काळ होती जीवनमुक्त । वरदहस्त ठेवितां शिरीं ॥ ४१ ॥ ऐशा प्रकारें अनंत जीव । उद्धरिले त्या संत केशवें । तये काळीं अभिनव । जाहालें अपूर्व तें ऐका ॥ ४२ ॥ देशाधिकारी यवन । तयानें ऐकिले वर्तमान । केशवस्वामीस श्रीभगवान । हार काढून देतसे पै ॥ ४३ ॥ हे तों गोष्टी काय कळेना । न घडे सर्वथा भोंदु संत । ऐसें आणून तेणें मनांत । छळणातें आरंभिले ॥ ४४ ॥ अविंद येउनि देवाळईं । दुरोक्तिनें भरला हृदईं । मर्यादेनें बैसोनि ठाईं । पोशाग लवलाहि आणविला ॥ ४५ ॥ श्रीवरदराज विष्णु मूर्तीसि । वस्त्रें अर्पिली नेमेसि । हार शिवउन अंगरख्यासी । घातला अंगासि देवाच्या ॥ ४६ ॥ दुर्बुधि येतां यवन बोले । आतां पाहूं याचें नवल । हार कैसा घननीळ । काढुनि गळ्यांतील देईल पै ॥ ४७ ॥ ऐसी छळक भावना धरून । कवतुक पाहातसे दुरोन । नगरवासी सकळ जन । उद्विग्न मन तयाचें ॥ ४८ ॥ म्हणती कैसा दुराचारी । छळक पातला निर्धारीं । दुश्चित जाहल्या नरनारी । बहु अंतरीं चिंतातुर ॥ ४९ ॥ गाईंत व्याघ्र पातला । किं वेद म्हणतां चांडाळ आला । नातरी सराटा लागला । क्षिरींत पडला जिव्हेसी ॥ ५० ॥ कीं मक्षिका लागली आर्तांत । कीं मेघ विठ्ठला आवर्षणांत । कीं मर्त्यासि प्राप्त अमृत । ते सांडिसे येउन दुर्जन ॥ ५१ ॥ तयावरि येथें जालें । भजनांत दुष्टें विघ्न केलें । म्हणे हार न येतां गळ्यांतील । भ्रष्ट सकळ करीन सभा ॥ ५२ ॥ इकडे केशवस्वामिनि नित्यापरी । कीर्तन करिति देवद्वारीं । कोंदाटलें नभ त्या गजरीं । भजन सुस्वरीं होतसे पै ॥ ५३ ॥ हार श्रीच्या गळ्यांतुन । यावयाचा वेळ गेला टळून । प्रेमाश्रूनें भरले नेत्र । केशव नर्तन करिती पै ॥ ५४ ॥ श्रीहरीच्या मनांत । राग आणावा

स्वभक्ताचे । याळागीं न देत प्रसादाते । राहिले अनंत उगे चि पै ॥ ५५ ॥ तेव्हां केशव स्वामी धांवा करिती । सद्गद होउनी अनन्य चित्तीं । ब्रीद गेलें तुझे श्रीपती । ऐसें वदती क्रोधानें ॥ ५६ ॥ जानकीमनमोहना । कौसांतका गोकुळप्राणा । आजि निर्वाण पाहासी नैना । निष्ठुर कान्हा जाहलासि तूं ॥ ५७ ॥ पिंडब्रह्मांडव्यापका । रुक्मिणीजीवना पंढरीनायका । इंद्रियपीठचाळका । पुंडरीकावरद हरी ॥ ५८ ॥ आतां जाईल भक्तलाज । अंत पाही गरुडध्वज । गांजिली ती पांडवभाज । तैसें आज संकट पै ॥ ५९ ॥ हार देतां तुझें बाचें । काय जातसे सांग बाचें । ऐसें वाक्य केशव स्वामिचें । आयकुनी देवाचें मन तोषलें ॥ ६० ॥ अंगरख्याचे तत्कालिक । दोरे तुटले तेव्हां चि देख । हार निघोनि गळ्यांत सुखें । पडतां निंदक चाकाटले ॥ ६१ ॥ येकसरा पिटली समस्ता टाळी । यवन प्रमुखी त्या घेरि आलि । साष्टांग पडतां भूतळीं । प्रभा देउळी फांकली ते ॥ ६२ ॥ गेली देहाची सकळ स्मृति । आष्टौभाव दाटले चित्तीं । अनुताप होउनि चित्तीं । अभिंद स्तुति करितसे ॥ ६३ ॥ अनन्य भावें येतां शरण । केशव स्वामींनि केला पावन । मंगळ आरती मग करून । केलें कीर्तन समाप्त ते ॥ ६४ ॥ जगत्रै जाली कीर्ती । धन्य कृपाळु केशवमूर्ति । उत्धरावया यया जगति । जयदेव व्यक्ति अवतारली ॥ ६५ ॥ पूर्वी श्रृंगार देवाचा । वर्णितां लाचावली वाच्या । तो चि अभ्यास पडता साचा । अनुकार कवणाचा तो चि पै ॥ ६६ ॥ अध्यात्मयुक्त श्रृंगारिक । भाषण जयाचें नेमक । जाहालें काव्य तें चि चोख । प्रसादिक सकळ जना ॥ ६७ ॥ केशवस्वामिचीं म्हणतां पदें । प्राप्त होतसे अचळ पद । सांडुनिया इंद्रादि पदें । सद्गुरुपदें वेगीं धरा ॥ ६८ ॥ नाहिं क्षणाचा भरवसा । काळ जवळी बैसला जैसा । उंदीर बोका नेहतो जैसा । जीव तैसा ग्रासील पै ॥ ६९ ॥ आज उद्यां म्हणतां ध्यारी । दिवस जातील निर्धारीं । स्वहित आपुलें वेगीं करी । मीठ्यालि सारि मायिक जनें ॥ ७० ॥ इष्ट मैत्र सोयरे बंधु । कन्या पुत्र आणिक वधु ।

बुडवितील हे भवसिंधु । बुद्धिमंदु जाहालासि तूं ॥ ७१ ॥ कोण्ही नव्हेति कवणाची । आवघी भोंदु सुखाची । वाट धरि भक्तीची । पंढरीचि देवता पाहा ॥ ७२ ॥ माहात्म बहुत वैभवाचे । गेले फार आयुष्याचे । ऐसे बोले व्यास वाचें । काय साचें मानिलें त्वा ॥ ७३ ॥ धरि धरि बा सत्संग । ध्यायीं मानसीं आत्मरंग । तरि च घडे भवभंग । होईं दंग आत्मसुखा ॥ ७४ ॥ प्रकृति पुरुष राधा कृष्ण । हा चि शृंगार पाहुन जाण । सेवि आता निजात्मसुखन । तरिच धन्य होसि पै ॥ ७५ ॥ जयाते नाहीं अध्यात्मश्रवण । ते तों सकळ मिथ्या जाण । केशवस्वामीचें सुंदर कवन । ऐकतां पावन होती जीव ॥ ७६ ॥ सहजी आपण प्रसादीक । जेथें आत्मानात्माविवेक । ऐसें काव्य करुनि देख । बोधितीं अनेक प्राणिया ॥ ७७ ॥ निरंतर जावे पंढरिसि । हा चि नेम सर्वदा ज्यासि । भावें पुजोनि हृषिकेशी । कीर्तनासि करावे ॥ ७८ ॥ मग तो काय पाहाणें रंग । जेथें उभा पांडुरंग । केशवस्वामिचें वग्तृत्व सांग । न पडे व्यंग कांहिं चि ॥ ७९ ॥ कोणे येक दिनीं राउळांत । कीर्तन करीति केशवसंत । असंख्य मिळाले साधु जेथें । नामें श्रोते आयकति ॥ ८० ॥ जगद्गुरु श्रीरामदास । कल्याणादि सकळ शिष्य । रंगनाथ आणि आला विशेष । कृष्णयोगेश जयराम ॥ ८१ ॥ रंगनाथस्वामि आनंदमूर्ति । वामन-पंडित उत्तम जगतीं । जे का उपासक श्रीगणपति । निरंजन निश्चिती शंकराचे अंश ॥ ८२ ॥ शिवदिन केसरी उद्धोधनाथ । गोसावीनंदन महा संत । आनंदतनय विख्यात । शिवरामसमर्थ आत्मवेत्ते ॥ ८३ ॥ शेख महमद नाथ गणेश । कोकिल प्रभु भक्त ज्ञानेश । मल्हारस्वामि मार्तंड अंश । आत्मविलास तत्वज्ञ पै ॥ ८४ ॥ ऐसे संत महानुभाव । कथेसि बैसले येउनि सर्व । असंख्य पाहातां तयाचिं नांवें । कीर्तन केशव करित्ति पै ॥ ८५ ॥ कथारस शृंगार । स्वकाव्योक्त वाणिला सार । हास्य करि रुक्मिणीवर । आनंद थोर होतसे पै ॥ ८६ ॥ स्वर्गीहुनि सकळ दैवतें । इंद्रादि देव पातले तेथें । ध्वजपताका झळकत । विद्युल्लता सारिख्या पै ॥ ८७ ॥ केशवस्वामिचें वग्तृत्व सुंदर । डोलं लागले

रधिकावर । रामदासादि साधु सारे । चमत्कार मानिति ते ॥ ८८ ॥ सर्वत्र जनासि समाधि । प्राप्त झाली तये संधीं । धन्य धन्य ते निशुद्धि । ज्ञानउदधी केशव श्री ॥ ८९ ॥ कथामृत श्रवतां वाणि । पुरे न होय सकळा श्रवणि । भरुनि गेढा ध्वनि गगनिं । लाधलो जनि उन्मनि ते ॥ ९० ॥ तये अर्थाचें मनन । स्वयें कारिति श्री भगवान् । नाशिकाग्रीं ठेउनि लोचन । समचरण विटेवरि ॥ ९१ ॥ धन्य क्षेत्र ते पंढरि । देव उभा भीमातिरिं । घेतसे पूजा वाणीकरि । भक्तमंजरी हे मालिका ॥ ९२ ॥ पुढील अध्याईं कथन सुंदर । आख्यान वर्णिलें हें चि बरें । श्रवणमात्रें कामना पुरे । भवभय हरे येकसरा ॥ ९३ ॥ वैकुंठवासी नारायण । साधु तयाचें देवार्चन । संतापरते थोर जाण । पाहतां आन असेना ॥ ९४ ॥ सद्गुरु सिद्ध कृपारासि । निरंतर विनटलो तत्पदासि । तेणें अधिकार या पामरासि । भक्तस्तवनासि जाला पै ॥ ९५ ॥ शिष्यवत्सल श्रीराजारामीं । मेळविले कल्याणनामि । धन्य समर्थ सिद्धस्वामि । अंतरयामि प्रगटलेति ॥ ९६ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । केशवस्वामि चरित्रातें । प्रथम अध्याय समाप्त हा ॥ अनुक्रमें अध्याय पंचवीस ॥ २५ ॥ छ ॥

---

## ॥ अध्याय २६ वा ॥

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिद्ध देवा । रावणांतका रमाधवा । कौंसमर्दना श्रीकेशवा । रुक्मीणिवैभवा पांडुरंगा ॥ १ ॥ पुंडरीकवरदा मनोहरा । भक्त जनाच्या निज माहेरा । काय वानूं तुज दातारा । विश्वंभरा श्रीमूर्ति ॥ २ ॥ पुराण पुरुषा नारायणा । अनादि सिद्ध सच्चिद्घना । निज निर्गुणा गुणनिधाना जानकीजीवना आत्मया ॥ ३ ॥ जें जें बोलुं तुह्मासि । तें तें साजे हृषिकेशी । चराचरीं भरुनि राहासि । उरे तयासि दृष्टांत पै ॥ ४ ॥ आतां हें चि एक मळे । मौनें चि नमिजे गुरुपाउलें । समचरणिं ठेवितां भाळ । जाहाले

सोज्वळ हृदय ते ॥ ५ ॥ भक्तचरित्रा प्रसवली मती । श्रवण करणें श्रोतियें प्रिति । तेणें तात्काळ पाविजे स्वार्थि । तिष्ठे मुक्ति जोडुनि कर ॥ ६ ॥ संतकथेचा अगाध महिमा । जाणूं न शके चतुर्मुख ब्रह्मा । अनुसरला ह्मणुनि कर्मा । इछि प्रेमा भक्तिसुखा ॥ ७ ॥ सदाशिव संतस्तवनीं । अद्यापि तन्मय श्रीरामध्यानीं । ह्मणोनि इतरें अभिमान सोडुनि । साधुचरणिं अनुसरावें ॥८॥ तरि सकळा हे चि आतां । प्रार्थना सदैवा जोडुनि हाता । केशवस्वामिचि अपूर्व कथा । श्रवण तत्वता करा तुह्मी ॥९॥ जो अवतार जयदेवाचा । पाहातां महिमा अगाध त्याचा । वर्णूं जातां न पुरे वाचा । परि प्रेमाचा लोभ हृदईं ॥ १० ॥ श्रीगुरुकृपेचें काढोनि बळ । भक्तमंजरी होतसे माळ । त्यांत मणि हा सुढाळ । रस प्रांजळ कथानक ॥ ११ ॥ मागिल अध्याईं पंढरिनिवास । तोषविले कीर्तनरस । आनंद केला श्रोतियास । वग्नुत्वमिसें कवनीं ॥ १२ ॥ केशव माहाराज स्वगृहिं असतां । जाहाले नवल ऐकिजे तत्वता । जेणें करीतां सार्थता । होये दुरिता नाश पैं ॥ १३ ॥ ताम्रपर्णीतीरस्थ । चतुःशास्त्री हरी पंडित । जाहला होता व्याधिग्रस्त । कुष्टपर्यस्त व्यथा अंगिं ॥ १४ ॥ गृहीच्यांनि धिःकार केला । पंढरिसि तो निघोनी गेला । आराधिला घनसावळा । भजनाला अनुसरोनी ॥ १५ ॥ तये काळीं फिरत फिरत । केशवस्वामींचे घरासि जात । तव ते गेलेति स्नानातें । सदनातें स्त्री असे ॥ १६ ॥ हातांत भीक्षेचि झोळी । द्वारीं येउनी आरोळी दिधली । तव ती बाई बाहेरी आली । दुर्गंधी आली कुष्टाचि तये ॥ १७ ॥ ह्मणे ब्राह्मणा कोठें जाणार । व्याधिग्रस्त तुझें शरीर । येरु वदे सकळ विचार । जाहाला साचार अनुक्रमें ॥ १८ ॥ इत्थंभूत मूळ पीठिका । निवेदिली सविस्तर देखा । शरण गेलों पंढरीनायका । उपाय निका सांगीतला ॥ १९ ॥ वदे मज स्वप्नाधारें । रुक्मीणिवल्लभ सारंगधरें । औषध व्याधिस जान्हवीनीर । ह्मणुनि सत्वर काशीस निघालें ॥ २० ॥ परी मी अशक्त द्रव्यहीन । सोडिलें कळत्रपुत्रानें । ऐसें ऐकोन स्या सतीनें । आणिलें पूर्ण मानसि

राधिकावर । रामदासादि साधु सारे । चमत्कार मानिति ते ॥ ८८ ॥ सर्वत्र जनासि समाधि । प्राप्त झाली तये संधीं । धन्य धन्य ते त्रिशुद्धि । ज्ञानउदधी केशव श्री ॥ ८९ ॥ कथामृत श्रवतां वाणि । पुरे न होय सकळा श्रवणिं । भरुनि गेला ध्वनि गगनिं । लाधली जनि उन्मनि ते ॥ ९० ॥ तये अर्थाचें मनन । स्वयें करिति श्री भगवान् । नाशिकाग्रीं ठेउनि लोचन । समचरण विटेवरि ॥ ९१ ॥ धन्य क्षेत्र ते पंढरि । देव उभा भीमातिरिं । घेतसे पूजा वाणीकरि । भक्तमंजरी हे मालिका ॥ ९२ ॥ पुढील अध्याईं कथन सुंदर । आख्यान वर्णिलें हें चि बरें । श्रवणमात्रें कामना पुरे । भवमय सरे येकसरा ॥ ९३ ॥ वैकुंठवासी नारायण । साधु तयाचें देवार्चन । संतापरते थोर जाण । पाहतां आन असेना ॥ ९४ ॥ सद्गुरु सिद्ध कृपारासि । निरंतर विनटलो तत्पदासि । तेणें अधिकार या पामरासि । भक्तस्तवनासि जाला पै ॥ ९५ ॥ शिष्यवत्सल श्रीराजारामीं । मेळविले कल्याणनामि । धन्य समर्थ सिद्धस्वामि । अंतरयामि प्रगटलेति ॥ ९६ ॥ भक्तमंजरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । केशवस्वामि चरित्रातें । प्रथम अध्याय समाप्त हा ॥ अनुक्रमें अध्याय पंचवीस ॥ २५ ॥ छ ॥

---

## ॥ अध्याय २६ वा ॥

श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिद्ध देवा । रावणांतका रमाधवा । कंसमर्दना श्रीकेशवा । रुक्मीणिवैभवा पांडुरंगा ॥ १ ॥ पुंडरीकवरदा मनोहरा । भक्त जनाच्या निज माहेरा । काय वानूं तुज दातारा । विश्वंभरा श्रीमूर्ति ॥ २ ॥ पुराण पुरुषा नारायणा । अनादि सिद्ध सच्चिद्घना । निज निर्गुणा गुणनिधाना जानकीजीवना आत्मया ॥ ३ ॥ जें जें बोलूं तुह्मासि । तें तें साजे हृषिकेशी । चराचरीं भरुनि राहासि । तुरे तयासि दृष्टांत पै ॥ ४ ॥ आतां हें चि एक भलें । मौनें चि नमिजे गुरुपाउलें । समचरणिं ठेवितां माळ । जाहाले

सोज्वळ हृदय ते ॥ ५ ॥ भक्तचरित्रा प्रसवली मती । श्रवण करणें श्रोतिये प्रिति । तेणें तात्काळ पाविजे स्वार्थि । तिष्टे मुक्ति जोडुनि कर ॥ ६ ॥ संतकथेचा अगाध महिमा । जाणूं न शके चतुर्मुख ब्रह्मा । अनुसरळा ह्मणुनि कर्मा । इच्छि प्रेमा भक्तिसुखा ॥ ७ ॥ सदाशिव संतस्तवनीं । अद्यापि तन्मय श्रीरामध्यानीं । ह्मणोनि इतरें अभिमान सांडुनि । साधुचरणिं अनुसरावे ॥८॥ तरि सकळां हे चि आतां । प्रार्थना सदैवा जोडुनि हाता । केशवस्वामिचि अपूर्व कथा । श्रवण तत्त्वता करा तुह्मी ॥९॥ जो अवतार जयदेवाचा । पाहातां महिमा अगाध त्याचा । वर्णूं जातां न पुरे वाचा । परि प्रेमाचा जो हृदईं ॥ १० ॥ श्रीगुरुकृपेचें लाहोनि बळ । भक्तमंजरी होतसे माळ । तयांत मणि हा सुढाळ । रस प्रांजळ कथानक ॥ ११ ॥ मागिल अध्याईं पंढरिनिवास । तोषविला कीर्तनरस । आनंद केला श्रोतियास । वस्तुत्वमिसें करुनी ॥ १२ ॥ केशव माहाराज स्वगृहिं असतां । जाहाले नवल अैकिजे तत्वता । जेणें करीतां सार्थता । होये दुरिता नाश पै ॥ १३ ॥ तांम्रपणीतीरस्थ । चतुःशास्त्री हरी पंडित । जाहला होता व्याधिग्रस्त । कुष्टपर्डीस्त व्यथा आंगिं ॥ १४ ॥ गृहीच्यानि धिःकार केला । पंढरिसि तो निघोनी गेला । आराधिला वनसावळा । भजनाला अनुसरोनी ॥ १५ ॥ तये काळीं फिरत फिरत । केशवस्वामीचे घरासि जात । तव ते गेलेति स्नानातें । सदनातें स्त्री असे ॥ १६ ॥ हातांत भीक्षेचि झोळी । द्वारीं येउनी आरोळी दिधली । तव ती बाई बाहेरी आली । दुर्गंधी आली कुष्टाचि तये ॥ १७ ॥ ह्मणे ब्राह्मणा कोठें जाणार । व्याधिग्रस्त तुझें शरीर । येरु वदे सकळ विचार । जाहाला साचार अनुक्रमें ॥ १८ ॥ इत्थंभूत मूळ पीठिका । निवेदिली सविस्तर देखा । शरण गेलों पढरीनायका । उपाय निका सांगीतला ॥ १९ ॥ वदे मज शास्त्राधारें । रुक्मीणिवल्लभ सारंगधर । औषध व्याधिस जान्हवीनीर । ह्मणुनि सत्वर काशीस निघाले ॥ २० ॥ परी मी अशक्त द्रव्यहीन । सोडिले कळत्रपुत्रानें । अैसें ऐकोन त्या मातेनें । आणिले पूर्ण मानसिं

॥ २१ ॥ ह्मणे मन असे चंगा । तरि काठवठिंत येईल गंगा । कासया श्रमसि बा उगा । ऐसे ते शुभांगा वदली पै ॥ २२ ॥ नानापरि करुणारसें । आळविला राधिकाविलासे । तुझे पाईं सकळ तीर्थास । उत्पती असे स्वामिया ॥ २३ ॥ ते तूं सर्वत्र हरि असति । पुराणि बोले व्यास ऋषि । तरि काठवठित भागीरथीसि । प्रघट होणेंसि इछिते ॥ २४ ॥ प्रार्थिता त्या अवसरी । चमत्कार जाहाला ऐका श्रोतीं । तात्काळ तया काष्टपात्रीं । उद्भवलि निर्धारिं सुरनदि ॥ २५ ॥ उचंबळोनि चालिले जळ । वाहातसे पात्र तें प्रबळ । मिळाले तेथें द्विज मंडळ । जन सकळ आदिकरुनि ॥ २६ ॥ तया तीर्थी करितां स्नान । कुष्टि ब्राह्मण जाहाला पावन । व्याधि जाउनि समग्र जाण । दैदिप्यमान जाहाला ते ॥ २७ ॥ मग तो आनंद सांगणें कीति । ब्राह्मण लागला चरणाप्रति । धन्य अवतार पद्मावति । अवतार सती ते माये ॥ २८ ॥ केला द्विजाचा उत्धार । नगरवासि मिळाले सारे । स्नान करिति नारीनर । आनंद थोर सर्वाला ॥ २९ ॥ इकडे गंगेवरि केशव स्वामि । आन्हिक सारुनि येतां धामीं । अपूर्व पाहुनि नेत्रपद्मीं । अंतर्यामि संतोषले ॥ ३० ॥ तयाते बोलिजे पवित्र भार्या । कुळोत्धारिणि माहा आर्या । इतर कलीत जाति निर्या । दुरित देहा आचरोनि ॥ ३१ ॥ केशवस्वामि जयदेव अंश । स्त्री ते पद्मवती च विशेष । उभयतां जन्मलिया भुमीस । अज्ञान जनासि तारावया ॥ ३२ ॥ असो तें तीर्थ अद्यापि आहे । भावी गंगा म्हणती पाहे । धन्य धन्य केशमराय । महिमा अद्वय तयाचा ॥ ३३ ॥ पाहा पातकि दुराच्यारि । ब्राह्मण क्षेत्री वर्ण च्यारि । ज्ञाती भलते अनाधिकारि । दर्शनें सारि उत्धरति ॥ ३४ ॥ आणीक चमत्कार ऐका जनि । उत्धरिला यवन पातशाहा कीर्तनि । ते सविस्तर ऐकतां श्रवणीं । चक्रपाणि जवळ त्या ॥ ३५ ॥ शिष्यमंडळिसहित । निघाले केशव तीर्थाते । ठाईं ठाईं उपदेशित । शरण येत तयासि ॥ ३६ ॥ टाळ विणें पताका । मृदंग झांजा वाजति देखा । आळविति रमानायका । स्वात्मसुखा निमग्न ते ॥ ३७ ॥ त्या

ज्या क्षेत्रीं जेथें जावें । कीर्तन करावें तेथें भावें । मार्गीं दिनाते उद्धरावें । हा चि सर्व नेम ज्याचा ॥ ३८ ॥ भूतमात्रीं आत्माराम । ऐसे केशवसंत परम । तीर्थें करीत चालिले क्रमें । निजात्मधर्म ज्या हृदईं ॥ ३९ ॥ सहज स्थिती भागानगरांत । आले स्वामि फिरत फिरत । नामस्मरणें गजर होत । मंडळी बहुत संगें ज्या ॥ ४० ॥ भावीक जनानि पाहातां डोळां । हर्ष तया फार चि जाहाला । ठेउनि घेतले स्वामिला । उत्तम स्थळाला देउनि ॥ ४१ ॥ केशव महाराज तयाचा नेम । नित्य कीर्तन करावें प्रेमें । ऐकावयासि पंडित निशीम । येति परम भाव धरुनि ॥ ४२ ॥ आबाळवृद्ध सकळ ज्ञाति । कथा श्रवण सारे करिति । रंगोनि गेलि मानसवृत्ति । स्वप्नीं जागृति तो चि ध्यास ॥ ४३ ॥ प्रपंचि होउनि उदास । भजूं लागले केशवस्वामिस । तये काळिं दुर्जन पुरुष । तेथें असे नावडे त्या ॥ ४४ ॥ तात्काळ जाउनि यवनाला । सांगीतले तेथिल प्रभुला । म्हणे शहरांत संत आला । भुलविले सर्वांला तयानें ॥ ४५ ॥ माजविले कीर्तनबंड । नारिनरासि लागलें वेड । जेवावयासि नाहिं सवड । लौकिक चाड सांडिलि ॥ ४६ ॥ तेणें अविंदें ऐकुनि ऐसें । क्रोधावलें फार मानस । आला स्वयें छळावयास । उन्मत्त मंडळीस घेउनि ॥ ४७ ॥ सवा प्रहर जाहालि निशि । लोक मिळाले कीर्तनासि । वैदिक पंडीत विप्रनरासि । शोभा समेसि तेणें पै ॥ ४८ ॥ दुरस्ता जन बैसले । मध्यें कीर्तन होतसे भले । केशव स्वामि अति प्रेमळ । आळवोनि गोपाळ भजन करिति ॥ ४९ ॥ निरोपण विधि शास्त्राधारें । भागवत कीर्तन होतसे प्रखर । राधाकृष्ण-चरित्र । वर्णिति पवित्र केशव ते ॥ ५० ॥ राधिका गोपी ते वेळेसि । वीडा देतां रुसले हृषिकेशि । लेव्हां जोडोनि हस्तासि । श्रीहरिसि प्रार्थितसे ॥ ५१ ॥ म्हणे मी दासि चुकले काय । मुख फिरवि यादव-राय । क्षमा करि सिघ्र अन्याय । विडा तूं घे स्वामिया ॥ ५२ ॥ ऐशा परी श्रीकृष्णलीला । वर्णन होतसे ते वेळा । कीर्तनाचा लोट चालिला । केशवस्वामिला प्रेम बहु ॥ ५३ ॥ येकसरा होतसे गजर । वेधले

सकळ नारी नर । तव पातला तो अविचार । यवन दुर्धर दुर्बुध्धी ॥ ५४ ॥ येकायकीं सभे जवळि । आलि उन्मत्त ते मंडळी । अवलोकिली नेत्रकमळीं । सभा सगळी अनुक्रमें ॥ ५५ ॥ भींतिकडे पाहातां नेत्रें । राधाकृष्णाचें देखिलें चित्र । जैसें लाविले कथेचें चरित्र । तैसें तंत्र तेथें पै ॥ ५६ ॥ देवानि फीरविली माघे मान । राधा विडा देतसे जाण । न घेति ते कदा कृष्ण । रुसले पूर्ण राधिकेवरि ॥ ५७ ॥ मग तया छळकास । आनंद झाला फार मनास । आरंभीले प्रत्नास । केशवस्वामिस करावया ॥ ५८ ॥ ह्मणे तुह्मी संत ह्मणविता । अंतरबाह्य देव पाहातां । सकळ जनासि उपदेशिता । कीर्तन करितां प्रत्यहिं ॥ ५९ ॥ उपासना सर्वां मुर्तीं । नाणलि तुह्मा जरि निश्चीति । तरि दाखवा येथें प्रचीति । होईल फजीति नाहिं तरि ॥ ६० ॥ जें वर्णितां तुह्मी चरित्र । भींतिवरि आहे तैसें चि चित्र । तरि विडा हे श्रीकृष्णवगत्र । सेविजे पवित्र ऐसें करा ॥ ६१ ॥ नाहिं तरि भ्रष्ट येथें । करुनि आप्रतिष्ठा होईल त्वरित । ऐसें बोलतां तो उन्मत्त । केशव संत विचारिं पडले ॥ ६२ ॥ आटाहास्यें धांवा करिति । करुणापर अभंग गाती । सद्गद होउनि मांडिली स्तुति । प्रेम चित्तीं वोसंडतसे ॥ ६३ ॥ जय जया जी राधिकारमणा । गजेंद्रनक्र-उध्धरणा । पांडव भार्या संकटहरणा । प्रल्हाद रक्षणा गोविंदा ॥ ६४ ॥ वसुदेवदेवकीकुमरा । पुतनांतका यादवेंद्रा । भक्तसाह्य अमरोध्धारा । निंदक असुरा निर्दाळिसि ॥ ६५ ॥ आजि ब्रीद हें तुझें जातसे । भींतित न करिसि जरी प्रवेश । तरि चित्रांत घेतां विडियास । विस्तीर्ण यश होईल जगीं ॥ ६६ ॥ नाहिं भक्ति मज दीनाला । म्हणवितसे दास आपुला । यालागिं सांभाळि निजब्रीदाला । दिनदयाळ कृष्ण तूं ॥ ६७ ॥ ऐसें स्तवन करितां वाच्या । देव भक्तासि दुरि कैसा । नाहिं आडऊं जाहला तयाचा । तव चिंतेचा आवर्त जनिं ॥ ६८ ॥ केशवस्वामीची प्रार्थना ऐकतां । काय उणिर त्या अनंता । प्रघट होउनि भींतित तत्वता । चित्रिं सर्वथा उद्भवले ॥ ६९ ॥ जेवि प्रल्हादाचे

संकटिं । जन्मले हरि फोरडे काष्टिं । तैसें चि येथें घडलि गोष्टि । पडलि मिठि स्वानंदें ॥ ७० ॥ तात्काळ फिरउनि तोंडाळा । राधिकेचा विडा घेतला । तांबोल तेन्हां चि रंगोनि गेला । रस गळाला भिंतिवरूनि ॥ ७१ ॥ थबथबा पडति खालिं बिंदु । प्रेमें उचंबळला केशवसिंधु । काजळा छक्कड बुधिमंदु । उदेला इंदु कीर्तनीं तो ॥ ७२ ॥ कीर्तनामृत तेन्हां क्षिरपतसे । भरतें केशव भक्तार्णवास । काय पाहाणें तो विलास । लागल्या सर्वास समाधि ॥७३॥ अष्टभाव दाटले देहिं । केशवस्वामिस स्मृति नाहिं । प्रगट जाहलि श्रीविठाई । कृष्णबाई द्वारकेचि ॥ ७४ ॥ पश्चात्तापें तापला । यवन वैराग्यें आथीला । विवेक अंगिं मळावला । उदास जाहला सर्वस्वें ॥ ७५ ॥ शरण येतां केशवस्वामिते । स्वात्मरूपासि मिळाला त्वरित । अनन्य भावें जोडुनि हात । करुणा भाकीत दीन वचनें ॥ ७६ ॥ म्हणे घडला बहु अपराध । दीनदयाळ तूं सद्गुरुसिंध । तव कृपें लाधलें पद । जाहला आनंद आनिर्वचनि ॥ ७७ ॥ संवस्थानासि सरंजाम । सनदा करुनि दीधले ग्राम । ठेउनि घेतले स्वामिसि प्रेमें । नित्य नेमें दास्य करि ॥ ७८ ॥ मग तेथें हयदराबाजेंत । मठ करुनि दिधला निश्चित । ऐसे समर्थ केशव संत । उध्दरीत मूढ जना ॥ ७९ ॥ धन्य जयाचा भक्तिप्रेमा । आणि केले आत्मयारामा । वाढला तेथें थोर महिमा । जयदेव नामा अवतार जो ॥ ८० ॥ जेणें केल्या अष्टपद्या । तोषविलें वेदवंद्या । प्रघटउनि श्रीमुकुंदा । मृत स्त्रि सध्या उठविलि ॥ ८१ ॥ धन्य सुशील ते जीवंत सती । जीचें नाव पद्मावती । जयदेव स्वामि जीचा पति । उमयता जगतीं धन्य साधु ॥८२॥ तयाचि कथा अन्य कवींनें । वर्णिली असे सविस्तर जाण । यिया ग्रंथिं हें चि कथन । पुन्हां श्रवण केलें तें ॥ ८३ ॥ स्त्रि मृत उठवावया । संकट घातलें देवराया । शिणवीले कृष्णात्मया प्रशस्त । हृदया न वाटले ॥ ८४ ॥ नासिवंत विषयासाठिं । कष्टविला श्रीजगजेठि । जयदेव धरोनि हें चि पोटिं । घेतला सृष्टि पुन्हा जन्म ॥ ८५ ॥ निष्काम हरिसि भजावें । जग कीर्तनें उधरावें । यदर्थि श्रीजयदेव । अवतरले

श्रीकेशव नाम पैं ॥ ८६ ॥ नाना प्रकारें करुनि कवन । तोषविला नारायण । परि स्वभाव मुळिचा पूर्ण । शृंगारवर्णन जयामाजी ॥ ८७ ॥ निबिड ज्ञान शुध्द वेदांत । जेथिल विलास तो अद्वैत । ऐसि पदें असंख्यात । केशव समर्थें केलि पैं ॥८८॥ पंधरा दिवसा येकादशीस । कीर्तन भजन रात्रंदिवस । मिळति श्रोते श्रवणास । महा विद्वांस ब्राह्मणादि ॥८९॥ अठरा वर्ण सकळ ज्ञाति । अनन्य भावें श्रवण करिति । सरोनि गेल्या सकळ राती । मंगळ आर्ति होतसे पैं ॥ ९० ॥ ऐसा नेम निरंतर । हरिदिनीस सदा ज्यागर । भजनप्रताप तो दिनकर । केशव थोर संत पैं ॥९१॥ ज्ञान प्रकाश सुंदरकीर्ण । दवडिले जेणें तम अज्ञान। मोक्षसत्र घातिलें पूर्ण । जीव दर्शनें पावन होती ॥ ९२ ॥ श्रावण कृष्ण येकादशिस । चमत्कार जाहला भागानगरास । श्रोते मिळाले अपार कथेस । ज्या गावास ते काळिं ॥ ९३ ॥ उछाहांत कृष्ण अष्टमीचे । आले जन गावोगावींचे । तशात पर्व हरिदिनिचे । जागर वाचे प्रेम जना ॥ ९४ ॥ बहुत पातले नारीनर । केशवस्वामिस आनंद थोर । चित्ति आठउनि सारंगधर । करित जागर ते दिवसीं ॥ ९५ ॥ उछाहांत नित्यकीर्तन । ऐकोनि जागले होते जन । ह्मणोनि झाकति नैन । कोणी उठोनि जाति पैं ॥ ९६ ॥ कितेक नेम जागरणाचे । बैसले श्रवणिं प्रेमळ साचे । कितेक हात जोडूनि वाचे । जावयाचे घरास बोलति ॥९७॥ ऐशि सभा गजबजलि । निद्रा श्रोत्यास बहुत आलि । तेव्हां शिष्यासि आज्ञा केलि । गुरुमाउलि केशवें त्या ॥ ९८ ॥ ह्मणति सुंठ साखर आणुनि त्वरित । वाटि सर्वांसि क्षिराप्त । मग जातील ते जावोत । ऐकति कथेत राहातील ते ॥ ९९ ॥ आज्ञापिला स्वामिनिं ऐसें । बाजारा गेला शिष्य । तो वाणी दुकानात निजला असे । दोन प्रहरास रात्र अधीक ॥१००॥ मग जागृत तयासि केलें । सुंठ साखरेसि मागितलें । वचनागाचे पोतें मरलें । होतें जवळ तयाचे ॥ १ ॥ न करिता तेणें वाण्यानें विचार । दिधलि तेंचि सुंठ ह्मणोनि साखर । शिष्यानें त्या येउनि सत्वर । करुनि चुर वाटिलि ॥ २ ॥ शर्करा मिश्रीत करुन । वचनाग दिधला सर्वांसी

जाण । श्रोतियाणि प्रसाद म्हणउनि । केले भक्षण तात्काळ ॥ ३ ॥ नामचि तया क्षिरापत । क्षीर म्हणावे अमृताते । ते चि शेवील या पीयुष्याते । भय तयाते कोण मग ॥ ४ ॥ इतर साधनें विषयपर । विषवत जाणा पथ सारे । क्षिरापत तो हा सार । सहजी आसार सकळा ते ॥ ५ ॥ असो सुंठि म्हणोनि न कळतां । शर्करामिश्रीत करुनि तत्त्वता । क्षीरापत वाटिली तेथें श्रोत्या । कीर्तन करितां केशवस्वामिनिं ॥ ६ ॥ भावें करुनि श्रोतीये सकळि । अत्यादरें क्षिरापत भक्षिलि । अपआपुल्या घरासि गेलि । बहुत मंडळि ते क्षणीं ॥ ७ ॥ काहिं राहिले जागरास । केशव करिति कीर्तनास । दुमदुमीले आकाश । नामघोषें करुनि ॥ ८ ॥ सरोनि गेलि सकळराती । उदय पावला पूर्वेशि गभस्ति । मग करुनि देवासि आरती । कीर्तन समाप्ती केले पै ॥ ९ ॥ श्रोते सर्वत्र जाउनि सदना । द्वादसिचि करिति पारणा । इकडे वाणि होता दुकाना । जागृत जाणा तो जाहला ॥ ११० ॥ उशासि पाहातां जवळ । बचनागाचे पोते भरले । अवलोकिता रिते झाले । आपण दिधले रात्रीं विष ॥ ११ ॥ कांच्या बचनागाच्या घडे दोन । न कळता दिधले सुंठ म्हणउन । केशवस्वामिचा ब्राह्मण । गेला घेउनि क्षीरापत वावया ॥१२॥ शहरांतील जीं जीं मनुष्यें । आलि असातिल कीर्तनास । तयानीं भक्षीलें तें तों वीष । मृत्यु निःशेष आला तया ॥ १३ ॥ अप्रमाद आला आपणावरि । घाबरा जाहाला वाणि अंतरिं । हिंडू लागला घरोघरीं । युक्तिनें विचारि परस्परें ॥ १४ ॥ शोध करिता सारे स्वस्थ । यात्राकरु आणि सकळ नगरस्त । जे जे कथेसि गेले होते । असति घरांत ते आनंदें ॥ १५ ॥ ऐसे पाहुनि वाणियानें । केशवस्वामिकडे आला जाण । तव ते बैसलेति स्नान करुन । देवार्चन करिति पै ॥ १६ ॥ श्रीराधिकाकृष्णाचि मूर्त । कृष्णवर्ण जाहालि निश्चीत । हें पाहुन संशयग्रस्त । केशव समर्थ जालेति ॥ १७ ॥ तो अकस्मात हा वाणि येऊन । साष्टांग दंडवत केले तयानें । सागतसे वर्तमान । जाहलें पूर्ण सविस्तर ॥ १८ ॥ न कळतां सुंठ म्हणून । अंधारांत

दिधला बचनाग जाण । ते तुमचा शिष्य घेऊन । क्षीरापंत ब्राह्मणें मारिलि तीं ॥ १९ ॥ प्रातःकाळिं जागृत होऊन । पोते पाहतां ते विषपूर्ण । घडला अपराध मजकडून । आलों धाऊन या साठिं ॥ १२० ॥ ऐकतां ऐसें केशवस्वामिनिं । सखेद जाहले अंतःकर्णि । पश्चात्ताप होउनि मनि । चक्रपाणि आठविति ॥ २१ ॥ अटाहास्यें गर्जोनि वाणी । स्तुती करति करुणा भाकुनी । म्हणती सर्वांतरीं प्रवेश करुनि । वीष शोषुनि घेतले तें ॥ २२ ॥ भक्तवछला गोपीकारमणा । उध्धव अक्रुर मुख्य प्राणा । पुंडरिकवरदा रुक्मीणिजीवना । संकट-नाशना श्रीहरि ॥ २३ ॥ काळियांतका सर्वेश्वरा । नीलकंठ हृदया रामचंद्रा । काळा जाहालासि सीतावरा । कृपासमुद्रा पूर्ववत होईं ॥ २४ ॥ प्रार्थना करिति अशा रिति । पूर्ववत जाहल्या धातुच्या मूर्ति । केशव-स्वामिस आनंद चित्तिं । नमन करिति साष्टांग ॥ २५ ॥ पुढिल अध्यायीं सुरस । वर्णीलें आख्यान हे चि असे । श्रोतीये करुनि स्थीर मानस । चरित्र पीयुष सेवावें ॥ २६ ॥ ग्रंथ करविता श्रीसिद्धमूर्ति । जो कां अवतार रामदास मारुति । राजारामीं हृदईं स्फुर्ती । वदवी युक्ति निजकृपें ॥ २७ ॥ भक्तमंजरी माळा ग्रंथ । श्रवणेंचि पुरती मनोरथ । केशवस्वामीचारित्रातें । अध्याय समाप्त दुसरा हा ॥ १२८ ॥ अध्याय ॥ २ ॥ अनुक्रमे अध्याय सवीसावा ॥ २६ ॥

---

## ॥ अध्याय २७ वा ॥

श्रीगणेशाय नमः । श्रीरामसमर्थ ॥ जय सद्गुरु सिद्धनाथा । लक्ष्मणानुज रुक्मीणिकांता । पांडुरंगा भक्तांकिता । आवघी सत्ता तुझी पै ॥ १ ॥ स्थावरजंगमीं गरुडध्वज । भरुनि उरला पंढरिराज । तो हा सोहं स्फुरणें माहाराज । देखिला सहज सर्वा भूतिं ॥ २ ॥ पिंड ब्रह्मांड ओतप्लुत । व्यापुनि ठेला आदिअंत । वर्णितां वेदा न लागे अंत । म्हणोनि अनंत नाम शोभे ॥३॥ तेथें स्तवन करणें काई । परि प्रेम रुळते पाईं ।

आनंद वोसंडतसे हृदई । थोर नवाई भक्तिची ॥ ४ ॥ भक्तिपरते नाहिं सार । मोक्षादिक मुक्ति असार । हें चि गर्जति वेदच्यार । आत्मविचार भक्त जाणति ॥ ५ ॥ आधिं बद्ध चि मुळिं नाहिं । स्वरूप आधवे सर्वा ठाईं । ह्मणुनि येता नरदेहीं । श्रीगुरु आई भक्ति दे ॥ ६ ॥ ऐसि प्रार्थना पादपद्मीं । ठेउनि माथा स्तविता स्वामि । देउनि भजन जन्मोजन्मीं । निज्यात्मप्रेमि रंगविले ॥ ७ ॥ वरदकर ठेउनि शिरीं । ग्रंथ करविति भक्तमंजरि । द्वैतभावा केचि उरि । वदे वैखरि संत चरित्रें ॥ ८ ॥ ऐकतां ते पवित्र कथन । सकळ कामना पूर्ति जाण । श्रोता वक्ता रघुनंदन । श्रीहनुमान सिद्धेश तो ॥ ९ ॥ मागील कथा अति प्रांजळ । केशवस्वामिचें संकट निरशीलें । दीनदयाळ श्रीविठलें । विष शोषिलें कीर्तनिं त्या ॥ १० ॥ कृष्णवर्ण होतां मूर्ति । केशव संतें मांडिली स्तुती । तेणें योगें राधिकापति । पूर्ववत मागुती जाहले पै ॥ ११ ॥ वाणियासी त्या वैराग्य होऊन । पश्चात्ताप जाहला पूर्ण । छटउन आपुले दुकान । गेला शरण स्वामिते ॥ १२ ॥ सेवा करुनि निरंतर । पावला निजात्म मंदिर । सोडुन सकळ संसार । सेविले सार आत्मभुवन ॥ १३ ॥ असो कोण्हि येके दिनिं दर्शनार्थ । मोंगलानें नेले वस्करांत । नामस्मरण गजर होत । होते तेथें तीर्थ जवळि ॥ १४ ॥ राहुटि देउनि शिष्या सहित । केशव माहाराज उतरले तेथें । विद्वज्जन पातले समस्त । गंगातीरस्थ छळक बुद्धि ॥ १५ ॥ नाना प्रकारें फडोविकडी । आरंभिले प्रश्न तये घडि । केशवस्वामिचि अगाध प्रौढि । कुंठित रोकडि केलि सभा । तो अकस्मात प्रजन्य वोळला । येकसरा घन वर्षो लागला ॥ १६ ॥ वैसले असतां वाचायाला । पाठ मला श्रीगीतेचा ॥ १७ ॥ राहुटिस छिद्र पडले होतें । तये वेळिं केशव समर्थ । ब्राह्मण वदति तुम्ही संत । पाहूं सामर्थ्य आजि पै ॥ १८ ॥ फार सांगता भक्तिमहीमा । तरि च चमत्कार दावधा आम्हा । गीतापठण चालों द्या नेमा । मेघोत्तमा भिजूं नये ॥ १९ ॥ पोथीवरि पाउस न पडेल । देव खरा तुम्हा जवळ । नातरि व्यर्थ मायिक बोल । आवघे

फोल अलङ्ञान ॥ २० ॥ ऐसें म्हणतां चि विप्रानिं । स्वामिनि जोडुनि सर्वांसि पाणि । म्हणे मी अनाथ पामर जनिं । कृपादानि समर्थ सर्व ॥ २१ ॥ सकळ सिद्धि ब्राह्मणवचनें । ऐसी गर्जति शास्त्रपुराणें । ते तुम्ही आजि होतां प्रसन्न । मेघनिवारण सहजी ते ॥ २२ ॥ साष्टांगेंसी करुनि नमन । स्वस्थ करिति गीतापठण । वर्षत असे सर्वत्र घन । तेथें जीवन न पडे पै ॥२३॥ आश्चिर्य पाहुनि द्विजवरानिं । शरण गेले अभिमान सांडुनि । समस्तानिं अनुग्रह घेउनि । विनटले चरणीं स्वामिचे ॥२४॥ ऐशा लीला अपरमित । तैसे चि केशवस्वामिचे सुत । जया संगें असे नाचत । कीर्तनांत सर्वोत्तमु ॥ २५ ॥ मग तेथें काय पाहाणें । जया साह्य रुक्मीणिरमण । तीथें सकळ तीर्णे हींडोन । केले पावन बहुतेका ॥ २६ ॥ वाच्या दिधलि मुक्यासि । खळ चांडाळ लाविले भक्तिसि । ध्वज लाविला जेणें वंशीं । सत्पुत्र कुशी धन्य ते ॥ २७ ॥ ऐसे केशवस्वामि समर्थ । जयेदेवाचा अवतार सत्य । उद्धरावया दीन जनाते । जन्म धरित पुनः पुनः ॥ २८ ॥ ते लिहीतां जन्मांतर । होईल बहु ग्रंथासी प्रसर । येथें वर्णिले संक्षेप विच्यार । नाहीं फार वाढवीले ॥ २९ ॥ असो चैत्रमासी राम नवमीस । संत मीळाले चाफळास । तये काळिं रामदास । केशवस्वामिस स्मरति मनिं ॥ ३० ॥ आत्यास्वामि निजरंगमूर्ति । जयराम आले उत्छाहाप्रति । तुकाराम समर्थ जगति । ते हि निगुति आले पै ॥ ३१ ॥ आनंदमूर्ति वामन । गाणपत्य श्रीनिरंजन । शिवरामस्वामि तत्त्वज्ञ । केसरीशिवदिन गुरुभक्त ॥ ३२ ॥ मल्हारस्वामि नाडोळिकर । चींचवडिं मोरेश्वर । गोसाविनंदन साधु थोर । वैष्णववीर आले ते ॥ ३३ ॥ परि न आले केशव संत । रामदास मनिं आठवण करित । तये काळिं घडला वृत्तांत । ऐका श्रोते सकळ ही ॥ ३४ ॥ करित असतां देवार्चन । नित्यापरि करितां ध्यान । तो रामदास स्वामिनिं केलें स्मरण । जाणिले पूर्ण केशवें त्या । ॥ ३५ ॥ तात्काळ सांगुनि शिष्याला । बैसावयासि घोडा आणविला । सरंजाम करुनि तयाला । चाफळाला निघाले ॥३६॥

अश्वारूढ होउनि जाण । पिटिला घाए अतित्वरेनें । दोन प्रहर होतां चि पूर्ण । आले निघोन स्वामीपासीं ॥ ३७ ॥ समर्थें पाहातां नेत्रकमळीं । वंदिली संत केशव माउली । हर्ष जाहाला संतमेळीं । पीटिली टाळी सर्वत्रें ॥ ३८ ॥ परस्परें घडोन आलिंगन । विच्यारिलें सविस्तर जाण । करित जाहले भोजन । आनंदानें ते काळि ॥ ३९ ॥ मग कीर्तनासि प्रारंभ केला । केशवस्वामिनि ते वेळा । तये समई श्रोतियाला । उल्हास जाहाला अद्भुत ॥ ४० ॥ कर्म उपासना ज्ञान । त्रिकांड जेथें निरोपण । डोलं लागले समस्त पूर्ण । होउनि निमग्न अर्थांतरिं ॥४१॥ जड मूढ अत्यंत खळ । वैराग्य प्राप्त तया जाहाले । इतर साबडे भाविक भोळे । भरले डोळे प्रेमानें ॥ ४२ ॥ रामदासादि रंगमूर्ति । केशवस्वामिसि व्हा व्हा म्हणति । कल्याण उठोनि नमन करिति । जयराम स्तविती अतिप्रेमें ॥ ४३ ॥ वामनस्वामि तुकाराम । शिवरामस्वामि तन्मय परम । धन्य वदति मुखपद्में । सर्वत्र राम स्फुरति मनिं ॥ ४४ ॥ जोयें कर्येत कोदंडपाणि । प्रगटविला चित्सुख खाणी । देखियला प्रत्यक्ष नैनिं । कोण वर्णि तया सुख ॥ ४५ ॥ ऐसा प्रकारें जाहालें कीर्तन । वर्षती अमरें कर्येत सुमनें । विमानिं कोंदलें असे गगन । साधु धन्य केशव ते ॥ ४६ ॥ नवविधात्मक रामनवमी । उत्छाह होतसे चाफळ ग्रामीं । नित्य कीर्तन होतसे नेहमीं । अंतर्यामि आनंद ॥ ४७ ॥ अनुक्रमें दाहा दिन । संत करिति सकळ कीर्तन । वृद्धिंगत प्रेमा पूर्ण । रघुनंदन प्रत्यक्ष ॥ ४८ ॥ उत्छाहविधि सांग जाहला । संत चालिले स्वस्थानाला । रामदासानि सत्कार केला । वस्त्रअलंकाराला देउनि ॥ ४९ ॥ भागानगरासि केशव गेले । ग्रामस्त तया सामोरे आले । जोडोनिया करकमळ । भजन मांगळ करिति पैं ॥५०॥ घेउनि गेले मठासि । राहिले तेथें कैवल्यराशी । उद्धरीति दीन जनांसि । भजन भक्तिसि लाउनि ॥ ५१ ॥ नाना प्रकारचे करुनि ग्रंथ । तोषविला पंढरीनाथ । अभंग पदें असंख्यात । शुद्ध वेदांत ज्यामाजि ॥ ५२ ॥ उपद समाधि सर्वांला । देव नि प्रत्यक्ष डोळा दाविला ।

आपण प्रयाण वैकुंठाळा । करिता जाला योगि तो ॥ ५३ ॥ कोणता दिवस कोण मास । ऐका श्रोते सावकाश । वृद्धि पावे आयुष्यास । सत निधानास श्रवण करिता ॥ ५४ ॥ शके सोळाशे च्यार । दुंदुभि नाम संवत्सर । पौषमास गुरुवार । त्रयोदशसार उत्तम तिथि ॥ ५५ ॥ पुष्पक विमान वैकुंठाहून । पाठविले श्रीनारायणे । आले समस्त वैष्णव-गण । वाजति घण घण घंटा त्या ॥ ५६ ॥ परस्परें संत मंडळि । जाणुनि हृदई सकळ पातलि । भजन कडाका धुमाळी । कीर्तन मेळी नाचति पै ॥ ५७ ॥ निर्वाण पीठ सिद्ध करून । केशवस्वामि बैसले जाण । पुढे होतसे कीर्तन । वर्णिती गुण कृष्णाचे ॥ ५८ ॥ समाप्ती समई परिक्षितीच्या । समोचय जाहला ऋषिगणाचा । तैसा समुदाय संताचा । आला साचा ते वेळे ॥ ५९ ॥ कृष्णलीलावर्णन । केलें आध्यात्मनिरोपण । आरति करुनि देवासि जाण । केलें नमन केशवें त्या ॥ ६० ॥ नमस्कार सरिसे प्राण । सर्वोत्तमासि केलें अर्पण । विमानारूढ होऊन । केलें प्रयाण श्रीवैकुंठि ॥ ६१ ॥ ते पुष्पकविमानाचि खूण । तेथे आहे प्रत्यक्ष चिन्ह । तयाचें करिति पूजन । अद्यापी जन त्या ठाईं ॥ ६२ ॥ तें प्रगट न ये सांगतां । वाढ होईल फार ग्रथा । सर्वज्ञासि कळे तत्त्वता । येरें कथा ऐकावि ॥ ६३ ॥ उत्तर विधान होऊन । समाधि रचिली सुंदर जाण । येऊनि स्वयें रुक्मीणिरमण । जाहाले दर्शन सताम्हि ॥ ६४ ॥ देवभक्तासि नाहीं भेद । विष्णुस्वरूप केशव सिद्ध । याळागिं नवल जाहलें प्रसिद्ध । ऐका शुद्ध भाविक हो ॥ ६५ ॥ भागिरथि समाधितुन । वाहातसे प्रगटाय-मान । पाहाता सकळ कामना पूर्ण । धन्य स्थान अगाध ते ॥ ६६ ॥ नमार्जे हराति व्याधि । तीर्थ तें चि दिव्यौषधि । भूत प्रेत समंधादि । उनि शुद्धि होतसे पै ॥ ६७ ॥ पातशाहा जो यवनाधिप । तयासि झाला शरिरीं ताप । पोटशूळाचि व्यथा अमुप । पूर्बिल पापें प्राप्त झाली ॥ ६८ ॥ नाना उपाय आरंभिले । अनुष्ठानि ब्राह्मण योजिले । त फकीर बोलाविले । वैद्य आणिले असंख्य पै ॥ ६९ ॥ औषधें

देति अनेक। परि पोटशूळ न राहे देख। शेवटिं पिरापासि जाउनि निके। बैसले कौतुक पाहावया ॥ ७० ॥ निग्रह करूनि आराधीता। पीराने दृष्टांत दिधला तत्वता। ते सकळ ऐकता। होय चित्ता समाधान ॥ ७१ ॥ फकीराच्या स्वरूपें येऊन। पातशहासि सांगितले निक्षुण। म्हणति केशव स्वामिचे समाधिस्थान। घ्यावे दर्शन तयाचें ॥ ७२ ॥ मर्यादेनें जाऊन तेथें। दुरुनि पाहुनि देउळातें। अनन्य भावें नवसुनि त्यातें। येकाग्रचित्तें शरण जावें ॥ ७३ ॥ तरि च जाईल पोटशूळ। ऐसें पीराने आज्ञापिलें। मग पातशाहानें येउनि भले। भावें नमिले समाधिसि ॥ ७४ ॥ तेणें रोग तात्काळ गेला। यवनाधिप संतोषला। प्रातःकाळचे नैवेद्याला। नवस अर्पिला मीठाईचा ॥ ७५ ॥ तेव्हां पासुनि आद्यापी वरि। मिठाई चालत आहे निर्धारि। जकातिचे माळविवरि। नेमणुक सारी केली ते ॥ ७६ ॥ ऐसे समर्थ केशवस्वामि। धन्य स्थान ते समाधिभूमि। जयाचे स्मरणें मंगळ नेहमीं। परमसिद्धि पावति प्राणि ॥ ७७ ॥ प्रतिवर्षि उत्साहांत चमत्कार होति बहुत। प्रगट होति पंढरीनाथ। कीर्तनांत मुख्य दिवसि ॥ ७८ ॥ माघीकासि दर्शन देत। देशोदेशिचे मिळति संत। अन्नदान सर्वांते। नाहिं गणित यात्रेसि ॥ ७९ ॥ जयदेवाचा अवतार केशवस्वामि साचार। करावया जगदोद्धार। वैष्णव थोर भूमंडळीं ॥ ८० ॥ जीवुबा शीवुबा दोघे जण। परम आप्तही ते ब्राह्मण। समाधिदर्शनें जाहाले पावन। ऐका कथन तें श्रोते ॥ ८१ ॥ जीउमर्द सदा शृंगारवर्णि। शीवाजीपंत माहाज्ञानि। दोघे मित्र कौतुकि अवनि। मांडति निशिदिनिं अखंडित ॥ ८२ ॥ जीउबा बोले विषय ब्रह्म। शिवबो म्हणे लटका भ्रम। तंडति उभयता नित्य नेम। आत्माराम न कळतां ॥ ८३ ॥ फीरत फीरत सहज्यांत। आले तया समाधिस्थानाते। भजन करून रात्रौ तेथें। होउनि विस्मित निजेले ॥ ८४ ॥ केशवस्वामि सद्गुरुनि। स्वप्नांत भेटले त्यालागुनि।

मंत्र सांगुनि निजकर्णिं । दाविली नैनिं सर्वात्मता ॥ ८५ ॥ प्रकृति पुरुष ऐक्यमात्र । द्वैताद्वैत केलें यात्र । आत्मत्व दाविलें मरिच । वासुदेव सर्वां भूर्ति ॥ ८५ ॥ शृंगार आणि ज्ञान । अभेदरूप जाहाले पूर्ण । जागृतिस येतां दोघे जाण । करिति नमन समाधिसी ॥ ८६ ॥ निःसंशय होऊनि जनिं । करुणा भाकिति दिनवचनिं । म्हणे माहाराज स्वप्नांत येउनी । उपदेश कर्णिं केला पै ॥ ८७ ॥ परि न होता प्रत्यक्ष दर्शन । देऊं येथें चि उभयता प्राण । केशवस्वामि करुणाघन । प्रगटले जाण ते समईं ॥ ८८ ॥ समाधान करुन जयाचें । अदृश्य जाहाले स्थानीं च । मग ते ब्राह्मण काशीचे । ब्रह्मनिष्ठ साचे जाहले पै ॥ ८९ ॥ पंढरिसि येउनि तेणें । चातुर्मास्य केलें कीर्तन । पुन्हा मागुति गेले निघोन । महा स्मशानस्थानासि ॥ ९० ॥ केशवस्वामि ऐसे समर्थ । समाधि जाहाल्या दर्शन देत । लीला वर्णितां नाहिं अंत । चमत्कार अनंत त्या ठाईं ॥ ९१ ॥ जन्मांतरींचि वोळखि पहिली । बुद्धिशि कथा तेणें स्फुरलि । कांहीं येक वर्णियेलि । नाहिं केलि ध्यावटि बहु ॥ ९२ ॥ सद्गुरु सित्व रामदास । तयाचा मी पदरजांश । योजीले तेणें संतस्तवनास । जन्मांतरास जाणुनीं ॥ ९३ ॥ धन्य धन्य तिं सिद्धपाउलें । पाहातां जीविंत्व समूळ गेलें । राज्यारामि मेळविले । कल्याण दाविले निजडोळा ॥ ९४ ॥ तो सर्वात्मा श्रीराम । पंढरिसि उभा मेघश्याम । कटिवरि ठेउनि करपद्म । पुंडरिक प्रेमें तिष्ठतसे ॥ ९५ ॥ भक्तमंजरि हे माळा । आर्पण होतसे त्या विठ्ठला । सिद्धप्रताप तो आगळा । प्रसाद केला स्वामिनिं ॥ ९६ ॥ पुढें चरित्र शिवरामस्वामिचे । वर्णवीतिल श्रीगुरु यांचें । श्रवण करितां जनाचें । काम सार्चें पूर्ति पै ॥९७॥ भक्तमंजरी माळा ग्रंथ । श्रवणें चि पुरति मनोरथ । केशवस्वामिचरित्रार्थे । तिसरा समाप्त अध्याय हा ॥ अध्याय ॥ ३ ॥ अनुक्रमें अध्याय ॥ २७ ॥

श्री

सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेले

श्रीरामदासी व इतर कांहीं ग्रन्थ

## श्रीमत् दासबोध प्रस्तावनेसह  किं. रु. ३

या ग्रन्थाची ही सहावी आवृत्ती होय. तींत ओव्या धांवत्या न छापतां एकाखालीं एक छापल्या आहेत. त्यामुळें नुसत्या मुख्य ग्रन्थाचीं पृष्ठें ६७५ झालीं आहेत. शिवाय आरंभीं सुमारें १०० पृष्ठें देवांची प्रस्तावना व शेवटीं विषयांची महत्त्वाची सूची दिली आहे. श्रीसमर्थांच्या हयातींत मेरुस्वामींनीं काढलेल्या तसबिरीवरून श्रीसमर्थांची प्रतिमा व त्यांच्या प्रत्यक्ष पादुकांची प्रतिमा, अशीं चित्रें दिलीं आहेत. जरूर त्या टिपा देऊन कठीण व कूटात्मक ओव्यांचा सांप्रदायिक अर्थ दिला आहे. श्री कल्याण महाराजांच्या हातच्या प्रतीवरून ही प्रत छापली असल्यामुळें श्रीमत् दासबोधाच्या सर्व प्रतींत सभेची ही प्रत म्हणजे ग्रन्थराजाची Authorized edition होय, असा या प्रतीचा गौरव लोकमान्यांनीं केला होता. प्रत्येक महाराष्ट्रियाच्या घरीं ही प्रत पाहिजे.

## श्रीसमर्थांची कविता  किं. रु. २

श्रीसमर्थांचें रामायण, ओव्या शतकें १४, स्फुट अभंग ३२८, षड्रिपु, पंचीकरणयोग, चतुर्थमान, मानपंचक, पंचमान, स्फुट प्रकरणें ६९, 'प्रमाणिका' वृत्तांतील फार बहारीचे स्फुट श्लोक प्रकरणें ६१, इतकीं प्रकरणें या भागांत आहेत. कल्याणस्वामींच्या हस्ताक्षराचें आरंभीं चित्र दिलें आहे. रा. देव यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेंत श्रीसमर्थांचा शिष्यसांप्रदाय, श्रीसमर्थांचे ठ, श्रीसमर्थांचें रामायण व श्रीसमर्थांची कविता अशीं चार प्रकरणें आहेत. मर्थांची बहुमोल अशी खरी च अप्रकाशित कविता या ग्रंथांत आली आहे. ष्ठसंख्या ५५० वर आहे.

## श्री श्रेष्ठांची कविता  किंमत २ रु.

श्रीसमर्थांचे वडिल बंधु गंगाधर; यांना च रामीरामदास ऊर्फ श्रेष्ठ ्हणत. भक्तिरहस्य व सुगमोपाय असे यांचे दोन अप्रतिम ग्रन्थ व इतर स्फुट कविता या भागांत दिली आहे. भक्तिरहस्याचा विषय नांवावरून व्यक्त च होत ाहे. ग्रंथ फार च प्रेमळ आहे. सुगमोपाय हा ग्रंथ वेदान्तपर असून त्यांत

तत्वमसि या वाक्याचा विचार केला आहे. प्रस्तावनेंत रा. देव यांनीं अप्रकाशित साधनांवरून श्रेष्ठांचें अल्प चारित्र दिलें आहे व श्रेष्ठांच्या कवितेचें रहस्य दाखविलें आहे. पृष्ठसंख्या ५२५ वर आहे.

## श्रीदासविश्रामधाम . किं. रु. ११

श्रीमत् दासबोधाच्या तिप्पट मोठा, एकनाथी भागवताहून हि मोठा असा हा श्रीआत्मारामहाराजकृत श्रीसमर्थचरित्रपर अत्यन्त मौल्यवान ग्रन्थ आहे. तो पुन्हा छापला जाणें शक्य हि नाहीं. त्याच्या पांच पन्नास च प्रती शिल्लक आहेत. श्रीसमर्थचरित्राचा ज्यास अभ्यास करावयाचा असेल त्यास हा ग्रन्थ वाचल्यावांचून गत्यंतर नाहीं. शेवटीं विस्तृत सूची दिली आहे.

## श्रीसीतास्वयंवर किं. ॥८१०

श्रीसमर्थांच्या श्रेष्ठ शिष्यिणींपैकीं श्रीवेणाबाई यांचा हा प्रेमळ ग्रन्थ होय. वेणाबाईचा अधिकार फार मोठा होता. प्रस्तावनेंत देवांनीं त्यांचें पावन चरित्र दिलें आहे. महाराष्ट्रबंधुभगिनींना अत्यंत प्रिय व्हावा, असा हा ग्रन्थ आहे.

## श्रीदिनकरांची स्फुट कविता किं. १८८

स्वानुभवदिनकर या अप्रतिम ग्रन्थाचे कर्ते तिसगांवमठपति दिनकर यांची इतर कविता या ग्रन्थांत दिली आहे.

**श्रीसांप्रदायिक विविध विषय** द्वितीय खंड किं. रु. १

**श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें** द्वितीय खंड किं. रु. २

**श्रीदासबोधाची किल्ली** किं. ८८

श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर यानीं लिहिलेलीं चार प्रकरणें या ग्रन्थांत दिलीं आहेत.

**श्रीहाकेंकतवाके** किं. ८१०

हा अपूर्व ग्रन्थ आहे. ही गिरिधरांनीं श्रीसमर्थांनां उद्देशून पत्रें लिहिलीं आहेत. अपूर्व आहेत. पहा तर खरीं.

**श्रीसमर्थकृत पदपदांतरें** किं. रु. २

श्रीसमर्थकृत शेकडों पदें पदांतरें या ग्रन्थांत दिलीं आहेत. खुद्द श्रीसमर्थांच्या मुखांतील ती वाणी होय. पदें गोड आहेत. पृष्ठसंख्या ३००.

ज्याना गाता येते ते ही पदें एकांतांत म्हणून स्वतः वेडे होतील व गाऊन दाखवून इतरांस वेड लावतील.

## श्रीदासबोधाचे कर्ते श्रीसमर्थ च कि. ८०

कोणी मय्याशास्त्री जामखेडकर यांनीं विविधज्ञानविस्तारात निबंध लिहून मोठ्या गंभीरपणानें प्रतिपादन केलें कीं, श्रीग्रन्थराज दासबोध हा ग्रन्थ श्रीसमर्थांचा नाहीं च मुळीं ! शास्त्रीबुवाच्या या विक्षिप्त कल्पनेचें प्रस्तुतच्या निबंधांत रा. देवांनीं सप्रमाण खंडन केलें आहे. पृष्ठसंख्या ७२

## श्रीसमर्थांचें राजकारण कि. ८४

मय्याशास्त्र्याचा पुढचा अवतार न. र. पाटक यांनीं विविधज्ञानविस्तारांत च निबंध लिहून तितका च गंभीरपणाचा आव आणून प्रतिपादन केलें कीं, श्रीसमर्थांनीं स्वतः राजकारण केलें नाहीं, दुसऱ्यास शिकविलें नाहीं व त्यांनीं आपल्या वाङ्मयात राजकारण हा शब्द चातुर्य या अर्थीं वापरला आहे ! ! पाटकांच्या या भ्रामक व अप्रामाणिक प्रतिपादनाचें प्रतुस्तच्या निबंधांत देवांनीं आविष्करण करून सप्रमाण खंडन केलें आहे. पृष्ठसंख्या ५६

## श्रीमत् दासबोधाची प्रस्तावना कि. ८६

रा. देवांनीं लिहिलेली ही प्रस्तावना श्रीमत् दासबोधाला जोडली च आहे. ती ही निराळी छापली आहे.

## श्रीसमर्थांची शिकवण कि. ०८

यांत श्रीसमर्थांच्या शिकवणीचे देवांनीं लिहिलेले पहिले सोळा धडे आले आहेत. प्रत्येक विद्यार्थ्यानें आणि तरुणानें ते वाचून स्वतःस बोध करून घेतला पाहिजे.

## ज्ञानेश्वरी प्रस्तावनेसह कि. रु. ४

ही एकनाथमहाराजांच्या पूर्वीची प्रत होय. त्या दृष्टीनें ही प्रत अपूर्व आहे. श्री. के. रा. राजवाडे यानीं संपादिली असून तिला त्यानीं विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. प्रत्येक श्रीज्ञानेश्वरभक्ताच्या संग्रहीं ही प्रत अवश्य पाहिजे.

## ज्ञानेश्वरींचें व्याकरण कि. रु. १

हा विद्वत्तापूर्ण ग्रन्थ कै. राजवाडे यांनीं लिहिला असून मराठी भाषेचा अभ्यास करणारानें तो अवश्य अभ्यासिला पाहिजे.

## बालबोध त्र्यंबकरायकृत कि. रु. १।४

हे त्र्यंबकराय श्रीसमर्थांच्या पूर्वी होऊन गेले. ते योगी होते. त्यांचा हा अनुभवसिद्ध ग्रन्थ अनेक दृष्टींनीं महत्वाचा आहे. त्याच्याकडे महाराष्ट्राचें अजून जावें तसें लक्ष गेलें नाहीं, हें दुर्दैव होय ! कै. गोविंद काशीनाथ चांदोरकर यांनीं हा ग्रन्थ संपादिला आहे.

## पेशवाईची अखेर कि. रु. २

ही बखर कै. चांदोरकर यांनी संपादिली असून तींत शके १७१७-१७४० या काळांतील हकिकत शकवार दिलेली आहे. प्रत्येक इतिहासभक्तानें ती वाचल्याशिवाय चालणार च नाहीं.

## ऐतिहासिक विविध विषय कि. रु. ५

इतिहास आणि ऐतिहासिक या मासिकांत कै. राजवाडे, कै. चांदोरकर इत्यादिकांचे संशोधनात्मक, विद्वत्ताप्रचुर जे निबंध आले होते, ते या ग्रन्थांत एकत्र केले आहेत. राजवाड्यांनीं लिहिलेला 'महाराष्ट्राचा वसाहतकाल', चांदोरकरांचा 'मानभाव कीं बौद्ध' इत्यादि महत्त्वाचे निबंध या च ग्रन्थांत आहेत.

## शिवकालीन घराणीं कि. रु. ३

मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचा हा २१ वा खंड होय. त्यांत मुख्यतः प्रभानवल्लीचे सरदेसाई व कऱ्हाडचे गिजरे यांचे कागदपत्र आले आहेत.

चिटणीस
सत्कार्योत्तेजक सभा-धुळें

मुंबईचे प्रतिनिधी—परचुरे, पुराणिक आणि मंडळी, माधवबाग, मुंबई नं. ४